# अंतरंग

(काल्पनिक प्रेमकथा)


लेखक

**माधव दामोदर अळतेकर, एम्. ए.**

अपराध कोणाचा, ललिता, शांताराम, मुक्तबंध, निरंकुश
या कादंबऱ्यांचा आणि
गोपाळ गणेश आगरकर (चरित्रात्मक निबंध),
कालिदासाची सृष्टि, पानें व फुलें, भाग १ व २, श्रीज्ञानदेव,
नवें मानसशास्त्र आणि नवी नीति
इत्यादि ग्रंथांचा कर्ता.



**सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड,**
**नागपूर**

शके १८६५ ] किंमत तीन रुपये [ सन १९४३

मुद्रक व प्रकाशक
पांडुरंग नारायण बनहट्टी, बी. एस्सी.,
व्यवस्थापक, नारायण मुद्रणालय, धनतोली, नागपूर.
आणि
डायरेक्टर, सुविचार प्रकाशन मंडळ, लि०.



सूचना—या कथेंतील सर्व पात्रें व प्रसंग निव्वळ काल्पनिक आहेत. त्यांतील एखाद्याचें साम्य एखाद्या व्यक्तीशीं किंवा प्रसंगाशीं दिसल्यास तो केवळ विचित्र योगायोग होईल; कारण तशा प्रत्यक्ष गोष्टी देण्याचा लेखकाचा केव्हाही विचार नव्हता.

# प्रस्तावनेदाखल

अंतरंग ही कादंबरी माझे मित्र रा. प्रभाकर श्रीपाद कोल्हटकर यांनी चालविलेल्या "संजीवनी" साप्ताहिकासाठी कित्येक वर्षांपूर्वी लिहावयास घेतली. कित्येक प्रकरणें त्यांत प्रसिद्ध झालीं. पुढे कांही अडचणीमुळे पुढचीं प्रकरणें त्यांत रा. कोल्हटकर घालूं शकले नाहीत. पुढे "संजीवनी" ही मृत झाली. पुढे कित्येक वर्षांनी मी उरलेलीं प्रकरणें लिहून काढलीं व "सुविचार प्रकाशन मंडळ," नागपूर यांनी तीं छापून प्रसिद्ध करण्यासाठी मजकडून घेतलीं. शेवटचीं प्रकरणें सुरवातीच्या प्रकरणांनंतर कित्येक वर्षांनंतर लिहिलेलीं आहेत. ज्या वेळीं जी एक विशिष्ट परिस्थिति दिग्दर्शित करण्यासाठी ही कथा लिहिली त्या वेळेंत आणि चालू काळांत बराच फरक पडलेला आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. तथापि त्यामुळे कथेच्या ओघाला कसलाही प्रतिबंध होत नाही. तसेंच सर्व कथा व तींतील सर्व पात्रें निव्वळ काल्पनिक आहेत. त्यामुळे कोणा विद्यमान व्यक्तीचें तींत चित्र आहे अशी निरर्थक कल्पना सुज्ञ मंडळी करून घेणार नाहीतच. माझ्या "शांताराम" व "मुक्तबंध" या कादंबऱ्यांनंतर पुष्कळच वर्षांनी ही कादंबरी प्रसिद्ध होत आहे. ती वाचकांना आवडली असें कळलें तर मला आनंद होईल.

प्रस्तुतच्या अडचणीच्या परिस्थितींत "सुविचार प्रकाशन मंडळा" ने ही कादंबरी प्रसिद्ध केली याबद्दल त्यांचे आभार मानणें उचित आहे.

१ मे १९४३<br>
१६५, शिवाजी पार्क<br>
मुंबई २८

माधव दामोदर अळतेकर

माझी प्रिय पत्नी

सौ. मालती

हिला ही कादंबरी

प्रेमपुरस्सर अर्पण केली आहे.

लेखक

# अंतरंग



## प्रकरण पहिलें

## सुंदरची ओळख

" सुंदर, कुठं चाललीस ? "

" मी वाटेल तिथं जात असेन, मोहन. तुला त्याची पंचाईत करण्याचा काय अधिकार ? "

" मला काय अधिकार म्हणून आणखी वर विचारतेस ! सुंदर, तूं माझी आहेस, माझी झालेली आहेस, आणि म्हणून तुझी सर्व पंचाईत करण्याचा मला पूर्ण अधिकार आहे."

" अस्सं ! हा अधिकार तुला प्राप्त झाल्याची मला माहिती पण नव्हती; आणि माझ्या संमतीशिवाय तो अधिकार तुला कसा मिळणार हें पण मला समजत नाही."

" सुंदर, तूं काय बोलते आहेस ? तुला कांही माहीत नाही आणि तुला कांही समजत नाही ? आज कित्येक दिवस झाले, तुझी संमति असल्याशिवाय का या सर्व गोष्टी घडल्या ? आपण अहो जाहोचे अरे तुरेवर आलों; किती तरी वेळां आपण मिळून हिंडावयाला गेलों, पांच वेळां मी तुला सिनेमा दाखविला; त्या वेळीं, सर्वत्र अंधार झाल्यावर आपण हातांत हात घालून बसलों. सिनेमाच्या कथानकांत कांही हृदयस्पर्शी प्रसंग येतांच तूं कशी मला बिलगून माझीं बोट

दाबीत होतीस. फार वेळां नाही, पण दोन वेळां रविवारीं मी तुला नाटकाला घेऊन गेलों. त्याबद्दल कित्येक लोकांनी विशेषत: तुझ्यावर टीका केली. त्या–त्या–तिनं तर तुला चारचौघांत टेनीस कोर्टावर विचारलं की मोहनवर तुझं प्रेम आहे का आणि तुमचा वाङ्‌निश्चय झालेला आहे का ? तेव्हां तूं अगदीं ठासून 'हो' म्हणून सांगितलंस. आणि––आणि किती तरी गोष्टी मला सांगतां येतील."

"होय, तुला सांगतां येतील, मोहन; पण त्या ऐकायला मला आता वेळ नाही. तूं पाहिजे तर एका कागदावर त्या सगळ्या लिही आणि लिफाफ्यांत घालून माझ्याकडे पाठव. मला कधी कधी कागद जाळावेसे वाटतात त्या वेळीं मी त्याचा उपयोग करीन."

"सुंदर, तूं कितीतरी वेळां माझ्या गालाला गाल लाऊन––"

"मी सांगितलं ना तुला मोहन, की मला हें गालपुराण ऐकायला वेळ नाही म्हणून ! शिवाय आतापर्यंत तूं फक्त कंटाळवाणं बोलत होतास, पण आता अश्लील वाङ्मयांत शिरणार असं दिसतं. तसल्या वाङ्मयाविरुद्ध तूं तर नुक्तंच व्याख्यान दिलंस."

"हें पहा सुंदर, माझा अंत पाहूं नकोस. तुझी ओळख झाल्या-पासून आणि नंतर तुझ्या प्रेमाचा कटाक्ष माझ्याकडे वळल्यापासून मी अगदी बंधनाच्या पलीकडे गेलों आहें."

"तें दिसतंच आहे. नाही तर सगळी मर्यादा गुंडाळून माझ्यावर सुलतानासारखा कडाडण्याचा अव्यापारेषु व्यापार तूं केला नसतास."

"सुंदर, मी आपला सुलतान व्हावा हीच तुझी इच्छा आहे ना ? आणि आपलं लग्न झालं म्हणजे मी तुझा सुलतानच होणार ना ?"

"म्हणून तर आपलं लग्न होण्याचा संभव नाही. तूं मात्र जाणार बंधनाच्या पलीकडे आणि मला धाडणार सुलतानाच्या अंमलांत ! वा रे वा ! शुद्धीवर तरी आहेस ना बोलतांना ?"

"सुंदर !"

"कां, कां घाबरलास कां ? खरें तें सांगतें."

"मला ऐकायला वेळ नाही."

"उत्तम. मलाही वेळ नाही आणि तुलाही वेळ नाही. जा आता घरीं. आता इतक्यांत होईल अंधार आणि इकडे जरा चोरांचें भय आहे. अगदीच वेळ जाईनासा झाला तर कविता करायचा यत्न कर. माझ्यावर केलीस तरीही चालेल. तशी केलीस म्हणजे कोणीही संपादक ती छापून काढील आणि तुझी गणना सौंदर्योपासक कवींत होईल. मात्र कविता लिहिशील तेव्हा सगळया खिडक्या लावून घे. अलीकडच्या बऱ्याच कवींना खुली हवा सोसत नाही."

"म्हणे माझ्यावर कविता कर. सुंदर, माझी काव्यस्फूर्ति तुझ्या-सारख्या चंचल पोरीसाठी नाही. जा, मला तुझ्याशीं कांही कर्तव्य नाही. काय तूंच जगांत एकटी नाहीस—"

"ही खरी काव्यस्फूर्ति. जा, लौकर आपल्या खोलींत जा. एखाद्या नटाचा स्त्रीवेषांतला फोटो समोर ठेव, आणि ही काव्यस्फूर्ति आयती आली आहे तिला काळयाकुळकुळीत शाईत बुडव आणि मग ती शाई कागदावर ओत. पुन: भलभलत्या गोष्टी मात्र मला सांगत जाऊं नकोस. जा, हां, वाटेंत तमाशा पाहत उभा राहूं नकोस."

"सुंदर तुझा एकेक शब्द ऐकून माझं डोकं कसं भणभणून जातं—"

"केवढा रे भ्रम तुझा हा?"

"माझा भ्रम?"

"भ्रम नाही तर काय? भणभणण्याला तुझ्याजवळ डोकं आहे का? जें नाही तें भणभणेल कसं?"

"सुंद्रे, याचा वचपा मी काढीन. मला तूं काय समजतेस?"

"तें मी आताच आपल्याला सांगितलं हो मोहनराव. आता येतें बरं."

सुंदरच्या चेहऱ्यावर स्मित हास्य झळकत होतें आणि मोहन तिच्याकडे कांहीसा रागाने आणि कांहीसा तुच्छतेने पाहत होता. ती वळून चालूं लागली; पण मोहनचा पाय उचलेना. ती चार पावलें

गेली असेल नसेल, तोंच मोहनने तिला हाक मारली आणि म्हटलें, "सुंदर, मग आपल्यांत आता कांही प्रेम राहिलें नाही ना?"

सुंदर मागे वळली आणि क्षणभर मोहनकडे निरखून पाहून म्हणाली, "आपल्यांत काय राहिलं नाही म्हणालांत मोहनराव?"

"तुझं माझ्यावर प्रेम राहिलं नाही. एके वेळीं तुझं माझ्यावर केवढं प्रेम होतं. कॉलेजांत क्लास नसेल तेव्हा आणि कधी कधी तास चुकवूनसुद्धा आपण कितीतरी वेळ गप्पा मारीत होतों. आपलं मोठ्या गंभीरपणानं तोंडांतल्या तोंडांत चाललेलं बोलणं ऐकून येणारे जाणारे विद्यार्थी आणि कधी कधी प्रोफेसरसुद्धा डोळे फाडून पहात असत. इराण्याच्या दुकानांत तूं माझ्याबरोबर चहासुद्धा प्यायला येत होतीस. कॉलेज सुटल्यावर तुझ्या पुस्तकांचा भारा घेऊन मी तुला आपल्या घरापर्यंत पोचवत असें. तुझ्या आणि माझ्या मिळून पुस्तकांचं ओझं केवढं होत होतं याची सुद्धा तुला आठवण राहिलेली नाही."

"मला चांगली आठवण आहे हो मोहनराव! हमाल केला असता तर त्याला दोन दिडक्या पुष्कळ झाल्या असत्या."

"एकूण माझी किंमत दोन दिडक्यांच्या हमालाएवढीसुद्धा नव्हती. ठीक आहे! लौकरच माझे डोळे उघडले! पण सुंदर, खरंच सांग, कुठं चालली आहेस तूं? मला सांगण्यासारखं नसलं तर सांगू नकोस. तुझी इच्छा नसेल तर मी विचारणार नाही."

"आता थोडे तरी शुद्धीवर आलांत. " जें जें कांही बरळत होतां तें कोणी जर ऐकलं असतं तर माझ्याबद्दल त्याला काय वाटलं असतं? सिनेमाला गेलों तेव्हा मी तुमच्या गालाला गाल लावला, का मी दूरदूर होण्याचा यत्न करीत असतांना सुद्धा तुम्हीच मला बिलगण्याचा आचरटपणा करीत होतां? खरं बोला हो, मोहनराव!"

"मी अगदी खरं बोलतों. पण मला मोहनराव म्हणूं नकोस. पहिल्याप्रमाणें मोहन म्हण. एकवचन म्हणजे खरं वचन होय—"

"म्हणूनच रामचंद्र एकवचनी होता—"

"हें पहा, पुनः माझी चेष्टा करतेस. तुझी मर्जी! मी तुझ्या-बद्दल कांही भलतं बोलतों कां?"

"भलतंच कांही तरी! तसं भलतं कांहीच तुम्ही बोललां नाही. अलीकडचे तरुण वीर मनोराज्य करतात आणि मग तें बिचाऱ्या मुलींच्यावर ढकलतात!"

"बिचाऱ्या मुली खऱ्या!--पण आता कांही झालं तरी मी तुझ्याशीं वाद करणार नाही. मग सांग पाहूं, कुठं चाललीस ती? मी जें जें बरळलों तें तें सर्व परत घेतों. तें गैरशुद्धींत बोललों; मग तर झालं ना?"

"हें पहा, मोहनराव, मी कुठं कां जाईना? तुम्हांला काय करायचं?"

"मी पोचवायला आलों असतों."

"नाही; एवढी तसदी देण्याची माझी इच्छा नाही. माझ्या पुस्तकांचं ओझं घेऊन तुमची दमणूक फार झाली आहे, त्याबद्दल मला फार वाईट वाटतं. तेव्हा यापुढं तुम्हांला तसदी मी मुळीच देणार नाही."

"सुंदर तुझ्यासाठी वाटेल तें करायला मी तयार आहें. पुस्तकांचंच ओझं काय--"

"समजलं, मोहनराव! माझी ट्रंक आणि वळकटी डोक्यावर घेऊन मला तुम्ही बोरीबंदरावर पोचवायला सुद्धा कांकूं करणार नाही असं तुम्ही म्हणणार होतां. पण मला की नाही अलीकडे काव्य ऐकायचा कंटाळा आला आहे."

"मग चाललीस कुठं तें सांग ना!"

"आपला काय तर्क आहे?"

"त्या शंभूकडे चालली असशील!"

"हा शंभू कोण?"

"मला विचारतेस? त्याचं नांव देखील मी घेणार नाही."

"फारच चांगला निश्चय आहे तुमचा. त्याचं नांव घेऊं नका किंवा काढूं नका. आणि माझं देखील नांव कुठंही काढू नका. बरें, मी चाललें."

" पण कोठें जातेस सांग ना ?"

" म्हणजे, मी शंभूकडे चाललें ना ?"

"सुंदर, माझ्या प्रेमाची अशी अवहेलना करणं तुला शोभत नाही. तुझी माझी ओळख होऊन सहा महिने झाले, त्यांपैकी सुटीचा महिना सोडला तर उरलेल्या पांच महिन्यांचे सरासरीने दीडशें दिवस होतात. एवढ्या दिवसांत मी तुझ्यावर तीनशें कविता केल्या. म्हणजे दर दिवसाला दोन पडल्या. यावरून तुझ्यावर माझं केवढं प्रेम आहे हें सिद्ध होतं."

" अगदी [illegible] रीतीनं सिद्ध व्हावं तसं झालं, पण मला या कविता तुम्ही कधीच दाखविल्या नाहींत."

" दाखवूं कां आता ? वही माझ्या खिशांत आहे--"

" आता नको. आणि यापुढे पाहायची जरूरी नाही. कारण, तुम्हीच आता सांगितलंत की आपल्यांत कांही प्रेम उरलं नाही."

"सुंदर, तूं मोठी निर्दय आहेस. काव्याची अशी चेष्टा करणं तुझ्यासारख्या सुशिक्षित मुलीला मुळीच शोभत नाही. तुझा ऐच्छिक विषयसुद्धा वाङ्मय हाच आहे. तूं काव्याची अशी चेष्टा करतेस हें तुझ्या प्रोफेसरांना जर कळेल तर ते काय म्हणतील ?"

"ते म्हणतील की शिकवल्याचं सार्थक झालं. मुलीला काव्यांतले गुणदोष कळूं लागले व हें काव्य कां व हें काव्य कां नव्हे, हें हिला पटलं."

"तुझ्याशीं जास्त बोलण्यांत अर्थ नाही. माझी अशी चेष्टा तूं कां करावीस हें मला समजत नाही. माझी कविता वाचून दगडालाही पाझर फुटेल."

"तुम्ही कविता लिहीत असतांना विजेची काच फट्दिशीं फुटली म्हणून मी परवां ऐकलं."

"सुंदर बस्स झालं. मला सुद्धा कांही [illegible] आहे. बायकांच्या नादीं लागलेल्या पुरुषांची फजिती झाल्याखेरीज राहत नाही हेंच खरं!"

"कशी लाख किंमतीची गोष्ट बोललांत! मग कुठें जातें हें कांही तुम्हांला सांगण्याची जरूरी नाही. माझ्या नादाला लागूं नका."

"ठीक आहे. तुझ्या नादाला इतःपर लागणार नाही. आता घरीं जातों आणि स्टोव्ह पेटवून त्यावर त्या तीनशें कविता धरतों."

"तसं करूं नका, मोहनराव. त्या जाळण्याला जेवढा वेळ लागेल त्या वेळांत जळलेल्या तेलाची किंमत अशी फुकट गमावूं नका. कुठल्या तरी मासिकाकडे त्या कविता पाठवा किंवा स्वतःसारखे चार हरीचे लाल जमवून एक कविमंडळ काढा आणि त्याच्यामार्फत त्या कविता प्रसिद्ध करा. कविमंडळांतल्या एकाने प्रस्तावना लिहावी, एकाला समर्पण करावं, मात्र खर्च सर्वांनी भरावा म्हणजे झालं. कांही करा, पण कविता जाळून टाकूं नका."

"अगदी जरूर जाळून टाकणार. तुझ्यावर कविता लिहाव्यात अशी तुझी योग्यताच नाही हें आज मला पटलें. मी झक् मारली आणि तुझ्यासारख्या पोरीवर कविता लिहिल्या."

"मलाही फार वाईट वाटतं त्याबद्दल; पण त्या ठेऊन घ्या ना कविता; दुसऱ्या एखाद्या पोरीकडे पाहून जेव्हा स्फूर्ति होईल तेव्हा हेंच पुडकं तिच्याकडे पाठवून द्या म्हणजे झालं. आजकाल कागद शाईचीही किंमत वाढलेली आहे."

"सुंदर, आपल्या ओळखीचा आजचा शेवटचा दिवस?"

"खरं की काय? मग माझ्या वाटणीला तीनशेंच कविता आल्या म्हणायच्या! मग मला जरा घरापर्यंत पोचवा ना! मी जरा पुढं दुकानांत जाऊन कपडे घेतें. दोन तीन पातळं आणि पोल्क्याचं

कापड घ्यायचं आहे. माझ्या एका हातांत ही छत्री आहे आणि दुसऱ्या हातांत ही मनीब्याग आहे. ओझं कांही फारसं नाही होणार !"

"मी मोठ्या आनंदाने घेतों; पण आजचा दिवस आपल्या ओळखीचा शेवटचा एवढं मात्र समजून ठेव. म्हणजे मी कांही डोकं फिरवून घेणार नाही—"

"नाही, नाही, ती भीति मला मुळीच वाटत नाही—"

एवढें बोलून सुंदर जरा मोठ्याने हसली. त्यासरशीं मोहन पुन: साशंक झाला व म्हणाला, "मी आलों असतों, पण मला वेळ नाही. दोन दिडक्या टाकल्या की तुला हमाल मिळेल."

सुंदर हसली व चालूं लागली. मोहन बावरल्यासारखा तिच्याकडे पाहत होता. ती अगदी दिसेनाशी झाल्यावर त्याने एक उसासा टाकला आणि तो त्याच दिशेने चालूं लागला

---

## प्रकरण दुसरें

# मोहनचें प्रेम

मोहन आणि सुंदर कोण असावींत याबद्दल तर्कशक्तीला फारसा ताण देण्याची आवश्यकता नाही. दोघंही कॉलेजांत शिकत होतीं. सुंदर ज्यूनीयर बी. ए. त होती व मोहन सीनीयर बी. ए.त होता. दोघांच्या वयांत अंतरही वर्ष दोन वर्षांहून अधिक नव्हतें. मोहन कॉलेजांत आल्यावर एक वर्षाने सुंदर आली. पण तिची ओळख मात्र त्याला याच वर्षीं झाली होती. तो ऐकत होता व तिची ओळखं व्हावी अशी इच्छा त्याच्या मनांत आज वर्षाहून अधिक दिवस होती. पण तो योग कांही केल्या जमेना. सुंदरभोवती घिरट्या घालणारीं चार पांच मुलें होतीं; त्यांची कोंडी फोडून तिच्यावर शह घालणें ही गोष्ट मोहनला प्रशस्त वाटली नसावी, किंवा साध्य वाटली नसावी.

कसेंही असो, बरेच दिवस मनांत इच्छा असूनही तो तिच्या परिचयाला अंतरला होता. पण तिची मूर्ति त्याच्या डोळ्यासमोर दुसरें कांही नसेल तेव्हा असे. पुढे योगायोग आला. एक दिवस कॉलेजांतून घरीं जातांना सुंदरला वाटेंत चक्कर आल्यासारखें झालें; एकदोन उपग्रह तिच्या सांगातीं बहुधा असावयाचे; पण आज कोणीही नव्हते. तिला चक्कर आल्यासारखें झालें आणि तिच्या हातांतील पुस्तकें खाली पडलीं. मोहन थोडयाशा अंतरावर तिच्या मागोमाग चालला होता; तो लागलाच पुढे धावत गेला. तेवढया वेळांत सुंदर पण भानावर आली व पुस्तकें उचलण्यासाठी ती खाली वाकण्याच्या विचारांत आहे इतक्यांत मोहनने जाऊन तीं पुस्तकें उचललीं व किंचित् लाजल्या-सारखें करून तिच्यापुढे तो उभा राहिला.

"मला थोडी भोवळ आल्यासारखं झालं आणि त्या धांदलींत तीं पुस्तकं माझ्या हातांतून खालीं पडलीं. तुम्ही तीं वेळेवर उचललींत हे तुमचे माझ्यावर फार उपकार झाले. तुम्ही कॉलेजांतच आहां आणि तुमचें नांव मोहनराव ना ?" सुंदरने विचारलें.

"उपकार कसले ?" मोहनराव म्हणाला; "पण आता हें ओझं तुम्ही घेऊं नका; पुन: एखादे वेळीं भोंवळ यावयाची. मी मोठया आनंदानं हीं पुस्तकं तुमच्या घरापर्यंत पोंचवतों--का गाडी करूं ? तुम्हांला चालवत नसेल तर गाडींतून जाणं चांगलं.--ती पहा विक्टो-रिया चालली आहे. बोलावूं का ती ?"

"छे: छे:, मला तस कांही होत नाही. कशानं भोवळ आली कुणाला ठाऊक. मी तीं पुस्तकं घेऊन जातें. तुम्ह माझ्याबद्दल अगदी निर्धास्त असा."

"मी तुम्हांला तीं पुस्तकं नेऊं देणार नाही. तुमची प्रकृति पुनः भर रस्त्यांत बिघडली म्हणजे पंचाईत व्हायची. मला दुसरें कांही आता काम नाही, आणि मला कांही या पुस्तकांचं ओझं नाही."

मोहनचें हें बोलणें ऐकून सुंदर हसली. हास्यामुळे तिच्या मुखा-वर नवीन रक्तिमा व प्रसन्नता आली व मोहनला आपल्या डोळ्याचें

सार्थक झाल्यासारखें वाटूं लागलें. मग सुंदर म्हणाली, "मर्जी तुमची पण माझं घर जरा दूरच आहे. तुम्हांला दुसरं काम नाही म्हणतां तेव्हा पाहिजे तर तिथपर्यंत या. पण तुम्ही ही विनाकारण तसदी घेतां. मला खरोखर कांही होत नाही."

मोहनने तीं पुस्तकें हातांत घेतलीं व तो तिच्याबरोबर चालूं लागला. तिच्या सान्निध्यांत त्याला एक प्रकारचें समाधान वाटूं लागलें व बरेच दिवस केलेली आशा फलद्रूप झाल्यावर अंतःकरणाला स्वस्थ-पणा वाटतो तशी त्याची स्थिति झाली. त्याला सारखें तिच्याकडे पाहावेंसें वाटत होतें. पण तें तिच्या लक्षांत येऊं नये अशीही त्याची इच्छा होती. बाकी, सुंदर रूपाने सुंदर होती त्यामुळे कोणाच्याही ती दृष्टीस पडल्यावर त्याला तिच्याकडे पाहावेंसें वाटलें असतें. त्यांत तिचाही दोष नव्हता किंवा ^ नव्हता. तिचे पाणीदार डोळे, सतेज चेहरा, शरीराची प्रकृति उत्तम असल्याबद्दल साक्ष देणारे तिचे रस-रशीत ओठ, अंतद्रितपणा दाखविणारी तिची चालण्याची ढब, दोनच गुलाबी फुलांनी मंडित झालेला तिचा काळाभोर केशकलाप, सोन्याच्या दोन व त्यांमध्ये काचेची एक अशा बांगडयांमुळे तिचे शोभणारे हात, वगैरे गोष्टींकडे मोहनचेंच काय पण कोणाचेंही लक्ष वेधलें असतें. पण इतर कोणत्याही गोष्टींपेक्षा तिच्या मुखावर जी सतेजता व प्रसन्नता दिसे त्यामुळे त्या मुखाकडे वरचेवर पाहावें असें त्याला वाटे व तसें तो पाही व तिची दृष्टि आपल्याकडे वळणार असें वाटतांच तो आपली नजर किंचित् दुसरीकडे फिरवी. त्याचे डोळे तिच्या ठिकाणीं मधून मधून इतके तल्लीन होत की एकदा तर एक मोटार त्याच्या अगदी जवळून गेली तरी त्याला समजलें नाही, का मोटारीच्या कर्ण्याचें 'पों पों' त्याच्या कानांत शिरलें नाही.

त्या दिवशीं मोहनने सुंदरचीं पुस्तकें तिच्या घरापर्यंत पोचविलीं व तशाच तऱ्हेची तिची कामगिरी त्याने आपण होऊन आणखी तीन चार वेळां बजाविली. अर्थात् हळू हळू त्यांची चांगली ओळख झाली. मोहन तिच्या घरीं केव्हा केव्हा जाऊं लागला व तीही त्याच्याशीं मोकळया मनाने बोलूं चालूं लागली. एकदा ओळख झाल्यावर

भिडस्तपणा म्हणून ठेवावयाचा नाही, अगदी मोकळेपणाने व बोलण्याचालण्यांत औपचारिक प्रकार म्हणून दाखवावयाचा नाही, अशा वृत्तीचीं कांही माणसें असतात. सुंदर त्या वृत्तीची होती. आपल्या समाजांत अशी वृत्ति स्त्रियांच्या ठिकाणीं असणें म्हणजे पुष्कळ वेळां गैरसमजुतीला कारण होतें. शाळेंत किंवा कॉलेजांत मुलांचा गोंगाट म्हणजे चौपाटीवरच्या गोंगाटाला मागे हटवितो; पण त्याच शाळेंत किंवा कॉलेजांत मुली मोठ्याने बोलूं लागल्या तर असा गोंगाट करणाऱ्याच कितीतरी विद्यार्थ्यांना मोठें आश्चर्य वाटतें. संध्याकाळीं हिंडावयास गेल्यावर वादविवादाच्या भरांत आवाज पंचमाच्या पलीकडे जाऊन फेरोजशहा मेहता गार्डनजवळ चाललेला विद्यार्थ्यांचा सावेश संवाद चर्नीरोडच्या बगीच्यापर्यंत ऐकूं येतो किंवा वेताळाच्या डोंगराळ वाटेवरचा संवाद डेक्कन जिमखान्यापर्यंत ऐकूं येतो, त्याचें कोणास कांही वाटत नाही; पण मुली जर का रस्त्याने जरा मोठ्याने बोलूं लागल्या तर चोहोकडे मोठी खळबळ उडते व मग किती तरी लोक अलीकडच्या सुशिक्षित होऊं घातलेल्या मुलींच्यासंबंधाने लांबलचक व्याख्यानें झोडूं लागतात व अशा लोकांत कॉलेजच्या वसतिगृहांत किंवा बाहेर राहणारे विद्यार्थी नसतात असें नाही. तेव्हा निर्भयपणाने व मोकळेपणाने वागणाऱ्या मुलींच्यासंबंधीं पुष्कळ वेळां कांही तरी भलताच बभ्रा होण्याची धास्ती असते; निदान त्या मुलीसंबंधीं गैरसमज होण्याला संधि मिळते; आणि कांही गटारमापक वर्तमानपत्रें किंवा मासिकें आपल्या जिनगीचे फवारे त्यांच्यावर वेळीं अवेळीं उडवून आपल्या वाचकांचें मनोरंजन करून आपल्या पोटाचीं खळीं भरतात. सुंदरसंबंधाने अशा तऱ्हेची थोडी फार गैरसमजूत उत्पन्न झालेली नव्हती असें म्हणतां येणार नाही, व अशी गैरसमजूत उत्पन्न होण्याला मोहनसारखे कांही काळ तिचे उपग्रह बनलेले व स्नेही म्हणविणारे कारणीभूत होत असत. अर्थात् सुंदरची जेव्हा ओळख झाली तेव्हा तिच्यासंबंधीं कांहीतरी चमत्कारिक बोलणाऱ्यांचा किंवा तिच्यासंबंधीं भलत्या समजुती पसरविणाऱ्यांचा मोहन चांगलाच समाचार घेत असे. एकदोन प्रसंगीं तर तो हातघाईवर आला. अशा वागण्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. त्याच्या विद्यालयीन मित्रांना त्याच्या

आर्ष वागणुकीचें सूत मिळाल्यावर मोहन व सुंदर यांच्यामधील कल्पित प्रणयसंबंधाच्या स्वर्गावर ओराहण करण्याला त्यांना मुळीच वेळ लागला नाही. आणि त्याने जेव्हा हें सुंदरला सांगितलें तेव्हा ती इतकी हसली की त्या हसण्याचा त्याला अर्थसुद्धा समजेना. तिचें तें हसणें प्रत्यक्ष पाहापर्यंत एखादी मुलगी इतकी हसूं शकते असें कोणी सांगितलें असतें तर त्याला तें खरेंसुद्धा वाटलें नसतें. पण तिचें तें हसणें ऐकून म्हणा, अगर पाहून म्हणा, 'अलीकडच्या मुली एकूण अशासुद्धा हसतात' ही आपल्या ज्ञानांत त्याने भर टाकली.

पुढे एखाद्या वेळीं ती त्याच्याबरोबर हिंडावयास जाऊं लागली व दोन चार वेळां सिनेमा व एक दोन वेळां नाटक पाहण्याला ती मोहन बरोबर गेली, ही गोष्टही खरी होती. अर्थात् परिचयाची ही परिणति मोहनला अधिकाधिक गोड लागूं लागली व त्या गोडीच्या भिटक्या तो जसजसा अधिक मारूं लागला तसतशी त्याच्या मित्र-मंडळांत त्याची चेष्टा अधिकाधिक होऊं लागली आणि त्या चेष्टेने तो रंजीस आला म्हणजे सुंदरीला गाठून तिला सर्व वृत्तांत सांगत असे, व तो ऐकून ती वात्रट पोरगी पोट धरधरून हसत असे. हळूहळू त्या दोघांची दोस्ती इतकी वाढली की अनेकवचनीपणा जाऊन संवाद एकेरीवर आला आणि नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या एका कादंबरींत एकमेकांना अरेतुरे बोलावणें, हा प्रणयी जोडप्याचा निकष ठरलेला जेव्हा त्यांनी वाचला तेव्हा तर मोहन गंभीरपणें म्हणाला, "आता मी तुला सुंदर म्हणणार". सुंदरीही म्हणाली, "ठीक आहे बरं, मोहन." पण त्यानंतर ती पुष्कळ हसली. तें कां तें मात्र त्याला समजलें नाही.

सुंदर ज्या दिशेने चालली होती त्याच दिशेने मोहन चालला होता. त्याचें मन थोडेंसें उद्विग्न झालें होतें. सुंदर आपल्याला फार टाकून बोलली असें त्याला वाटूं लागलें; विशेषत: आपल्यामधील प्रेम संपलें अशी खात्री पटल्यामुळे त्याला फारच चमत्कारिक वाटलें. प्रेम शब्दाचा अगदी बरोबर अर्थ त्याला समजला होता असें नाही; पण ज्या मुलीच्या सौंदर्यामुळे आपलें मन तिच्याकडे ओढतें तिच्यावर आपलें प्रेम आहे असें त्याला वाटे आणि या अशा प्रेमाचा प्रवास

एका मुलीकडून दुसरीकडे असा होत नसे असेंही नाही; पण सुंदरच्या बाबतींत तिचेंही आपल्यावर प्रेम आहे अशी त्याची समजूत झालेली होती. हें परस्पर प्रेम आता संपलें असें वाटून त्याला चमत्कारिक वाटलें; पण ती जर आपल्यावर प्रेम करीत नाही तर आपणही तिच्यावर प्रेम करणार नाही, असेंही त्याने मनांतल्या मनांत ठरविलें. असें ठरविणें म्हणजे प्रेम नांवाची अस्सल चीज आपल्याजवळ नाही असें सिद्ध होतें, ही गोष्ट तो विसरला; किंबहुना ती त्या वेळीं त्याला माहीतही नव्हती. सुंदर ज्या रस्त्याने गेली त्या रस्त्याने तो कांही वेळ चालला. ती दिसेल अशी त्याला आशा होती. पण आज ती अधिक जलद चालल्यामुळे असो, किंवा कोणत्याही कारणामुळे असो, ती कांही त्याला दिसली नाही आणि आता ती दिसणार नाही असेंही त्याला वाटलें. तेव्हा तिच्या घरापर्यंत जाऊन त्या घराचें दर्शन घेऊन तेथून परत येण्यापेक्षा आहों येथून परतावें असा त्याने बेत केला व तो शहाणपणाचा होता यांत शंका नाही. तो परतला व पुनः कॉलेजकडे जाऊं लागला. त्याच्या मनांत अनेक विचार येत होते व आपलें आपण मनोराज्य करीत तो चालला होता; इतक्यांत त्याच्या खांद्यावर कोणी हात टाकला आणि त्यामुळे दचकून तो वळून पाहूं लागला.

"काय मोहन!" तो खांद्यावर हात टाकणारा म्हणाला, "प्रेमाचं ओझं अगदी घरापर्यंत पोचवून आलास वाटतं? पण तुझा चेहरा असा मलूल काय दिसतो रे? तुझ्या हृदयस्वामिनीनं तुला अगदी स्वामी करून पाठविलेला दिसतो!"

"तूं काय बडबडतो आहेस, विशा? चल, मला आता जरूरीच काम आहे. तुझ्याशीं बोलायला मला वेळ नाही."

"अरे, तुझं जरूरीचं काम होऊन गेलं. सुंदरचीं पुस्तकं तिच्या घरीं पोचविण्याचं काम की नाही?"

"मी सुंदरची पुस्तकें पोचवीन, नाही तर वाटेल तें करीन. त्यांत तुला तोंड घालण्याची काय जरूर?"

"छेः, मला मुळीच जरूर नाही. पण तूं म्हणालास आपल्याला जरूरीचं काम आहे त्याबद्दल मी सांगितलं. सुंदरच्या घरीं कोळशाच्या

गोणीसुद्धा पाटीवरून पोचविल्यास तरी त्यांत माझं कांहीच नुकसान नाही. पण तुझा चेहरा मलूल कां ? आज सुंदरनं चहा प्यायला नाही वाटतं घरीं बोलावलं ?"

"सुंदरने चहा प्यायला मला कधीच नाही बोलावलं, आणि मी चहा पीत नसतों. आणि तिने जरी चहा प्यायला बोलावलं तरी मी जाणार नाही. तिच्या चहाची मला परवा नाही."

"तें खरं, पण तिची परवा आहे ना तुला ?"

"मला तिची पण परवा नाही."

"पण परवा दिवशींच तिच्या पुस्तकांचं ओझं घेऊन हमाला-सारखा चालला होतास ! मी एकट्यानंच कांही पाहिलं असं नाही."

"हो हमालासारखा चाललों होतों. त्यांत तुझ्या काकाचं काय गेलं ?"

"माझ्या काकाचं कांही गेलं नाही. पण तुझा चेहरा असा खिन्न कां ? सुंदरच्या प्रेमाला ओहोटी लागली की काय ? असंच असलं पाहिजे."

"आमच्यांत प्रेम कधी नव्हतं, आता नाही आणि असल्या अली-कडच्या नटव्या चंचल पोरींवर मी प्राण गेला तरी प्रेम करणार नाही."

"वारे पठ्ठ्या ! पण आपल्याला या अलीकडच्या पोरींच्या शिवाय सत ना गत ! अलीकडच्या नव्हेत त्या सर्व पोरी नसून आता म्हाताऱ्या बायका झाल्या आहेत. त्यांतील एखादी कां तुझ्या प्रेमाचा विषय होणार ?"

"हें पहा, विश्वनाथ, माझी चेष्टा करूं नकोस; मग मी तुला सर्व कांही सांगेन. आता तूं मला आपल्या खोलींत ने आणि चहा दे."

"म्हणजे ? चहा पीत नाहीस ना तूं ?"

"चहा पीत नाही असें नाही रे ! सुंदरकडे पीत नाही. तूं कांही सुंदर नव्हेस."

"एवढं मात्र खरं !" असें म्हणून विश्वनाथ आपल्या खोली-कडे वळला व मोहन त्याच्याबरोबर चालूं लागला.

---

## प्रकरण तिसरें

# विलक्षण पत्र

सुंदर घरीं आली. आपल्या खोलींत गेल्यावर तिने टेबलावरच्या आरशांत पाहिलें. त्यांत प्रतिबिंबित झालेलें मुख गोंडस होतें, कोणालाही मोह घालण्यासारखें होतें, याबद्दल तिची पुन: एकदां खात्री झाली; आणि परत येतांना तिचा व मोहनचा संवाद झाला होता तो लक्षांत येऊन तिला मोठी गंमत वाटली व ती स्मित हास्याच्या रूपाने त्या मुखावर पसरली. त्या वेळीं तें मुख अधिकच शोभायमान झालें हेंही तिच्या लक्षांत आलें. कॉलेजांतील इतकीं मुलें आपल्या भोवती घिरट्या घालण्याचा प्रयत्न करतात यांत त्या बिचाऱ्यांचा कांही दोष नाही असेंही क्षणभर तिला वाटलें; पण यांत आपला तरी दोष काय, हा प्रश्न-ही तिच्यापुढे उभा राहिला. समाजांत एकमेकांकडे पाहून समाधान वाटावें, आनंद व्हावा, परस्पर आदर व आवड हीं उत्पन्न व्हावींत ही गोष्ट इष्ट, का एकमेकांकडे पाहून किळस यावी, संताप यावा व तिटकारा उत्पन्न व्हावा ही गोष्ट इष्ट? ज्यांचा चेहरा आकर्षक आहे त्यांना, ज्यांचा तसा नाही त्यांच्यापेक्षा, लोकांना संतोष देण्याचें किंबहुना आपल्या आधीन करण्याचें एक साधन अधिक मिळालेलें असतें हें खरें नाही का? मग कित्येक लोकांचा सौंदर्यासंबंधीं विशेषत: स्त्रियांच्या सौंदर्याविषयीं, एवढा कटाक्ष कां? पुष्कळांना सुंदर बायका स्वत:ला असाव्यात अशी इच्छा असते, पण त्या दुसऱ्यांना सुंदर व आकर्षक दिसू नयेत अशीही त्यांची इच्छा असते, याचा अर्थ काय? वगैरे प्रश्न आरशांत दिसणाऱ्या आपल्या प्रतिबिंबाकडे पाहत असतांना सुंदरपुढे उभे राहिले. परंतु त्या वेळीं ते सोडविण्याच्या भरीस ती पडली नाही. तिच्या डोक्यावरचें फूल जरासें कललेलें होतें तें तिने नीट बसविलें, आणि मग ती खुर्चीवर बसली व आपल्यासाठी कांही पत्र आलेलें आहे की काय याची तिने चौकशी केली. टपाल अद्यापि आलेलें नव्हतें, तेव्हा ती उठून आंत गेली व

चहा पिण्याचा समारंभ चालला होता तेथें जाऊन बसली. चहा पीत असतांनाच तिची मैत्रीण शारदा आली व टपालवाल्याने आणलेलीं तीनचार पत्रें शारदेने तिच्या हातांत दिलीं.

सुंदरने प्रत्येक पत्र खाली वर करून पाहिलें, पण त्यांतील एकावरच तिची दृष्टि विशेष खिळली. त्यावरचें अक्षर तिच्या चांगल्या ओळखीचें होतें. बाकीचीं पत्रें घरांतील दुसऱ्या मंडळीसाठी होतीं. तीं सुंदरने आपल्या आईजवळ दिलीं व शारदेकडे वळून ती म्हणाली, "तूं थोडा चहा घेणार ना?"

"थोडा काय म्हणून?" शारदेने विचारलें. "कुणाचं पत्र आलं आहे तें वाचायची तुला घाई झालेली दिसते. पण त्याचं प्रायश्चित्त मला कां? मला थोडा चहा नाही चालणार हो. पेला भरून पाहिजे चांगला—आणि मला साखर एक चमचा पुरे."

सुंदर हसली. तिने तें पत्र जवळ ठेविलें आणि शारदेला पाहिजे होती तितकी साखर घालून एक पेला चहा करून तिच्या हातांत दिला. पत्राच्या अक्षराकडे शारदेचीही दृष्टि गेली होती. पण ती कांही बोलली नाही. चहा पिऊन झाल्यावर सुंदर व शारदा दोघीही उठल्या व सुंदर ज्या खोलींत अभ्यास करीत असे तेथे गेल्या. शारदेने टेबलावरचें एक पुस्तक हातांत घेतलें व त्या पत्रांत काय मजकूर आहे किंवा तें कोणी लिहिलेलें आहे याच्याशीं आपला बिलकूल संबंध नाही अशा प्रकारें ती त्याचीं पानें चाळूं लागली. पण मधून मधून ती तीव्र नजरेने सुंदरकडे व तिच्या हातांतील पत्राकडे पाहत होती आणि सुंदर पत्र फोडून वाचूं लागल्यावर तिच्या चर्येत जे फेरबदल होत होते तेही तिच्या नजरेंतून सुटले नाहीत. यावरून तें पत्र कोणाचें असावें याची तिने अटकळ बांधली होती व त्यांत कांहीतरी विशेष मजकूर आहे अशी तिची खातरजमा होत चालली होती हें तिच्याकडे पाहिलं की लक्षांत आल्यावांचून राहत नव्हतें. सुंदरने पत्र वाचावयाला सुरवात केल्यापासून पुनः वर मान म्हणून केली नाही. तिने तें प्रथम अथपासून इतिपर्यंत घाईने वाचल्यासारखें केलें आणि शारदेकडे न पाहतां किंवा अवाक्षरही न बोलतां तिने तें पुनः लक्षपूर्वक सावकाशपणें वाचलें

आणि वाचून झाल्यावरसुद्धा शून्य दृष्टीने ती कांही वेळ विचार करीत बसली. शारदा जवळ बसली आहे हें होतें असें त्या वेळीं कोणालाही वाटलें नसतें. पत्र पुढीलप्रमाणें होतें—

"सुंदर, या पत्राखाली माझी सही तुला मिळणार नाही, आणि मी सही कां करीत नाही हें समजण्याइतकें चातुर्य आहे. पण माझी खाली सही नसली तरी हें पत्र मी लिहिलें आहे शंका न येण्याइतकें माझें अक्षर तुझ्या ओळखीचें आहे. तेव्हा आता फारशी प्रस्तावना न करितां मला काय पाहिजे तें स्पष्टपणें सांगतों. एकवेळ तुला मी पुष्कळ पत्रें लिहिलीं होतीं आणि त्यांत तुझ्या सौंदर्याचें काव्यमय, निदान पोरकट वर्णन मी पुष्कळ केलेलें आहे. तसें करण्याला आता मला वेळ नाही व इच्छा पण नाही. तुझें माझें काय नातें आहे हें मी कधी कोणास सांगितलें नाही, किंवा कागदावर लिहिलें नाही. आजही तें मी लिहीत नाही; पण तें नातें सांगण्याइतका भरपूर पुरावा मी मजजवळ ठेवलेला आहे, एवढें सांगितलें तरी तूं मला भलभलत्या शिव्या न देणें हेंच तुझ्या हिताचें आहे. मी तुला लिहिलेलीं सर्व पत्रें एक दिवस तूं मला मोठ्या आनंदाने व अभिमानाने वाचून दाखविलींस. तरुणीच्या आकर्षक मुखाकडे पाहून तरुण कामुक भलभलत्या खोट्यानाट्या गोष्टी गोड भाषेंत बोलतात ही गोष्ट केवळ कालिदासाच्या शकुंतलेला माहीत नव्हती असें नाही तर तुझ्यासारख्या शिकल्यासवरलेल्या, बुद्धिमान व एकंदरींत व्यवहार जाणणाऱ्या मुलीलाही ती माहीत नाही. त्या दिवशीं तूं वाचून दाखविलेल्या पत्रांचें तें पुडकें मी तुझ्याकडून मागून घेतलें आणि पुढे काय झालें हें तुला माहीत आहे. माझ्यावर तुझी असलेली स्निग्ध दृष्टि पालटली व माझ्यासंबंधींच्या कांही कागाळ्या ऐकून तूं माझें नांव सुद्धा सोडलेंस. त्या कांगाळ्या नव्हत्या, खऱ्या गोष्टी होत्या असें तूं म्हणशील; पण त्या तशा असल्या म्हणून माझें नांवसुद्धा सोडून देऊन एका प्रसंगीं तूं माझी चार चौघांत जी शोभा केलीस ती मात्र मी कधीही विसरणें शक्य नाही. तूं जरी माझें नांव टाकलेंस तरी तुझें नांव घेणें—नव्हे काढणें—एवढीच गोष्ट माझ्या हातीं राहिली आहे; आणि ती करण्याचा

माझा विचार आहे हें या पत्रावरून तुझ्या लक्षांत येईल. सुंदर, मला पुनः तुझ्या स्नेहाची इच्छा आहे. तुझ्या अनुपमेय सौंदर्याची मला पुनः अभिलाषा उत्पन्न झाली आहे. तूं माझी व्हावीस ही माझी आकांक्षा मध्यंतरीं लोपली होती, पण ती पुनः बळावली आहे. आणि ती जर पूर्ण झाली नाही तर तुझ्या जन्माचा सत्यानाश कसा करावा याचीही योजना माझ्याजवळ आहे. तेव्हा माझी व तुझी पुन: जर गाठ पडली तर मजबरोबर तूं पूर्वीप्रमाणें बोललें चाललें पाहिजेस; जर तुझ्याबरोबर तास दोन तास हिंडण्याफिरण्याची माझी लहर लागेल तर तूं त्याला तयार होणें इष्ट आहे. आपलें भांडण तिसऱ्याला कोणाला-ही माहीत नाही आणि म्हणून तुझी माझी गाठ पडल्यावर पूर्वीची मैत्री चालू राहिली असेंच सर्वजण समजतील. तेव्हा सुंदर, आगाऊ सूचना म्हणून हें पत्र पाठवीत आहें.

" माझें पत्र वाचून तूं म्हणशील की हें पत्र प्रणयी माणसानें लिहिलेलें नाही. तुझी समजूत बरोबर आहे. पण ज्यानें हें लिहिलें आहे तो, तूं आपला अपमान केलेला आहेस, हें विसरलेला नाही. तूंही मला कांही पत्रें लिहिलेलीं होतींस तीं मी जतन करून ठेविलेलीं आहेत. तारुण्यांत डोळयांना जो विकार होतो त्याला प्रेम हें जबरें नांव देऊन त्यासंबंधी कागदावर अक्षरांनी काढलेलीं पोरकट चित्रें अंत:करणाचें काव्य म्हणून उराशीं बाळगण्याइतका मी वेडा नाही. पण तुझ्या पत्रांना जरी मी काव्य समजत नसलों तरी त्यांचा उपयोग मला तूं स्वत:वर दिलेल्या ब्यांकेंतील चेकप्रमाणें करतां येईल हें मला पक्कें समजतें. तसा त्यांचा उपयोग करावा अशी माझी खरोखर इच्छा नाही. माझ्या फजितीची नुकसानभरपाई माझ्या मनाप्रमाणें झाली म्हणजे हीं तुझीं सर्व पत्रें रस्त्यांत मिळणाऱ्या नाटकसिनेमाच्या जाहिरातीप्रमाणें मी फाडून किंवा तशींच फेकून देईन. पण मी काय करणार हें तूं काय करणार यावर अवलंबून आहे. हिंदु समाजांत स्त्रीचें नुकसान करणें ही गोष्ट पुरुषाला फार सुलभ आहे; आणि तुझ्यासारख्या आधुनिक म्हणून मिरवणाऱ्या पोरीची जर फजिती उडाली, तिच्यावर जर टपका आला तर निदान तूर्त तरी तिला समाजाकडून सहानुभूतीचा लवलेशही मिळणार नाही. या सर्व

गोष्टींचा नीट विचार कर. मी तुला आठ दिवसांची मुदत देतों. त्यानंतर केव्हाही आणि कोठेही माझी गाठ पडण्याचा संभव आहे. त्यासाठी तयार रहा. तूं मला झिडकारलेंस, तूं माझी फजिती उडविलीस म्हणून जी मंडळी मला हसली त्यांच्या डोळ्यांना जो देखावा दिसेल त्यावरून त्यांचें हसें आंतल्या आंत जिरून ते माझ्या आकर्षकतेने झालेली तुझी अंकित वृत्ति पाहून माझ्याकडे आश्चर्यानें व म्हणून आदराने पाहूं लागतील, असें होण्याला मला साहाय्य कर. हें जर न होईल—पण तें येथे लिहिण्याची जरूरी नाही. आपल्या भोवती दिवे ओवाळून घेण्याची ज्यांना फार सवय लागते त्यांच्या, एखादा दिवा भडकून आपलें अंग भाजणें शक्य आहे, ही गोष्ट लक्षांत येत नाही. पण अशा मूर्ख अहंमन्य माणसांच्या कोटींत समंजस मुलीला घालण्याला मी तरी तयार नाही. आपला स्नेह दोन वर्षांपूर्वी तुटला. पण आता मला स्नेहाची अपेक्षा नाही. तो तुटल्यामुळे माझ्या अंत:करणाला वेदना झाल्या असें मला वाटत नाही. पण तो तुटल्यामुळे माझी मानहानि झाली यांत शंका नाही. त्या मानहानीची नुकसानभरपाई करून घेण्याचा माझा निश्चय झालेला आहे."

अर्थात्, पत्रांतील मजकूर कळल्यानंतर सुंदर त्या पत्राकडे शून्य दृष्टीने पहात व विचार करीत बसली, याबद्दल कोणालाही नवल वाटण्याचें कारण नाही. शारदा कांही वेळ अवाक्षरही बोलली नाही. मग ती म्हणाली, "सुंदर !"

सुंदरने दचकल्यासारखें करून वर पाहिलें. मग ती किंचित् हसली, तिने त्या पत्राची घडी केली व तें पाकिटांत पुन: घातलें व पोलक्याच्या खिशांत तें पाकीट ठेवून दिलें. मग ती म्हणाली, "मी हें पत्र वाचायच्या नादांत तुला अगदी विसरलें! चहा झाला ना तुझा ?"

"म्हणजे? चहा आटपून नाही कां आपण इथं आलों? त्या पत्रानं तुला एवढं कां बेभान केलं ?"

"मी बेभान व्हावं असं त्या पत्रांत कांही नाही." सुंदर हसत

हसत जरा मोठ्यानें बोलली. "पण मूर्खपणाला वाटेल त्या दिशेनं फाटे फुटतात एवढं मात्र हें पत्र वाचून लक्षांत आलं."

"मूर्खपणाचे फाटे तोडून टाकणं कठीण नसतं." शारदा म्हणाली. "पण दुष्टपणाला जे फाटे फुटतात त्यांच्याशीं वागतांना सावध असावं लागतं."

"खरंच, शारदे! आता मला समजलं. पत्राचं अक्षर तुला दिसण्यासारखं होतं. तें अक्षर तुझ्या ओळखीचं आहे. तेव्हा आता तुला तें पत्र दाखवायला कांही हरकत नाही."

"हरकत एकच आहे," शारदा म्हणाली. "तुझं पत्र मी वाचणं बरं नव्हे.

"ही हरकत फारशी मोठी नाही. मी होऊन तुला तें वाचायला देतें. तूं तें वाचलंस म्हणून कांही बिघडत नाही. पण पत्र कुणाचं हें तुला समजल्यानंतर त्यांतील मजकूर तुला माहीत नसावा हें मला बरोबर वाटत नाही. तें वाचायची तुझी इच्छा नाही; पण त्याबद्दल तर्ककुतर्क तुझ्या मनांत आल्याशिवाय राहणार नाहीत. तेव्हा हें पत्र तूं वाचलं पाहिजेसच."

असें म्हणून खिशांतून पत्र बाहेर काढून सुंदरने तें आपल्या मैत्रिणीच्या हातांत दिलें. शारदेने तें वाचलें आणि वाचतां वाचतां तिचा चेहरा कावराबावरा होऊन शेवटीं तर ती संतापाने लाल झाली. ती म्हणाली, "सुंदर, याबद्दल काय करायचा तुझा विचार आहे?"

"काल सहा नव्या प्लेटी आणलेल्या आहेत. त्यासाठी ग्रामोफोन लावण्याचा माझा विचार आहे." सुंदर हसत हसत उठली.

---

## प्रकरण चवथें

# संकटाशीं टक्कर

सुंदरचें तें हास्य पाहून शारदेच्या मुखावर आश्चर्यानें आपलें जाळें पसरलें. पत्रांतील मजकूर एवढा भयंकर होता तरी त्यामुळें आपल्याला कसलीही भीति वाटत नाही, एवढें दाखविण्यासाठी असें वागणें शारदेला पसंत नव्हतें. निदान आपल्याबरोबर सुंदरनें तसें वागण्याचें कारण नाही असें तिला वाटलें. आपली मैत्रीण वरवर किती जरी हसली, तें पत्र खिशांत ठेवून निश्चिंतपणें ग्रामोफोन काढून तो लावण्यासाठी म्हणून ती जरी उठली, तरी तें पत्र—आणि तें पत्र लिहिणारा माणूस–या दोघांचीही उपेक्षा करून चालणार नाही एवढें सुंदरला मनांतून पटलेलें असलें पाहिजे याबद्दल तिला शंका नव्हती. आता सुंदरचा स्वभाव भित्रा नव्हता व अशा प्रसंगीं प्रतिपक्षाबरोबर दोन हात करण्याची तिच्या वृत्तींत धमक होती; इतर मुलींप्रमाणें, ती कांही असा प्रसंग आल्याबरोबर गडबडून जाण्यासारखी नव्हती, हें शारदेला माहीत नव्हतें असें नाही. परंतु या विचित्र जगांत कुमारि-केला प्रतिपक्षाशीं लढतांना समाजाकडून सहानुभूति तर मिळत नाहीच, पण उलट तिरस्काराचा अहेरच मिळतो, हेंही तिला माहीत होतें; आणि म्हणूनच तिच्या अंतःकरणाला तें पत्र वाचून जसा चटका बसला तसें भयही वाटलें; आणि सुंदरचा हात धरून ती म्हणाली, "सुंदर, ग्रामोफोन जरा राहूं दे. अगोदर यासंबंधीं आपण काय तें ठरविलं पाहिजे."

सुंदर पुनः खाली बसली आणि म्हणाली, "माझं पत्र मी दिल्यावरसुद्धा वाचतांना तुला संकोच वाटला होता, पण तें वाचल्यावर माझ्यापेक्षा तूंच गडबडून गेलेली दिसतेस. पण खुळे, त्या पत्रानं आपण गडबडून जावं असं त्यांत काय आहे? एका हलकट, पाजी माणसानं आपलं हीन अंतःकरण त्या पत्रांत व्यक्त केलं आहे. ज्या

दिवशीं, तो हलकट होता असं मला कळून त्यासंबंधीं माझी खात्री झाली, त्या दिवशीं मी त्याच्याशीं असलेला माझा परिचय तोडून टाकला."

"सुंदर," शारदा संचितपणें बोलली, "या पत्रावरून तरी त्या परिचयाचं स्वरूप अगदी साधं नसावं असं वाटतं."

सुंदर हसली, जरा मोठ्यानें हसली. शारदेनें मान खाली घातली होती; तिच्या हनुवटीला धरून ती सुंदरनें वर केली. "शारदे," सुंदर म्हणाली, "माझ्याकडे पहा ना! तूं काय बोललीस आणि मान लागलीच खाली कां घातलीस? जें बोललीस तें मला लागण्यासारखं बोललीस असं तुला वाटलं ना? पण गडे, मला कांही लागलं नाही; तुझ्यासारखी माझी पुष्कळ दिवसांची मैत्रीण मला कांही टोचून बोलणार नाही हें मला माहीत आहे. पहा, माझ्या डोळ्यांकडे पहा. डोळ्यांत अंतःकरण प्रतिबिंबित होतं म्हणतात. माझ्या डोळ्यांकडे पहा आणि माझ्या अंतःकरणाची परीक्षा कर. त्याच्याशीं माझ्या परिचयाचं स्वरूप साधं नसावं असं त्या पत्रावरून तुला वाटतं; पण तूं आज मला इतकीं वर्षं ओळखतेस, पुष्कळ वेळां आपण आपलीं अंतःकरणें एकमेकांना खुलीं केलेलीं आहेत; माझा स्वभाव, माझं वागणं हें सर्व तुला माहीत आहे. मग सांग पाहूं, त्या पत्रावरून तुला वाटलं त्याबद्दल तुला खात्री वाटते का?"

आता शारदेनें हसण्याचा प्रयत्न केला पण तो फारसा साधला नाहीं. तिच्या मुखावर एक प्रकारची खिन्नता पसरली होती. ती म्हणाली, "गडे सुंदर, मला फार काळजी वाटते, फार भय वाटतं, आणि तो मेला मोठा नष्ट आहे—"

"तें सगळं खरं, पण जशी तुला काळजी वाटते तशी माझ्याबद्दल खात्री नाही कां वाटत?"

शारदेनें कांही उत्तर दिलें नाही, तेव्हा सुंदर पुढे म्हणाली, "मी ज़ास्त मोकळेपणानें वागतें ही गोष्ट खरी आहे; हें पत्र त्या तशा कांही अंशीं परिणाम आहे हेंही मी कबूल करतें. पण हें

पत्र तें लिहिणाऱ्याच्या हीन, दुष्ट मनोवृत्तींचा परिणाम आहे हेंही अधिक खरें, निदान बऱ्याच अंशीं खरें नाही कां ? दुसऱ्याच्या परसांतला पिकलेला कलमी आंबा पाहून तो तोडायची बुद्धि व्हावी हा त्या आंब्याचा दोष असं एकपरीनं म्हणतां येईल; पण तो जर कोणी तोडला तर त्याला समाज चोरीबद्दल शासन करतो; जगांत कलमी आंबे नसावेत असा कांही कायदा समाज किंवा सरकार करीत नाही. मग एखाद्या हलकट माणसाने असलं पत्र लिहावं याबद्दल माझ्या मोकळेपणाच्या वागण्याला दोष न देतां त्या माणसाला शासन करणं रास्त नाही का ? का माझ्या मोकळेपणाच्या 'परिचयाचं साधं नव्हे असं स्वरूप' म्हणावं ?"

हें वाक्य सुंदर बोलली आणि शारदेच्या डोळ्यांतून पाणी बाहेर पडलें व आलेला हुंदका दाबीत ती म्हणाली, "माझा तसा हेतु नव्हता, सुंदर!"

"तुझा तसा हेतु मुळीच नव्हता हें मला माहीत आहे, आणि म्हणून मी जें बोललें, तें तुला टोचून बोलण्यासाठी बोललें नाही; तर या कामांत तूं मला साहाय्य करावंस म्हणून बोललें. वेडी कुठली! अगोदर डोळे पूस. मला तूं कांही वाकडें बोललीस असं तुला वाटून हे तुझे अश्रु बाहेर पडले. पण वेडे, मला असं वाटेल तरी कसं? या पत्रानं मला खरोखर भीति वाटली नाही. आता या नव्या कालांत स्त्रियांनी दुष्टांना भितां उपयोगी नाही, तर त्यांच्या दुष्टपणाचं परिमार्जन करायला शिकलं पाहिजे, हें तुला मान्य आहे ना ?"

शारदेने डोळे पुसले पण तिच्या चर्येवरचा गंभीरपणा तसाच होता. ती क्षणभर स्तब्ध राहिली आणि मग म्हणाली, "सुंदर, मी कांही या तात्त्विक प्रश्नांचा विचार तुझ्यासारखा केलेला नाही; आणि वादविवादांत माझा कांही तुझ्याबरोबर निभाव लागणार नाही. अशा प्रसंगीं लोकांनी काय करावें हें तुझं तत्त्व मला कबूल आहे. पण तेवढयानं भागत नाही. लोक काय करतात हें विसरून कसं चालेल ? तुझाच दृष्टांत मी उलट मांडतें. समाज आंबा चोरणाऱ्याला चोरीची

शिक्षा करतो; पण स्त्रीची अब्रू घेणाऱ्या हलकटाचा प्रश्न येतो तेव्हा त्याचा ठपका स्त्रीवर तोच समाज ठेवतो ही गोष्ट खरी ना? ती रास्त नसेल, ती न्यायाची नसेल, पण ती खरोखर आहे ना?"

"तूं वादविवादांत कांही अगदी मागसलेली नाहीस. शारदे, तूं म्हणतेस त्याप्रमाणे ती गोष्ट रास्त नाही पण आस्तित्वांत आहे हें खरं. पण याचं कारण नाही कां तुझ्या लक्षांत येत? जिथं बहुतेक अंमलदार मोटारींत बसतात तेथे मोटार हाकणाऱ्यांनी गुन्हे केले म्हणजे रस्त्याने चालणाऱ्यांना वर्तमानपत्रेंसुद्धा व्याख्यानं देऊं लागतात, व मोटारखाली मेलेला मनुष्य अपघातानं मेलेल्यांत जमा होऊन त्याच्या मरणाला कारणीभूत होणारा मनुष्य दंड देऊन सुटतो! पण स्वतःच्या बायकोच्या घाला घालणाऱ्यावर एखाद्यानं जर प्राणघातक हल्ला रागाच्या आवेशांत केला तर त्याला निदान जन्मठेप झाल्या-शिवाय राहत नाही. मोटारीचा वेग एकाएकी थांबवतां न येणाऱ्यापेक्षा रागाचा वेग थांबवितां न येणारा ज्यास्त गुन्हेगार कां ठरावा? याचं कारण अगदी उघड आहे. बलिष्ठांच्या दुर्गुणाकडे समाज व कायदा नेहमी सौम्य दृष्टीने पाहतो. स्त्री व पुरुष यांत आजपावेतो पुरुष बलिष्ठ आहे म्हणून त्याच्या नीचपणाकडे समाज कौतुकानं नसला तरी (पुष्कळ वेळां पाहतो) सदयतेनं पाहतो; पण स्त्री अबला असल्यामुळे तिनं धैर्य किंवा निर्भयता असले सद्गुण दाखविले तरी ती स्त्रीस्वभावाविरुद्ध वागते असा तिच्यावर आरोप येतो. पण हा मनु बदलला पाहिजे व तो बदलायला सुरवात झालेली आहे."

"तुझं सगळं व्याख्यान मी लक्षपूर्वक ऐकलं, सुंदर; तूं जें जें म्हणतेस तें मला जरी मान्य असलं, बरोबर वाटत असलं, तरी त्यामुळे हा चांडाळ तुझी अब्रू घेऊं शकेल ही स्थिति कांही बदलत नाही. सध्याच्या परिस्थितीचीं कारणं शोधून काढलीं म्हणजे ती परिस्थिति बदलते असं थोडंच आहे."

"पण ती बदलायला सुरवात करण्यासाठी तीं कारणं तर माहीत झालीं पाहिजेत--"

"खरं आहे, पण तीं कारणं कांही एका क्षणांत नाहीतशीं होत नाहीत, आणि तीं नाहीतशीं होईपर्यंत जे जे प्रसंग ओढवतील त्यांच्याशीं कसं तोंड द्यावं हा प्रश्न कांही या कारणमीमांसेनं सुटत नाही."

"तुझं म्हणणं बरोबर आहे. पण हा गधडोबा काय करील असं तुला वाटतं?"

"त्याला गधडोबा म्हणून समाधान करून घेऊं नकोस. तो गाढव म्हणजे मूर्ख नाही. त्याला अक्कल आहे आणि त्या अकलेच्या जोरावर तुझ्यासंबंधीं वाटेल तसला गैरसमज तो लोकांत उत्पन्न करील; हव्या त्या कंड्या उठवील—"

"पण लोक त्यावर विश्वास ठेवतील कां?"

"तूं चांगली शहाणी आहेस, पण इथंच तुझी चुकी होते. लोक तो म्हणेल त्यावर विश्वास ठेवतील आणि तुझ्यावर बिलकूल विश्वास ठेवणार नाहीत."

"त्याचं कारण—"

"त्याचं कारण सांगण्यासाठी तूं आणखी व्याख्यान देऊं नकोस. तूं दिलेल्या व्याख्यानावरून त्याचं कारण मला समजलं. पण कारण समजल्यानं कार्य नाहीसं होत नाही. त्यानं पत्रांत जो मजकूर लिहिला आहे तोच चार लोकांत जाऊन सांगितला तर तुझी स्थिति काय होईल? उद्यां तुझं लग्न ठरलं—"

"माझं लग्न ठरलेलं नाही—"

"तें मला माहीत आहे, पण समज तें उद्या ठरलं आणि वाङ्‌निश्चित वराला या पाजी माणसानं तुझीं तीं पत्रं नेऊन दाखविलीं तर काय होईल असं तुला वाटतं—?"

"तो वर माझ्यावर प्रेम करणारा असेल तर त्याचं मन बदलणार नाही."

"सुंदर, सुंदर, हें तत्त्वज्ञान निरुपयोगी आहे. तो वर जेव्हा

प्रथम प्रेमानं भारून जाईल त्या वेळीं तो तुला सर्व सद्गुणांची पुतळी समजेल. पण हीं पत्रं त्याच्या हातीं गेलीं--"

"आणि मग जर त्याचं मन चंचल झालं तर अशा चंचल पुरुषाची मला मुळीच परवा नाही. त्याच्या तावडींत वेळेवर माझी सुटका झाली यांतच मी आनंद मानीन."

"मी पुन: सांगतें हें तत्त्वज्ञान निरुपयोगी आहे. तत्त्वज्ञानाची रचना तत्त्वावर झालेली आहे. व्यवहाराची रचना मनुष्यस्वभावावर झालेली आहे. तत्त्वज्ञानाचा हेतु मनुष्यस्वभावाला जिंकून तत्त्वप्राप्ति करून घेण्याचा आहे, पण त्याचमुळे तत्त्वज्ञानाचे सिद्धांत न्यायाचे व खरे असूनही व्यवहारांत त्यांचा खरेपणा किती अनुभवाला येतो? जिथं खोटेपणानं फायदा होतो तिथं खरेपणानं वागून तोटा सोसण्याला फारच थोडे लोक तयार असतात यांत नवल नाही."

"नवल आहे तें हें की तुझ्यासारखी शहाणी मुलगी या विचार-सरणींतून सुटका नाही असं समजते. शारदे, दा होतो, पण तो क्षणिक असतो."

"असं तत्त्वज्ञान सांगतं. पण मुळीं हा देह आणि हा संसार क्षणभंगुर; तेव्हा त्या क्षणापुरता तो फायदा पुरला म्हणजे मनुष्य पुढची फिकीर करीत नाही. ही जरी फार दु:खाची गोष्ट असली तरी ती खरी आहे."

"इथं तूं मला अडवलंस यांत शंका नाही. पण क्षणिक हिताची परवा न करतां तत्त्वांची कास धरणारे कांही धीर पुरुष--आणि पुरुष म्हणजे स्त्रिया व पुरुष--होतात आणि त्यांचीं चरित्रं वाचून आपणांला विस्मय वाटतो, आनंद होतो, आपण त्यांत तल्लीन होतों. तो आनंद व्यवहारी माणसांच्या कृतीनें होत नाही. तेव्हा हा क्षणिक सुखाचा मार्ग रास्त तर नाहीच, पण व्यवहाराच्या उच्च कल्पनेलाही अनुसरून नाही आणि म्हणून--"

"आणि म्हणून हा वाद आपण येथेंच थांबवूं आणि, आज हा माणूस धमकी देतो त्याप्रमाणं जर तो वागला तर तूं काय करणार हें मला सांग."

"मी काय करीन हें तो काय काय करील यावर अवलंबून आहे. पण तुला खरोखर सांगतें, मला त्याची भीति वाटत नाही."

"प्रत्यक्ष प्रसंग आला म्हणजे ती वाटेल."

"शारदे, दुखणं आल्यावर तें नाहीसं करण्यासाठी उपाय-योजना करणं म्हणजे दुःखाची भीति वाटणं नव्हे. तर दुखणं येणार या भयानं तें येण्यापूर्वीच मरणं याचं नांव दुखण्याची भीति वाटणं."

"पण दुखणं येणार हें समजल्यावर तें येऊं नये म्हणूनही उपाय करतात."

"खरं आहे; उपाय स्वाधीन असले तर करतात, पण या दुखण्याची गोष्ट पराधीन आहे. हा माणूस जर पाजीपणानं वागणार नाही, तर दुखणं येणार नाही; पण तो कसा वागेल हें मला किंवा तुला कसं कळणार व टाळतां येणार? तेव्हा तूं माझ्यासाठी इतकी अधीर व कष्टी होऊं नकोस. मी या गोष्टीचा विचार करतें. लागेल तेव्हा तुझी आणि दुसऱ्या कोणाची मदतही मागायला मी कांकूं करणार नाही हेंही तुला सांगून ठेवतें. या माणसानं तूं म्हणतेस त्याप्रमाणं खोटया कंडया उठविल्या, माझ्यावर भलते आरोप केले, तर मोठा अवघड प्रसंग येईल हें मी जाणून आहें. पण मी जी आतापर्यंत वागत आलें आहें ती कांही तत्त्वांना अनुसरून वागत आलें आहें. त्या तत्त्वांच्या खरे-पणावर माझा विश्वास आहे. शिवाय त्या तत्त्वांच्या नांवाखाली लोकांत ज्याला स्वेच्छाचार म्हणतात त्याचा अवलंब मी केलेला नाही हें मी सांगितल्याशिवायही तुला माहीत असलं पाहिजे, निदान सांगित-ल्यावर तरी मान्य झालं पाहिजे--"

असें म्हणून ती थांबली आणि शारदाही कांही न बोलतां स्तब्ध बसली. मग सुंदरने उठून ग्रामोफोन आणला व त्याला किल्ली देऊन

व सुई लावून नवीन आणलेल्या प्लेटींपैकी एक प्लेट सुरू केली. अलीकडे प्रसिद्धीला आलेल्या एका गाणाऱ्याने फार सुंदर प्रकारें म्हटलेलें तें गाणें होतें. तें खडया सुरांत म्हटलें होतें त्यामुळे त्याच्या गोड आवाजाने क्षणभर का होईना वातावरण भरून गेलें; तें गाणें एका उत्तम कवीने रचलेलें होतें त्यामुळे आलापांबरोबर त्यांतील अर्थाच्या सौंदर्याने त्या दोन सुजाण मुलींचीं अंतःकरणें प्रसन्न होऊन गेलीं आणि त्या प्रसन्नतेच्या भरांत एवढा वेळ चाललेला वादविवाद त्या विसरून गेल्या.

त्या सहा प्लेटींवरील बाराही गाणीं एका मागून एक अशीं ग्रामोफोनवर लावलीं आणि त्यांतील दोन तीन तर दोन दोन वेळां लावलीं आणि अशा प्रकारें तत्त्वज्ञानाच्या व व्यवहाराच्या कर्कश वादाने संतप्त झालेलीं त्यांचीं डोकीं एक तासभर कौमुदीच्या वर्षावाने व्हावीत त्याप्रमाणे थंड झालीं. नव्या प्लेटींचें गाणें आटोपल्यावर शारदा जावयास उठली व आपल्या मैत्रिणीचा निरोप घेतांना तिला त्या पत्राची व त्यावरून उत्पन्न झालेल्या विवादाची आठवणही नव्हती असें दिसलें.

सुंदरच्या मनांत मात्र शारदा गेल्यावर त्या पत्रासंबंधीं पुन: विचार आले. तिने तें पत्र एकदा शांतपणें वाचलें. जगांतल्या प्रत्येक कृतीला, कर्माला फळ असतें हें तिला माहीत होतें. कृति बुद्धिपुरस्सर असो, किंवा चुकून झालेली असो, अगर आपोआप घडलेली असो, तिचें फळ मिळाल्यावाचून राहत नाही. मग त्या फळासंबंधीं तक्रार करणें म्हणजे वेडेपणा होय, भित्रेपणा होय, हेंही ती जाणून होती. आणि ती भित्री नव्हती म्हणून प्रसंग येईल तेव्हा त्याला तोंड देण्याचा तिने निश्चय केला.

---

## प्रकरण पांचवें

# लोहगडची सफर

आमच्या परिचयाच्या झालेल्या कित्येक मंडळींनी ही जी लोहगडची सफर केली ती विद्यार्थ्यांची अशी सफर नसून तींत बरीच मंडळी एकमेकांच्या नात्याची होती, आणि बाकीची तींत स्नेहसंबंधामुळे सामील झालेली होती. त्यामुळे सफर जरी खरोखर घरगुती होती तरी तिला कॉलेज ट्रिपचें स्वरूप आलेलें होतें. मंडळींत दोनतीन थोडीशीं वडील माणसेंही होतीं. पण त्यांच्या विचारांची आधुनिकता केवळ नामधारी नसल्यामुळे आपल्यापेक्षा वयानें लहान मंडळींना अशा प्रसंगीं संकोच वाटूं नये, अशाच प्रकारें त्यांची वागणूक होती. बरोबरचे बाळगोपाळ कितीही हसले, खिदळले, वेळीं प्रसंगीं त्यांनी कांही उच्छृंखळ कोटया केल्या तरी त्यामुळे 'हा सारा आजकालच्या शिक्षणाचा परिणाम' असें म्हणून डोक्यांत राख घालून घेण्यासारखी त्यांची मनोवृत्ति नव्हती. मुलें पोरकट असणें याचें त्यांना आश्चर्यही वाटत नव्हतें किंवा भयही वाटत नव्हतें. पुण्याहून येऊन मंडळींनी लोणावळा येथे मुक्काम केला आणि तेथून लोहगडचा किल्ला, कार्ल्यांचीं लेणीं वगैरे ठिकाणें पाहावयाचीं असें त्यांनी ठरविलें. आज ते लोहगडला चालले होते.

विश्वनाथ आणि मोहन दुसऱ्याच रस्त्याला लागले आणि त्यांच्या बरोबरची मंडळी बरीच दूर राहिली. कोणताही किल्ला चढण्याला एकच वाट असत नाही, पण सर्वमान्य अशी एकच वाट असते हें खरें, व तोच प्रकार लोहगडचा आहे. मधून मधून जवळची वाट काढण्याचा मोह हा बहुधा कोणालाही आवरत नाही. आता अगदी पहाटे उठून ही मंडळी कार्ल्यापासून लोहगडचा रस्ता चालूं लागली व तासाभरानें पाठीमागे पूर्व दिशा आरक्त झाली असें त्यांनी पाहिलें. भाजें गाव ओलांडून पहिला चढ चढल्यावर बरीच झाडी

लागली व या झाडींतून जातांना आपले दोन तरुण मित्रही इतर मंडळीपासून दुरावले, आणि मध्ये मध्ये बराच वेळ थांबणें, एखाद्या झाडाचें निमित्त करून तेथे उगाच वेळ काढणें असा प्रकार होत असल्यामुळे त्यांच्या प्रगतीचा वेगही बराच मंदावला होता. एवढ्या लांबवर पल्ला मारण्याची मोहनला सवय नव्हती, त्यामुळे वरचेवर तो दमे व एकदा दोनदा तर तो नुसता थांबून राहिला नाही, तर खाली बसला व खाली बसल्यावर क्षणभर आडवासुद्धा झाला. विसू त्याला म्हणाला की, परत जातांना तोंडावर ऊन आहे, तेव्हा असें रेंगाळून चालणार नाही. पण मोहनने रोखठोक उत्तर दिलें की, सध्या आपल्यापुढे वर चढण्याचा प्रश्न आहे, परत नाही. आणि तूर्त सूर्य पाठमोरा आहे, तेव्हा परत जातांना तो कसा असेल याची आता फिकीर करण्याचें कारण नाही. मग कांही वेळ विचार करून तो म्हणाला, "हें पहा विसू, आपण लोहगडवर संध्याकाळपर्यंत राहूं आणि सूर्यनारायणाची स्वारी पूर्वेकडून पश्चिमेकडे स्थिर झाली असें पाहून त्याच्याकडे पाठ वळवून चालावयास लागूं, म्हणजे आता उन्हाचा त्रास नाही, तसाच परत जातांनाही होणार नाही." विसू हसला आणि म्हणाला, "पण कांही झालं तरी आमचा नाजूक बाळ कांही झपाझप पाऊल टाकणार नाही. किल्ल्यावर दिवसभर राहण्याच्या तयारीने आपण आलों नाही हें तुला माहीत आहे ना?" मोहनने उत्तर न देतां डोळे झाकले व तो या कुशीचा त्या कुशीवर झाला.

कांही वेळाने तो उठला व ते पुढे चालूं लागले. ऊन जरी पाठमोरें होतें तरी दिवस जसजसा वर येऊं लागला तसतशी त्यांची पाठ गरम होऊं लागली. कांही झालें तरी ते फारच लौकर निघाले होते, त्यामुळे गडाच्या पायथ्याशीं उन्हाचा कडाका होण्यापूर्वी ते आले. शिवाय पायथा येण्यापूर्वी मैल दीड मैल चांगली झाडी होती त्यामुळे तेथे उन्हाचा त्रास होण्याचा प्रश्न राहिला नाही. पण तसल्या सकाळच्या वेळींसुद्धा मोहनला तहान लागली. गडावर पाणी चांगलें आहे तेव्हा तेथे गेल्यावर तोंडांत कांही तरी टाकून पाणी प्यायला मिळेल असें विश्वनाथाने सांगितलें. जेथे हे दोघे येऊन पोचले होते

तेथे समोर किल्ल्याची प्रचंड नैसर्गिक काळी फत्तर भिंत दिसत होती व किल्ल्याचा दरवाजाही दिसत होता आणि त्यांच्या बरोबरची मंडळी त्या दरवाजांत पोचली होती. तेथून त्यांनी मोठयाने आरोळी दिली. ती ऐकून मोहनलाही नवें अवसान चढलें; त्याने व विश्वनाथाने उलट आरोळी दिली व ते भरभर चढूं लागले. चालतां चालतां मध्येच "हुश्श!" करून मोहन थांबला आणि पुढे चाललेल्या विश्वनाथाला त्याने हाक मारली. तो म्हणाला—"ए विशा, जरा थांब; कायरे हा किल्ला! कसा अगदी दुर्भेद्य दिसतो. हा तर कांही माणसाने केलेला नाही; नैसर्गिक आहे. बायकांचं अंतःकरण अगदी या तटासारखं, काळंकभिन्न आणि केवळ दुर्भेद्य आहे असं नाही तुला वाटत—?"

"मी येथे काव्य किंवा तत्त्वज्ञान यांच्या चर्चेसाठी आलों नाही;" विश्वनाथ मागे वळून म्हणाला, "पण तुझं म्हणणं मात्र मला मान्य नाही. अंतःकरण तर काळंकभिन्न असेल तर त्याच्या वाटेला जा तरी कशाला? तेव्हा मग तें दुर्भेद्य आहे का नाही हा प्रश्नच उरत नाही."

"तर मग तुझं म्हणणं तें काळंकभिन्न नाही?"

"अरे बाबा, जरा झपाट्यानं पाऊल टाक. ते पहा, बुरुजांत दरवाजावर सगळे आरोळ्या मारताहेत. आपण दोघेच मागं राहिलों. ती पहा तुझी सुंदर—तुझी म्हणजे—म्हणजे तुला माहीतच आहे—"

"मला कांही माहीत नाही आणि सुंदर माझी कोणी नव्हे आणि मी तिचा कोणी नव्हे."

"हं, आता बरोबर!" विश्वनाथ हंसला; "स्त्रियांचें अंतःकरण या तटाप्रमाणं काळंकभिन्न आणि दुर्भेद्य असतं या तुझ्या म्हणण्याचा अर्थ आता समजला. एकंदरींत तुझ्या हृदयदेवतेने तुझ्या भक्तीची अवहेलना केली; आता वर गेल्यावर तिला विचारतों."

"छे:! तिला कांही विचारूं नकोस!"

"तूं कोण मला सांगणार? मी पाहिजे त्याला पाहिजे तें विचारीन."

"ठीक आहे; तूं पाहिजे त्याला पाहिजे तें विचार, पाहिजे तें कर; मी कांही इथून आता पुढं पाऊल टाकीत नाही."

"म्हणजे इतका दमलास?"

"ठीक आहे, माझी चेष्टा कर हवी तर, पण वर गेल्यावर नुसता वात्रटपणा करून तुला माझी रेवडी उडवायची असेल तर मी इथंच बसतों तुम्ही सर्व परतेपर्यंत."

"म्हणजे हा सत्याग्रह होईल तुझा!"

"सत्याग्रह होवो किंवा अत्याग्रह होवो. सर्वांच्या देखत कांही तरी टारगटपणाचे प्रश्न सुंदरला विचारून तूं माझी फजिती उडविणार असशील तर मी तरी त्यांत पडणार नाही."

"अस्सं. तूं आपला इथं बसून राहणार. आणि इथं तूं अगदी एकटा. वाघ आला तर?"

"असा सकाळीं वाघ येत नसतो; आणि आला तर आला. माझं नशीब माझ्याबरोबर."

"अरे वा तुझा हा सत्याग्रह प्राणत्यागापर्यंत आला! चल. तें कांही चालणार नाही. तुझं नशीब तुझ्याबरोबर असं चालणार नाही. तूं आमच्या बरोबर आलेला आहेस. तुझ्या कपडयांचं आणि फराळाचं गांठोडं जसं आमच्याबरोबर आहे तसं तुझ्या नशिबाचं गाठोडंही आता आमच्याच बरोबर आहे. आणखी हें पहा, मी सगळयांदेखत तुझी फजिती काय म्हणून करीन? मी सुंदरला अगदी 'जनांतिकम्' विचारीन, मग तर झालंना?"

"पण हा अव्यापारेषु व्यापार तुला कुणी सांगितला आहे?"

"असं कसं म्हणून चालेल? तूं माझा दोस्त. माझी परीक्षा पास झाली आणि तुझी झाली नाही तर मी पेढे खाणार नाही आणि तुझी पास होऊन मी नापास झालों तर तुला खाऊं देणार नाही; असा अपला समवेत समवाय संबंध आहे. तुझी आणि सुंदरची गडी फू

झालेली दिसते. तें माझ्यानं कसं पाहवेल ? मी तुमच्यांतलं वितुष्ट नाहीसं करतों."

"अरे, पण आमच्यांत वितुष्ट नाही."

"तिच्या · काळंकभिन्न म्हणणं हें काय वितुष्ट नसल्याचें लक्षण ?"

"वारे वा ? मी तिच्या अंत:करणाचं नांव तरी घेतलं ? मी आपला सर्व स्त्रियांबद्दल बोलत होतों." मोहन चालूं लागला.

"मोठा शहाणाच तूं ! काय रे तुला माहिती आहे सर्व स्त्रियांबद्दल ? उचलली जीभ लावली टाळ्याला ! अरे, एका पोरीच्या अंत:करणाचा तुला थांग नाही, तर सर्व स्त्रियांबद्दल कशाला बोलतोस ?"

"बरोबर आहे तुझं म्हणणं !" मोहन थोडा वरमून म्हणाला, "माझी चूक झाली. मी पुन: असा बोलणार नाही. एकावरून जगाची पारख करणं ठीक नाही."

"एकूण तूं सुंदरवरून जगाची पारख केलीस. म्हणजे सुंदरचं अंत:करण काळंकभिन्न आहे असं तुझं म्हणणं. हें कांही उपयोगी नाही. मी सुंदरला जाऊन विचारतों. घाबरूं नकोस तूं, एकीकडे विचारतों—'तुझं अंत:करण काळंकभिन्न आहे, असं मोहननं मला सांगितलं तें खरं का खोटं ?' विचारूं ना मग—एकीकडे हां !"

"मुळीच विचारूं नकोस हां, विशा. तुला कांही उद्योग नाही वाटतं दुसरा ?"

"उद्योग पुष्कळ आहेत. पण मैत्री म्हणजे काय अजब चीज आहे. पंचवीस उद्योग बाजूला ठेऊन मित्रकार्य केलं पाहिजे."

"यांत काय मित्रकार्य होणार ?" मोहनने विचारलें.

"वर जाऊन थोडा खाली बैस; सुंदरकडे पांचदहा मिनिटें पहा; थोडा फराळ करून पोटभर पाणी पी, म्हणजे तुझी खात्री होईल की केवळ मित्रकार्यासाठी एवढा त्रास घ्यायला मी तयार झालों आहे.

तुझा तिच्याबद्दलचा गैरसमज नाहीसा झाला पाहिजे व तिच्या मनांत कांही असला तर तोही नाहीसा झाला पाहिजे."

"आणि नाहीसा न कां होईना?"

"असं कसं चालेल? आज कित्येक दिवस तुझी स्थिति पाहून माझ्या पोटांत कासावीस होतंय्. उसासे काय टाकतोस, एकटाच काय हिंडायला जातोस, कविता लिहिण्यासाठी दोन दोन तास खोली बंद करून काय बसतोस--कां झोंप लागते रे तेव्हा तुला? तसं असेल तर मी आपलं परत घेतों माझं म्हणणं!"

"विशा," मोहन ओरडला, "मी पुढे येत नाही."

"ठीक आहे. तुला उचलून नेईन. तूं तसा जड नाहीस. तुझ्या डोक्याला वजन मुळी नाहीच--"

मोहन अगदी चिरडीला आला व विश्वनाथाच्या अंगावर धावला. तेव्हा विश्वनाथ थोडासा भराभर चालूं लागला; त्यामुळे मोहनचाही वेग वाढला. दरवाजा दूर नव्हता. तेथे ते लौकरच पोंचले. मग विश्वनाथाने मागे बघून पाहिलें. थोडें जलद चालल्यामुळे असो किंवा दुसऱ्या कांही कारणाने असो, मोहनचा उगारलेला हात आता उगारलेला नव्हता. दरवाज्यांतून आंत गेल्यावर समोर एका दगडावर सुंदर बसली होती. तिच्याकडे पाहून विश्वनाथ म्हणाला, "हा तुझा भक्त मला मारण्यासाठी माझ्या पाठीमागे हात उगारून धावतो आहे. त्यापासून वाचीव मला."

सुंदर हसली आणि मोठ्या कौतुकाने तिने प्रथम मोहनकडे आणि नंतर विश्वनाथकडे पाहिलें आणि अगदी प्रसन्नतेने ती म्हणाली, "मोहन असं कधीच करणार नाही. तूंच मोठा वांत्रट आहेस आणि तूंच त्याला चिडवलेलं असणार!"

"का? उडाली चांगली?" मोहनने विचारलें.

"सांगूं का तिला काय म्हणत होतास तें?"

"सांग, सांग पाहूं. तिला मी सर्व कांही सांगितलं आहे."

"खरं आहे, विश्वनाथ." सुंदर म्हणाली. "आता तुझा माझा कांही संबंध नाही असं मोहननं मला सांगून टाकलं आहे."

"कां, मोहनजी?" विश्वनाथ हसूं लागला. "इथं तर उपा-देवीच्या ऐवजी उन्हाची रखरख दिसते. मी कांही सांगत नाही."

"एवढी मेहरबानी कशाला?" मोहनने रागाने विचारलें. सुंदरचें वाक्य ऐकून त्याला राग आला नसता तरच आश्चर्य. "सांगून टाक ना काय तुझ्या डोक्यांत असेल तें? कां तिथं कांही थाप द्यायला सुचत नाही वाटतं?"

"भले बहाद्दर!" विसूने उत्तर दिलें, "एकूण मी थाप मारणारा! जिथं तुझं बरळणं ऐकलं आहे प्रत्यक्ष माझ्या कानांनी--"

"बरोबर आहे. एवढे मोठे कान असल्यावर वाटेल तें ऐकूं येईल. कोणी कांही बोलत नसलं तरीसुद्धा ऐकूं येईल. तो तुझ्या विशाल कानांचा गुण बरं विशा! तुझे कान तसे असले म्हणून त्यांचा राग माझ्यावर कां काढतोस?"

"आणि मोहनराव, आता तुमचा कान सुंदरनं पिरगळला त्याचा राग माझ्यावर कां काढतां? सुंदरचा तुझा तंटा झाला असला तर त्यांत माझा काय अपराध? जेव्हा अभ्यास सोडून तिच्यावर कविता लिहीत होतास आणि उद्योग सोडून तिच्या पुस्तकांचे भारे हमालासारखे तिच्या घरापर्यंत पोचवीत होतास तेव्हा—"

"विशा," मोहन ओरडला.

"बरोबर आहे मोहन." सुंदर हसली. "हा विसू वात्रट आहे. याला तुझा हेवा वाटतो. याला कविता करतां येत नाहीत म्हणून हा तुझ्या कवितांची चेष्टा करतो, बरं का! तूं घेऊं नकोस तें मनावर!"

"तूं आपल्या कविता लिहीत जा, बरं, कविशेखरा!" विसू तोंड वेंगाडत म्हणाला. "या रसिक मुलीला चहा करायच्या वेळीं तें चिटोरे चुलींत घालायला मिळतात म्हणून हिचं तुझ्या कवितांवर फारच प्रेम आहे."

" विश्वनाथ, तुला काय आमचं भांडण लावून द्यायचं आहे?" सुंदरने त्याला विचारलें.

" छे: ! छेः ! भांडण कशाला लावून देऊं? जमलं असतं तर लग्न लावून देण्याची खटपट केली असती. पण जिथं दोन्ही पक्षांची ही स्थिति तिथं लग्न कसलं जमणार !"

" किती चहाटळपणानं बोलतोस रे? तुझ्या जिभेला हाड म्हणून नाही!" सुंदरने थोडा रागाचा आविर्भाव आणला.

" आता कोणाचा कान पिरगळला?" मोहनने हसत हसत विश्वनाथाला विचारलें.

" आता त्याची फिकीर नाही मला. तूं एकदा हसलास यांत माझं काम झालं. मारक्या बैलासारखा माझ्या पाठीमागं धावून येत होतास तें तुझं ध्यान तरी गेलं आणि--"

" आणि काय? बोलून टाक काय असेल तें नाही तर नसेल तें !"

" आता बाबांनो, तुमचा तंटा पुरे करा." सुंदर उठून चालू लागली.

"वा, सुंदर?" विश्वनाथाने विचारलें. "शेवटीं तंटा याचा आणि माझा काय? बायकांशीं जपून वागावं म्हणतात तें कांही खोटं नाही."

" खोटं नाही, अगदी खरं आहे." सुंदर हसूं लागली.

" चला आता झपाझप. बाकीची मंडळी असे आम्ही रेंगाळलों तर काय म्हणतील?"

" म्हणणार कांही नाहीत," मोहन म्हणाला, " पण फराळाचं मात्र संपवून टाकतील."

यावर त्यांचें बोलणें तेथेच थांबलें आणि मंडळी झरीच्या जवळ जाऊन बसली होती तिकडे ते तिघेही वळले. तेथे जाऊन पाहतात तों खरोखरच फराळाला सुरवात झालेली होती.

---

## प्रकरण सहावें

# वाघ आला रे आला!

बाल्य संपून संसाराचा भार डोक्यावर येण्यापूर्वीचें वय हें अनेक कारणांनी मोठें मोहक असतें यांत शंका नाही. या वयांत अंत:करणाच्या सर्व वृत्ति बहुधा खुल्या असतात; भावना तीव्र आणि स्वच्छ म्हणून ताज्यातवान्या असतात आणि त्यामुळे प्रसंगानुसार त्यांचे चढउतार मोठ्या जोराने होतात. या तात्कालिक चढउतारांना काव्यरसोत्पत्ति असें नांव देण्याचा मोह पुष्कळांना आवरत नाही. डोळ्यांना दिपवून टाकणाऱ्या देखाव्यानें अंत:करणांत त्याबद्दल आवडीचा एकदम हलकल्लोळ उठून शृंगाररसाचा अवतार झाला असें वाटण्याला वेळ लागत नाही; पण तोच देखावा दूर सरकला, दृष्टीआड झाला, किंवा त्यानें डोळे दिपण्याऐवजी ते चुरचुरूं लागले तर लागलीच अंत:करणांत निराशा बोकाळून शांत रस उत्पन्न झाला असें वाटण्यालाही वेळ लागत नाही. सौहृद, प्रेम, मैत्री, परस्परानुरक्ति यांना भावस्थिर असें जें विशेषण कालिदासाने लाविलें आहे तें या काळीं लावण्याचा प्रसंग फारसा जरी आला नाही तरी जें व जसें सौहृद त्या वेळीं असतें त्यालाच भावस्थिर म्हणण्याचा आग्रह मात्र या काळांत बलवत्तर असतो; किंबहुना या काळांतील माणसें जी आपली भावना तीच स्थिर भावना, तीच खरा रस उत्पन्न करणारी भावना असेंही हट्टाने म्हणतात आणि ती नाहीशी होऊन त्या ठिकाणीं दुसरी भावना आली तर मग ते पहिलीचें नांवही काढीत नाहीत. शेक्सपीयरच्या रोमिओप्रमाणें ती गोष्ट गत जन्मांतील किंवा स्वप्नांतील असली पाहिजे असें म्हणून ते तीसंबंधीं निराकरण करतात. पण हें जसें सर्व खरें, हें भावनाचांचल्य जसें नि:संशय, तसेंच चांचल्याच्या रगाड्यांतून पुढे स्थिर व्हावयाच्या भावनेचा उदय होत असतो हेंही खरें आहे; आणि म्हणून या भावना चांचल्याचेंही कांही सुज्ञांनी कौतुक

केलें तर त्यांत अनिष्ट कांही नाही. शिवाय हें भावनाचांचल्य आहे म्हणूनच या काळाबद्दल कित्येकांना जें अत्यंत भय वाटतें तेंही वाटण्याचें कारण नाही. याच काळांत कोणी प्रणयाने वेडा झाल्यासारखा वाटतो तर मधल्यामध्येच प्रणयदीप मावळल्यामुळे कोणी वैराग्याच्या अंधारांत शिरल्यासारखा दिसतो. परंतु खरा प्रणय माणसाला वेडा करीत नाही तर शहाणा करतो, दुर्बल करीत नाही तर बलिष्ठ करतो हें ज्याला पटलें आणि वैराग्यांत अंधार नसतो तर प्रकाश असतो हें ज्याने ओळखलें त्याला तरुणांचे होत असलेले हे चढउतार पाहून आता काय भयंकर प्रसंग ओढवेल अशी अतिशय काळजी वाटण्याचें खरोखर कारण नाही. पण ही काळजी न वाटावी अशी स्थिति उत्पन्न होण्याला सर्व तरुण माणसें, स्त्रिया आणि पुरुष, यांची स्थिति साधारणपणें तुल्यबल असली पाहिजे. पुरुष सक्रिय आणि स्त्रिया निष्क्रिय, पुरुष म्हणतील तें स्मृतिवाक्य पण बायकांना मुळी बोलण्याची चोरी, अशी स्थिति असते तेथे या भावनाचांचल्याची फार काळजी घ्यावी लागते. कारण भावनेच्या प्रत्येक हेलकाव्याबरोबर एखाद्या निरपराध परंतु निष्क्रिय अशा माणसावर प्राण जाण्यापर्यंत सुद्धा प्रसंग येत असतो. पण जेथे स्त्रिया आणि पुरुष यांच्यांत म्हणण्यासारखें अंतर राहिलें नाही तेथे ही काळजी करण्याचें फारसें कारण नसतें. मोहनच्या अंतःकरणांत वेळोवेळीं बदलणाऱ्या भावनांचें माजलेलें काहूर हें कित्येक दृष्टिशून्य लोकांच्या कथांत आधुनिक स्त्रियांवरचें मोठें संकट अशा भडक रंगांत व्यक्त होईल; पण ज्यांना या काहुराशीं टक्कर देण्याला किंवा त्यांतील भावनांचा हंसक्षीर न्यायानें खरोखर निवाडा करण्याला आधुनिक स्त्री समर्थ आहे हें समजतें ते असा विचित्रपणा करणार नाहीत. पण पुष्कळ लोकांना हें सर्व समजत नाही आणि म्हणून वरवर दिसणाऱ्या गोष्टींमुळे ते आपला भलताच गैरसमज करून घेतात. सुंदरचें मोकळेपणाने वागणें हें भलता समज उत्पन्न करण्याला यामुळे कारणीभूत होत असेल, हें पूर्वी एकदा सांगितलें आहे. इतरांना काय वाटलें असेल तें असो, पण मोहनसारख्या शिकणाऱ्या सवरणाऱ्या मुलग्याला सुद्धा सुंदरचें प्रेम आपल्यावर बसलें होतें असें वाटलें—

त्याचें पुढे काय झालें किंवा होईल हा प्रश्न निराळा; पण त्याच्या रोगावर निदान सुंदर किंवा विश्वनाथ यांच्या जवळ द्यावयाला, हास्यविनोदाचीं, प्रसंगविशेषीं स्पष्टोक्तीचीं, इतर वेळां थट्टामस्करीचीं औषधें होतीं ही एक गोष्ट; आणि दुसरें असें की, मोहनला तरी आता कोठे खात्री वाटत होती आपल्या अंतकरणांतील भावनेची ? मनाला आनंद देणारी वस्तु दिसली की, आवड वाटणें आणि अभिलाष उत्पन्न होणें ही गोष्ट भावस्थिर सौहृदाहून निराळी आहे अगोदर अस्थिर असल्यामुळे त्या जातीची सुद्धा नाही हें कांही विशिष्ट माणसाला समजलें नाही म्हणून कांही खोटें ठरत नाही.

असो. लोहगडावर दरीच्या काठीं बसून चिवडा आणि लाडू, शंकरपाळीं आणि केळीं, शिरा आणि भजीं, काकडया आणि मस्का पाव यांचा फन्ना उडवितांना आमच्या मंडळींत हास्याचे फवारे एकसारखे उडत होते आणि कोटया किंवा 'विटा' यांचा बरेच वेळां वाटणारा अभाव ते हसण्याचा आरोह पंचम स्वरांत नेऊन भरून काढीत होते. मुलें आणि मुली हसत खेळत गप्पा मारीत एके ठिकाणीं फराळ करताहेत, एकमेकांकडे उघडया डोळयांनी किंवा न भितां पाहताहेत, परस्परांत असमानता नाही अशा भावनेने वागताहेत, हें पाहून कित्येकांचीं धाबीं दणाणतात, व कित्येक कलमबहाद्दर निर्मळ देखाव्यावर सुद्धा आपल्या दुर्भावनांनी कोंदलेल्या अंत:करणांतील चिखलाचा गिलावा करून जेथे आनंद उत्पन्न व्हावा तेथे अवनतीचीं चित्रें दाखवून समानशील वाचकांना खूष करून कलम आणि शाई यांच्या तुटपुंज्या भांडवलावर आपल्या उदरपूर्तीची सोय लावतात. पण निर्मळ अंत:करणाने पाहणारांस ही वृद्धिंगत होत चाललेली समानता दिसली म्हणजे विषमतेचा विसर पडत चालला आहे असें कळतें व स्त्रीपुरुषांमधील भलभलत्या कल्पनांचें जन्मस्थान म्हणजे या विषमतेची आत्यंतिक जाणीव हें पटून, ही विषमता नाहीशी होण्यानेच उज्ज्वल नीतिमत्तेचें प्राबल्य विस्तारणार आहे हें त्यांना समजतें. सुंदर हसत होती, नव्हे कधी कधी खिदळत होती. कोणी एखादी कोटि केली तर त्यावर दुसरी कोटि करून ती प्रतिपक्षावर उलटविण्याची धमक तिच्या ठिकाणीं होती

आणि अशा वातावरणांत तरुण मंडळी योग्य प्रकारें एकत्र आली, उघडपणें एकत्र आली, म्हणजे तेथे पुरुषाला 'वाघोबा' होण्याची संधि मिळत नाही हें सांगावयास नकोच.

थोडया वेळाने मंडळींत सर्वांचा मोर्चा मोहनकडे वळला. पुष्कळ वेळां आपल्या मित्रांच्या चेष्टेचा विषय होणं त्याच्या कपाळीं येई, पण त्यामुळे तोही आपल्या कपाळाला दोष देत होता असें नाही. मुलें काय आणि थोरलीं माणसें काय, एकत्र जमलीं की चेष्टेची संक्रांत कोणावर तरी आल्याशिवाय राहत नाही. विश्वनाथाने पहिला बाण सोडला. तो म्हणाला, "प्रिय मित्रहो!"

"हात आटोपा, हात आटोपा--म्हणजे माझें म्हणणें तोंड आटोपा, म्हणजे शिरा--" बाबू म्हणाला.

"झब्बू!--" बाळूने त्याला हटकलें, "तूं शुद्धीवर आहेस का? आपण फराळ करतों आहोंत. तो तोंड मिटून कसा करावयाचा सांगशील का?"

"तूं आहेस शंख!" बाबूने उत्तर दिलें; "माझं म्हणणं असं की इथं व्याख्यान ऐकण्यासाठी आपण आलों नाही; किंवा व्याख्यान देण्यासाठी पण आलों नाही. पण हें बाळूच्या डोक्यांत शिरणार कसं?"

"मी व्याख्यान देत नाही रे, बाबा," विश्वनाथ बोलला. "मी तुम्हांला प्रिय मित्रहो म्हणून सुद्धा म्हणूं नये?"

"आणि येथे या मैत्रिणी बसल्या आहेत त्यांची वाट काय? कांही पाहून बोल." बाबू म्हणाला.

"ठीक आहे. प्रिय मित्रहो आणि मैत्रिणींनो--"

"आणि मैत्रिणींनो--" मोहनने वेडावलें. "मोठा हुषार तूं खरा. तुझ्या वाक्यांत दूरान्वय आहे. प्रिय हें मित्रांचें विशेषण. तेथे तें संपलें. मैत्रिणी पुन: कोरडया राहिल्या. त्यांना विशेषण नाही. आणि विशेषण गुण दाखवतं. म्हणजे त्यांच्यांत दाखविण्यासारखा गुण नाही--"

" चालला लेकाचा सुतानं स्वर्गाला !" विश्वनाथ म्हणाला; "अरे, या मुलींच्यावर अर्वाच्य कविता करायला तुला भीति वाटत नाही, तर नुसत्या विशेषणाची भीति मला कां वाटावी? ठीक आहे. तुझी चांगली खोड मोडतों आता. ऐका. मित्रहो आणि माझ्या प्रिय मैत्रिणींनो——"

" शाबास !" सर्वजण ओरडले व टाळ्यांचा गजरही झाला.

" हा चेष्टेचा विषय नाही." विश्वनाथ म्हणाला; " मला आपल्याला सांगतांना काय वेदना होताहेत हें सांगतां येत नाही——"

" अरे विशा ! आपल्या वेदनांचं वर्णन करूं नकोस. तुला काय सांगायचं होतं तें तूं सांग." बाळू बोलला.

" अरे, पण तुम्ही ऐकाल तेव्हा ना ?" विश्वनाथ म्हणाला. " मला एवढंच सांगायचं की आमचा मोहन प्रणयपुरींत पाऊल टाकीत होता, तिथून त्याला हाकलला."

" ही प्रणयपुरी म्हणजे श्रीखंडपुरीची कोण ?" सुहासिनीने विचारलें.

" उगीच मधें बोलूं नको ग तूं !" सगुणा म्हणाली.

" विसू लिहितो आहे एक गोष्ट. त्यांतल्या नायकाचं नांव मोहन. तो प्रणयपुरी नांवाच्या शहरांत चालला होता."

" तिथं त्याला सासुरवाडी लाभणार होती." बाबूने सांगितलें.

" तुम्ही गप्प बसायला काय घ्याल ?" विश्वनाथने विचारलें.

" श्रीखंडपुरीची फीस्ट घेऊं." बाबू म्हणाला.

" कांही हरकत नाही. गप्प बसलां तर फीस्टही मिळेल. मला एवढंच सांगायचं आहे की प्रेमभंग झाल्यामुळे आपल्या मोहनचं डोकं फिरल्यासारखं झालं आहे. तो आपला दोस्त आहे, त्याचं सर्व प्रकारें रक्षण करणं आपलं काम आहे."

" डोकं फिरायची वेळ आहे ?" बाबूने विचारलें. "आज किती तरी दिवस त्याचं डोकं नाहीच असं समजतों आहें."

" बाब्या !" मोहन ओरडला.

" बाब्या !" बाळू ओरडला. " भलतेंच बोलूं नकोस. नसता आरोप मोहनवर करूं नकोस. त्याच्याजवळ डोकें आहे का ? नसलें तर जें नाही तें फिरणार कसें ?"

मोहन बाळूच्या अंगावर धावणार इतक्यांत सुंदर म्हणाली, "मोहन, तूं लहान पोरासारखा त्याच्यावर दांत ओठ काय खातोस ? चेष्टा केली म्हणजे कां चिरडीला येतात असं !"

" सुंदर पहा आपली कशी शहाणी आहे." विसू बोलला; " तूं तिच्यावर इतक्या कविता केल्यास म्हणून तिला कधी चिरड आलेली आहे का ?"

" अहो विश्वनाथपंत---" सुंदर जरा मोठयाने बोलली.

" काय हो सुंदराबाई ?" विसूने विचारलें. " मी खरं बोललों की काय ? बाकी त्याच्या कविता वाचून कोणालाही चिरड येईल. तुम्हांला आली असली तर त्यांत नवल नाही."

" विसू, तूं अगदी दुतोंडया आहेस." सुंदर जरा रागाचा आविर्भाव आणून बोलली.

" हें पहा, सुंदर, हा सारा संसार, एकाचे दोन, पांचाचे पंचवीस होण्यासाठीच आहे. आमचा जो अगदी अव्वल पूर्वज ब्रह्मदेव त्याला चार तोंडें होतीं. त्याचा नातू का पणतू रावण त्याला तर दहा होतीं. तेव्हा मला तूं दुतोंडया म्हटल्याचा राग नाही."

" तूं आहेस पुरा निलाजरा." सुंदरने सांगितलें. " तुला राग कसला येतो ? आणि तुझ्या लोभाची तरी खातरजमा काय ?"

" खातरजमा होण्याला मी कविता लिहीत नाही हें खरें, पण तूं माझ्यावर कां उगाच रागावतेस ? विषय आहे मोहनच्या कविता–"

"आणि त्याच्या कवितांचा विषय असा कांही सुंदर–" बाळू मध्येंच म्हणाला.

"की तो विषय म्हणजे सुंदर;" बाळूने पुस्ती जोडली. "पण हें पहा, सुंदर, हा चहाटळपणा आता बंद करूं. आपला फराळ आटोपला आहे तेव्हा आता परत निघण्याइतका दिवस वर आलेला आहे."

"सुंदर, माझ्यावर तूं खरोखर रागावली नाहीस ना?" विश्वनाथाने जरा मऊपणाने विचारलें.

"नाही, मी कोणावर रागावलेलें नाही." सुंदरने उत्तर दिलें. "तुझ्यावर नाही की मोहनवर नाही की––"

"तुझा राग कोणावरही नाही." विसू वात्रटपणाने म्हणाला. "पहा रे मोहन, तिचा तुझ्यावर राग नाही. राग म्हणजे संस्कृत शब्द हां –राग म्हणजे अनुराग–आणि हेंच मी सांगतों आहें, मघापासून–तुला आणि तिलासुद्धा !"

"पण तुझ्यावरही नाही." मोहन जरा हलकेंच म्हणाला.

"वा: ! माझा प्रश्नच नाही. शिवाय सुंदरच्या रागाच्या लोभानं मी कविताही करायला लागलों नाही."

"कविता करायला याव्या लागतात. वाटेल त्याला कविता करतां येत नाहीत," मोहनने उत्तर दिलें.

"आता उडाली तुझी फजिती, विसू?" सगुणेने विचारलें.

"ठीक आहे. मी अजिंक्यपत्र देतों." विसू म्हणाला; "हा मुहूर्त निघायला चांगला आहे. मोहनने कुणाचीही उडविली म्हणजे खरोखर पेढे वाटायचा योग समजला पाहिजे."

सर्व मंडळी उठली. बाबूने खरोखर खिशांतून एक पुडा काढला व त्यांतून प्रत्येकाच्या हातावर एक एक पेढा ठेवण्यास सुरवात केली. त्याबरोबर जो हशा झाला त्यांत मोहन देखील मिळाला. त्याला इतकें हसूं आलें की तें आवरेना. तेव्हा बाळू म्हणाला––"कविता

करायचा नाद सुटून आमचा मोहन आज हसूं लागला याबद्दल तीन वेळ टाळया—"

रीतसर टाळया वाजवून मंडळी चालूं लागली. या वेळीं उन्हाचा ताप चांगलाच होऊं लागला होता. साडेदहा वाजून गेले होते. मंडळी खाऊन पिऊन हुशार झालेली होती. पण सकाळीं बरेंच चालणें झालें होतें आणि ऊन्हही लागत होतें; त्यामुळे त्यांचीं पावलें भराभर पडत नव्हतीं. सगळयांना रेंगाळावेसें वाटत होतें. बोलणें बहुतेक थांबलें होतें. जो तो हळूहळू मार्ग ढकलीत होता. इतक्यांत कोणीकडून तरी 'वाघ' अशी आरोळी ऐकूं आली. त्याबरोबर काय असेल तें असो, प्रत्येकजण धावत सुटला व भाजें गावाचीं शेतें लागेपर्यंत सर्व मंडळी धावतच होतीं. गाव येण्यापूर्वी एक चांगली विहीर वाटेवर लागते. तेथे सर्वजण धापा टाकीत थांबले. सर्व जण तेथे बसून पाणी प्याले. मग विश्वनाथ विचारतो. "कां, आता सर्वांची उडाली ना ?"

" म्हणजे ?" मोहनने विचारलें.

" म्हणजे काय ?" सुंदर म्हणाली; " वाघ आल्याची आरोळी आपल्या अण्णासाहेबांनी मुद्दाम दिली. म्हणून तर एवढया लौकर आपण इथं येऊन पोचलों. आता सारे बारा वाजताहेत. रेंगाळत चाललों असतों तर संध्याकाळ झाली असती."

अण्णासाहेब गंभीरपणें म्हणाले, "तुम्ही सर्वांनी मला याबद्दल शाबासकी देण्यापूर्वी एक महत्त्वाची गोष्ट तुम्हांला सांगतों. स्टेशनच्या पलीकडे एका बंगल्यांत माझे एक स्नेही राहतात. त्यांच्याकडे आपणां सर्वांना बरोबर एक वाजतां मेजवानी आहे."

आता सर्व मंडळींना अण्णासाहेबांची आठवण झाली व त्यांच्या आणि दुसऱ्या दोन वडीलधाऱ्या मंडळीदेखत आपण वात्रटपणाने वाटेल तें बोलत होतों व वाटेल तसें वागत होतों असें लक्षांत येऊन त्यांपैकी बहुतेकांना लाजल्यासारखें झालें. विश्वनाथ म्हणाला, "इकडे यायला निघण्यापूर्वी तुम्हीच आम्हांला सांगितलें की आम्ही अगदी तुमच्यांतले आहोंत असें समजून वागा; संकोच करूं नका. तुमची

आज्ञा आम्ही अगदी अक्षरशः पाळली याबद्दल तुम्ही अगदी आश्चर्य-चकित झालां असाल!"

"नाही. तसं कांही नाही." अण्णासाहेब म्हणाले; "पण आज अगदी भय, शंका न धरतां आमच्या देखत जसें कांही आम्ही नव्हतोंच असें समजून तुम्ही बोललां चाललांत हें पाहून मला आनंद वाटला. मी तुमच्या बोलण्यांत कांहीही व्यत्यय आणला नाही. पण मलाही तुम्हां सर्वांशीं असंच अगदी संकोच न धरतां बोलायचं आहे. तें तुम्ही ऐकून घ्याल ना?"

"अलबत्," सर्वांच्या वतीने विश्वनाथ म्हणाला.

"ठीक आहे." अण्णासाहेब म्हणाले. "दुपारीं जेवण झाल्यावर घटकाभर विश्रांति घेऊन मग आपण थोडया गप्पा मारूं."

---

## प्रकरण सातवें

# सुंदरचें वागणें

जेवण स्वस्थपणें झालें आणि सर्वांना आवडण्यासारखेंच तें होतें. अण्णासाहेबांचे स्नेही श्रीधरपंत हेही त्यांच्याच वृत्तीचे होते. त्यामुळे त्यांचें त्या सर्व मुलांत जमण्यास कांहींच अडचण आली नाही. जेवण झाल्यावर बहुतेक मंडळी थोडी आडवी झाली. लोणावळयाला जाणारी गाडी सात वाजतां येणार असल्यामुळे मंडळीजवळ वेळ बराच होता. चार साडेचार वाजतां सर्व मंडळी हुषार व ताजीतवानी होऊन बसली. जेवण उशिरां झालें होतें त्यामुळे चहाची चौकशी श्रीधरपंतांनी केली, तेव्हा इतक्यांत तर नकोच म्हणून सर्वांचे जबाब आले. त्यावर चहाचा बेत साडे पांच सहा वाजतां होईल असें बजावून श्रीधरपंत थोडेसे बाहेर पडले; आणि तुमच्याबरोबर आपणाला कांही प्रश्नांची चर्चा करावयाची आहे असें सांगून अण्णासाहेबांनी सर्व मुलांना जवळ

बोलाविलें, आणि ते हसत हसत म्हणाले—

"मला तुमच्याशीं कांही गोष्टींबद्दल बोलायचं आहे. पण आता इथं बोलतांना मी तुमच्यापेक्षा वयानं वगैरे मोठा आहे हें मात्र घटकाभर विसरा."

"तें विसरणं जरा कठीण आहे." सुंदर म्हणाली.

"कठीण असलं तरी तें विसरा. म्हणजे तुम्ही संकोचानं बोलतां आहांत असं मला वाटणार नाही."

"आम्ही संकोच करणार नाही;" सुंदर बोलली. "पण तुमच्या-सारख्या वडील माणसांजवळ आदरानं बोललों बसलों म्हणून आमची वृत्ति संकुचित आहे असं समजण्याचं कारण नाही."

"हें खरं आहे;" विश्वनाथ म्हणाला; "पण आपण आम्हांला आता जी सूचना केलीत त्यामुळे आमचा संकोच—अगोदर फारसा नव्हताच—अगदी पार निघून गेला."

"फार उत्तम गोष्ट झाली." अण्णासाहेब स्मित हास्य करून बोलले. "नुसता संकोच जाऊन उपयोगी नाही. मला तुम्ही आपल्यांत-लाच एक असं समजलं पाहिजे. म्हणजे तुमच्याशीं बोलतांना मला संकोच वाटणार नाही."

"ठीक आहे; आमच्या बुद्धीचा व अंत:करणाचा विकास होण्या-साठीच आपण आता बोलणार किंवा चर्चा करणार; तेव्हा संकोचाचा संभव सुद्धा नसावा हें बरोबर आहे;" सुंदरने सांगितलें. "पण अण्णा, आमचे कान पिरगाळण्यासाठी का ही सर्व प्रस्तावना आहे?"

"सुंदर, अशी उतावळी होऊं नको;" विश्वनाथ म्हणाला. "समूळ ग्रंथ पाहिल्यावीण, वगैरे वगैरे रामदासांचं म्हणणं माहीत आहे ना?"

"आहे मला माहीत."

"झालं तर मग. अण्णासाहेबांनी तोंडांतून अक्षर काढण्यापूर्वी तूं आपली लागलीस तर्क करायला ते काय बोलणार आहेत याबद्दल. म्हणे कान पिरगळण्यासाठी —"

"अरे विशा," मोहन म्हणाला; "खाई त्याला खवखवे; आपले कान लांबच नाहीत; ते पिरगळण्याचा मग प्रश्न येतो कुठे?"

"मोहनराव," विश्वनाथ म्हणाला; "शब्दावर कोटी केलीत हें खरं, पण तसं करतांना दुसऱ्याच्या कानाची पंचाईत कशाला? त्यामुळं तुझ्या कानाचं क्षेत्रफळ मात्र हत्तीच्या तबेल्याएवढं आहे हें आपोआप सिद्ध झालें."

"आणि मी आहें म्हणून तुम्ही भिडस्तपणानं बिलकुल वागत नाही हें मला पटलं." अण्णासाहेबांनी हसत हसत उत्तर दिलें. "दुसरं, बोलायची सुरवात कुठं करावी हा प्रश्नही आपोआप सुटला. कायरे, मोहन, तुझा या बिचाऱ्या सुंदरवर राग कां? तिनं कांही शब्द उच्चारल्याबरोबर तूं जो तिच्या कानाची लांबी मोजूं लागलास आणि खाई त्याला खवखवे हा जो टोमणा मारलास, तो कशासाठी? सांगायला कांही हरकत नसेल तर सांग. तिच्या देखतच सांगायचं आहे, तेव्हा माघारीं बोलायचं पापही तुला लागणार नाही; शिवाय समोर बोलण्यानं गैरसमज दूर व्हायला वेळ लागत नाही."

मोहनने कांही वेळ मान खाली घातली; तेव्हा अण्णासाहेब म्हणाले, "मोहन, यालाच संकोच म्हणतात. जाऊं द्या. ज्यांत तुला संकोच वाटतो तो विषय मी सोडून देतों. आता तुला विचारतों, विसू. तूं जो या मोहनची सारखी थट्टा करतोस तो काय म्हणून? त्याच्या कवितांवर तुझा एवढा कटाक्ष कां? त्या बिचाऱ्यानं कविता केल्या म्हणून तुझं काय गेलं?"

विश्वनाथाने उत्तर दिलें, "तुमची इच्छा संकोच न धरतां चर्चा करायची आहे. याच्या कविता चांगल्या असत्या तर माझं कांही म्हणणं नव्हतं. पण आपणांला कविता करतां येतात असा मोहनला भ्रम झालेला आहे."

"आणि आपल्याला कवितेचं मर्म समजतं असा भ्रम या विशाला झालेला आहे." मोहन मध्येच बोलला.

"आस्ते कदम, मोहन!" विश्वनाथ म्हणाला. "तुला बोलायची संधि अगदी प्रथम मिळाली होती. तेव्हा मान खाली घालून बसलास. आता मी बोलत असतांना मध्ये तोंड घालूं नकोस. तुझी मी चेष्टा करतों असा माझ्यावर आरोप आला आहे. त्याचं मला निरसन केलं पाहिजे."

"तो आरोपच असता तर त्याचं निरसन करण्याइतकी हुशारी तुझ्याजवळ आहे, विसू!" मोहन म्हणाला, "पण खऱ्या गोष्टीचं निरसन कसं करणार तूं?"

"तें आता पाहा." विश्वनाथाने उत्तर दिलें. "सुंदरचं आपल्यावर प्रेम बसलं आहे असा तुला भ्रम झालेला आहे."

"मला भ्रम?" मोहनने विचारलें. "तिलाच विचार."

"तिला काय विचारायचं? ती जरा मोकळेपणानं वागते, बरोबरीच्या नात्याने आपल्यांत बसते उठते; वादविवादांत किंवा कोटिक्रमांत आपल्याला नेहमीच हार जात नाही; साधारणपणें जुन्या माणसांच्या मताप्रमाणे बायकांच्या जातीनं जसं वागूं नये—माफ कर हां, सुंदर; हें माझं मत नव्हे—तसं वागते. त्याबरोबर तूं लागलास डोक्यांतल्या कल्पना शिडीवर चढवायला. ती हसली की तुला वाटे आपल्यावर ती भाळली. ती तुझ्याशीं जरा हळू बोलली की तुला वाटलं ही आपल्याशीं हितगुज करायला लागली. तिनं तुझी कशासाठी तरी थोडीशी स्तुति केली की तुला वाटलं ही आहे आपल्यावर खूष—"

"विसू, तुझीं वाक्यं तर गडकऱ्यांच्या नाटकांतल्या स्वगत भाषणासारखीं वाढत चाललीं. आणि त्यांत पूर्णविराम कुठं दिसतच नाही." सुंदर मध्येच म्हणाली.

"तूं बोललीस हाच माझ्या बोलण्याचा पूर्णविराम बरं, सुंदराताई. हा पूर्णविराम नव्हे; माझ्या बोलण्याला दृष्ट लागूं नये म्हणून तूं ही आपल्या तिटेची टिकली त्यापुढं ठेवून दिलीस."

"वारे मराठीच्या कांद्या!" सुंदर हसूं लागली. "तीट पुढं ठेवीत नसतात, लावीत असतात."

"ठीक," अण्णासाहेब अडकित्त्याने सुपारी कातरीत म्हणाले; "विसूचं मराठी अगदी आजचं आहे. तूर्त मराठी व्याकरण नाही की कोश नाही. आणि जें थोडेंबहुत आहे त्याचीही कत्तल कित्येक विद्वानांनी चालविली आहे. तूर्त राहूं द्या; प्रश्न आहे तो असा की मोहनला भ्रम झाला होता असें गृहीत धरून—"

"तें पण खरं नाहीच;" मोहन म्हणाला.

"मी कुठं खरं किंवा खोटं म्हणतों?" अण्णासाहेबांनी विचारलें. "मी म्हणतों की भ्रम झाला असं जरी समजलं तरी तो या सुंदरच्या वागण्यामुळे झाला हें विश्वनाथ मान्य करतो."

"मला कांही मान्य नाही." विश्वनाथ म्हणाला.

"कोर्टापुढे उभ्या असलेल्या आरोपीप्रमाणे जबाब देऊं नकोस." अण्णासाहेब म्हणाले; "यांत तुझ्या कबुलीचा प्रश्न नाही. सुंदरच्या अमुक अमुक वागणुकीचा मोहनने अमुक अमुक अर्थ केला असं तुझं म्हणणं—"

"हें मला कबूल—" विश्वनाथ म्हणाला.

"हें मला कबूल नाही." मोहनने सांगितलें.

"तूं जरा थांब रे मोहन;" अण्णासाहेब म्हणाले; "अरे मी तुझ्या बाजूनं बोलतों आहे हें तरी तुला समजलं ना? तेव्हा विसू म्हणतो हें आपल्याला कबूल—"

"म्हणजे तुम्ही मोहनच्या बाजूने बोलत आहां हें मला कबूल!"

"तरी हरकत नाही. माझं म्हणणं इतकंच, लोकांनी कांही तरी भलताच अर्थ लावावा असं सुंदरनं वागावं हें बरोबर आहे का? ती तशी वागते असं मी म्हणत नाही. पण जर ती तशी वागली तर तें बरोबर होईल का?"

"म्हणजे अर्थाचा विपर्यास करणारे, भलताच अर्थ लावणारे, अर्थ कसा लावावा हें ज्यांना समजत नाही असे, अर्थ कळत नसला

तरी कळला म्हणणारे, ते सर्व अगदी निरपराध ठरले म्हणावयाचे?" विसूने विचारलें.

"तूं जरा धीर धर, विसू!" उत्तर दिलें. "तसले लोक निरपराध ठरतात की काय, तें पुढे पाहूं. सध्या प्रश्न असा— ज्याचा अर्थ भलताच होणं शक्य आहे अशा प्रकारें एखाद्या मुलीने वागणं बरोबर होईल का?"

"यांत मला बोलायची परवानगी आहे का?" सुंदरने विचारलें.

"इतक्यांत नाही;" अण्णासाहेब म्हणाले; "तूं आमचं चाललेलं बोलणं ऐकायची मात्र तुला परवानगी आहे. मग विसू, काय तुझं म्हणणं?"

"थोडा विचार करून उत्तर दिलं पाहिजे." विसू म्हणाला.

"विचार कधीच उत्तर देऊं नये." अण्णासाहेब म्हणाले. "तुझा विचार होऊं दे. तो होईपर्यंत माझ्या प्रश्नाचं तूं उत्तर दिलंस तरी चालेल, मोहन."

"तुमच्या प्रश्नाचं उत्तर देणं जरा कठीण आहे." मोहन म्हणाला.

"उत्तर देणं कठीण नसलं तर प्रश्न विचारण्यांत मौज काय? तुझ्या दोन तीन परीक्षा झालेल्या आहेत. तेव्हा तुला तरी हें माहीत असलं पाहिजे." अण्णासाहेब म्हणाले.

मोहन कांही वेळ स्वस्थ बसला. एखाद्या अवघड अशा प्रश्नाचा विचार करण्याची त्याला फारशी सवय नव्हती. कांही वेळाने तो म्हणाला, "सुंदर कांही अयोग्य वर्तन करील असं मात्र मला वाटत नाही."

"पण सुंदरनं आपल्याला फसवलं असं मात्र तुझं म्हणणं आहे." अण्णासाहेब पुढे म्हणाले.

"माझं म्हणणं कांही तसंच नाही."

"तर कसं आहे? मोहन, आता घोटाळूं नकोस. स्पष्ट कांही तरी एक उत्तर दे. सुंदरच्या तुझी कांही एक समजूत

झाली. ती समजूत बरोबर नव्हती असं तुला नंतर सुंदरकडूनच कळलं, हें तुला कबूल आहे ना?"

"हें कबूल आहे."

"म्हणजे सुंदरच्या पहिल्या वागण्यानं ती समजूत उत्पन्न केली."

"ती समजूत उत्पन्न केली किंवा मोहनने करून घेतली." विश्वनाथाने दुरुस्ती सुचविली.

"तूं इतक्यांत मधे बोलूं नकोस." अण्णासाहेब म्हणाले. "हं मोहन, तूं आता दे मला उत्तर."

मोहन चाचरत म्हणाला, "तिच्या वागण्यामुळे समजूत झाली असं म्हणण्याऐवजी केव्हा केव्हा मीच तशी समजूत करून घेतली असं म्हटलं पाहिजे."

"सुंदरला वाईट वाटेल म्हणून तर असं बोलत नाहीस?"

"नाही. तिला वाईट वाटण्यासारख्या गोष्टी मी तिच्या जवळ बोललों आहें. पण विचार करतां मला आता वाटतं तिच्या प्रत्येक वागण्याचा अर्थ मी केला तसा नसावा."

"म्हणजे केव्हा केव्हा तो तसा होता इतकं तरी कबूल आहे?"

"हो, इतकं कबूल आहे."

"मग त्या त्या वेळेचं तिचं वागणं तुझी गैरसमजूत व्हायला कारण झालं; म्हणून तिनं तसं वागायला नको होतं हें सिद्ध झालं."

"असं कबूल केलं पाहिजे." मोहन म्हणाला.

"तुला आहे का हें कबूल, सुंदर?" अण्णासाहेबांनी विचारलें. तो प्रश्न ऐकतांच तिची मुखचर्या गंभीर झाली. ती म्हणाली, "हें मला कबूल आहे."

"चला. सारा वादच आटपला;" अण्णासाहेब बोलले. "आपण वागलों तसं वागणं बरोबर नव्हतं हें सुंदरलाही कबूल आहे. तेव्हा आपण त्याना जरा पुढे जाऊं."

"जरा थांबा;" विश्वनाथ म्हणाला. "सुंदर, तूं ही माघार काय म्हणून घेतलीस? केवळ वाद थांबविण्यासाठी? का शहाणी मुलगी म्हणून अण्णासाहेबांची शिफारस मिळविण्यासाठी?"

"तुझे दोन्ही तर्क चुकले, विश्वनाथ." सुंदर म्हणाली. "चूक होती अशी खात्री झाली मग चूक कबूल केलीच पाहिजे."

"पण तूं कांही चुकून किंवा चुकीने वागणारी मुलगी नाहीस." विश्वनाथ म्हणाला; "तुझ्या वागण्याच्या मुळाशीं कांही तत्त्वें आहेत हें मला माहीत आहे. निर्भीडपणानं, स्वातंत्र्यानं आणि अगदी मोकळेपणानं तूं वागतेस तें तुझी वृत्ति उच्छृंखल आहे म्हणून नव्हे, हेंही मला माहीत आहे. म्हणून तूं माघार घेतलेली पाहून मला चमत्कारिक वाटलं. या माघार घेण्याचा अर्थ म्हणजे आपलीं तत्त्वं चुकीचीं होतीं अशी उघड उघड कबुली."

"तुझं शेवटचं वाक्य सोडून बाकी सर्व मला कबूल आहे. माझीं तत्त्वं चुकलेलीं नाहीत. पण त्यांचा उपयोग करतांना मी कोणाशीं वागत आहें याचं तारतम्य राखण्यांत मजकडून चुकी झाली असं मला वाटतं. आणि ही जी माघार मी घेतली असं म्हणतोस तिचा अर्थ इतकाच समजावयाचा."

"हा तूं काढलेला सूक्ष्म भेद साध्या माणसांना कळणं सोपं नाही. पण तुझ्या वागण्याचा निदान बरेच वेळां भलताच अर्थ मोहननं केला असावा असं तुला नाही वाटत?"

"असं मला नुसतं वाटतं असं नाही, तर तशी माझी खात्री आहे. पण 'निदान बरेच वेळां' असं तूं म्हणालास तें खरं आहे. म्हणजे उरलेल्या वेळीं माझीं तत्त्वं ज्यांना माहीत नाहीत किंवा तीं ज्यांना मान्य नाहीत त्यांना माझंच वागणं गैरसमजूत उत्पन्न करणारं आहे असं [illegible] राहणार नाही."

"सुदरचं म्हणणं खरं आहे;" अण्णासाहेब म्हणाले; "आणि तिनं आपण होऊन असं म्हणावं यांतही नवल नाही. तिचं वागणं तत्त्वांना धरून आहे हें खरं. पण जसं इतर बाबतींत तसं तत्त्वानं

वागण्याच्याही बाबतींत तारतम्य पाहिजे, असा तिचा म्हणण्याचा अर्थ आहे व तो बरोबर आहे हें प्रत्येक विचारी माणूस मान्य करील. कोणत्या ठिकाणीं, कोणत्या वेळीं आणि कोणत्या व्यक्तीशीं आपण वागत आहोंत हें विसरून कधीही चालत नाही."

"पण हा सारासारविचार म्हणजे शुद्ध तत्त्वाचा मोठा शत्रु आहे, नाही का ?" विश्वनाथने विचारलें.

"सारासारविचार हा कोणत्याही चांगल्या गोष्टीचा शत्रु असणें शक्य नाही. पण तूं विचारलेला प्रश्न चर्चेला फार चांगला आहे. आपली गाठ पुनः केव्हा तरी पडली म्हणजे या प्रश्नाची चर्चा करूं. सध्या चहाचं आगमन झाल्यासारखं दिसतं. तेव्हा तूर्त हा वाद थांबवूं." अण्णासाहेब म्हणाले.

पण विश्वनाथ पुनः म्हणाला, "सुंदर कांही आपल्या नेहेमीच्या वृत्तीनं या वादांत बोलत नव्हती. तिच्यांत कांही तरी फरक झालेला दिसतो."

तो पुढे आणखी बरेंच बोलणार होता हें उघड होतें; पण इतक्यांत चहा आला. चहाबरोबर अर्थात् फराळाचेंही होतें. तेव्हा, दुपारीं जरी इतक्या उशिरां व भक्कम जेवण झालें होतें तरी ती बालगोपाल मंडळी चहामध्ये एकदम गर्क झाली, व कोणत्याही गहन विषयावर बोलणें अशक्य झालें. जवळ जवळ तासभर मंडळी चहांत व फराळांत आणि त्या प्रसंगाला अनकूल अशा हास्यविनोदांत—आणि विनोद नसला तरी त्याचा वचपा हास्याने काढण्याची कला त्यांना चांगली अवगत होती—गढून गेली होती. हळूहळू गाडीची वेळ झाली. निरोप घेण्याचा विधि आवरून मंडळी काल्र्याच्या म्हणजे मळवलीच्या स्टेशनावर येऊन दाखल झाली. गाडीला सुमारें पाव घंटा अवकाश होता. स्टेशनच्या प्लॅटफार्मवर कोणी इकडून तिकडे हिंडत होते; कोणी वजनाच्या काटयाभोवती जमून आपलें वजन करून घेण्याच्या कामांत गुंतले होते. सुंदर प्लॅटफार्मच्या जरा एका बाजूला जाऊन क्षणभर गाडी येण्याच्या रस्त्याकडे पाहत राहिली. दूर सिग्नल पडलेला दिसत

होता व त्याच्याही पलीकडचा आणखी एक सिग्नलही पडलेला दिसत होता. सुंदर तिकडे पाहत होती. इतक्यांत एक माणूस तिच्या जवळून गेला व पुन: मागे परतला आणि "सुंदर" म्हणून त्याने हाक मारली. सुंदरने वळून पाहिलें; क्षणभर तिची चर्या किंचित् म्लान व क्रुद्ध झाली; आणि मग ती हसली.

---

## प्रकरण आठवें

# सुंदरचा शत्रु

ज्या माणसाने सुंदरला हाक मारली तो तिच्यापुढे येऊन उभा राहिला आणि म्हणाला, "आपली पुष्कळ दिवसांनी गांठ पडली."

"ती पडावी अशी माझी इच्छा नव्हती," सुंदरने उत्तर दिलें. "आता पडली आहे त्याबद्दल माझं कांही म्हणणं नाही. तुमच्या ओळखीची आणखी कांही मंडळी इथं आहे. त्यांना भेटणार का?"

"[illegible] कोणालाही भेटायची माझी इच्छा नाही. तूं इकडे बरीच दूर येऊन उभी राहिलीस म्हणून मी इथं आलों. मला कोणीही पाहिलेलं नाही."

"तुम्हांला कोणी पाहिलं नसेल हें खरं पण इतक्यांत कोणी पाहणार नाही असं नाही."

"पण मला कोणालाही भेटायची इच्छा नाही."

"मग तुम्हांला येथून निघून गेलं पाहिजे. कारण मी इंथं कोणाशीं बोलत आहें हें पाहण्यासाठी तरी निदान त्यांपैकी कोणी तरी इकडे येईल."

"कोणी आलेच तर मला त्याची पर्वा नाही. मी कोणाला भितों असं कां वाटतं तुला?"

"त्यासंबंधीं मला कांही माहिती नाही. पण आता गाडी यायची वेळ झाली आहे. मला आता माझ्या मित्रमंडळींत जाऊन मिळालें पाहिजे. नाही तर ते हाक मारीत इकडे येतील."

"याचा अर्थ इतकाच की माझ्याशीं बोलायची तुझी इच्छा नाही. पण ती तूं इतक्या उघडपणे दाखविशील असं मला वाटलं नव्हतं. माझ्याशीं असा अबोला धरल्यानं काय होईल हें तुला चांगलं माहीत आहे ना?"

"आता मी तुमच्याशीं बोलत आहें तेव्हा अबोल्याचा प्रश्न निघत नाही. माझी तशी इच्छा नसती तर मी बोललें नसतें किंवा मंडळींना हाक मारून इकडे बोलावलं असतं किंवा तुम्ही दिसल्या-बरोबर मी तिकडे गेलें असतें."

"तसं केलं असतंस तर आपण भ्याल्याची तूं कबुली दिली असतीस. तूं भित्री आहेस असं मला नाही वाटत."

"मी भित्री आहें असं तुम्हांला नाही वाटत? मी भित्री नाही अशी जर तुमची खात्री असती तर तुम्ही मला भिवविण्याचा प्रयत्न केला नसता. तो तुम्ही केला, यावरून तुम्ही मला भित्री समजतां हें उघड आहे. भिवविण्याचा प्रयत्न मात्र सिद्धीला गेला नाही हें तुम्ही कबूल करालच."

"मी कांही कबूल करीत नाही. तूं भित्री असशील किंवा नसशील; आणि जरी नसलीस, या समोर दिसणाऱ्या टेकड्यांप्रमाणं जरी तुझं धैर्य निश्चल असलं, तरी तुला मी भय दाखविण्याचं ठरवलंच तर तूं भिणार नाहीस असं मात्र नाही. सुंदर, तूं कोणीकडे चालली आहेस?. पण तुला बोलायची तसदी मी देत नाही. तुम्ही सर्व मंडळी लोणावळ्याला येऊन दोन दिवस झाले आणि आज लोहगडचा किल्ला पाहून तुम्ही तिकडे परत चाललां आहांत. माझाही मुक्काम दोन दिवस आहे. आणि मी सुद्धा आज सकाळीं लोहगड पाहून आलों."

"खरं की काय? मग तुम्ही कुठं दिसलां नाहीत?"

"मी दिसलों नाही हें खरें. शिवाय आता मी दिसल्यावर तुला जो आनंद झाला त्यावरून मी दिसलों नाही म्हणून तुझं मोठं नुकसान झालं असं मला वाटत नाही."

सुंदर हसली आणि म्हणाली, "आमचं कोणाचंही नुकसान झालं नाही. नुकसान झालं असल्यास तुमचं. कारण जर तुम्ही दिसलां असतां तर फराळ करण्यासाठी आम्ही तुम्हांला बोलावलं असतं."

"त्या अचकट विचकट वादविवादांत कोणाला बोलवायची आठवण तुम्हांला झाली असती का? मला वाटतं ती झालीच नसती. तेव्हा दिसलों नाही हेंच ठीक झालं."

"पण तुम्ही कांही फराळ बरोबर आणला होता का?"

"तूं लोहगडला गेलीस म्हणून मी लोहगडला आलों, तरी फराळाचं आणायला विसरण्याइतका कवि मी आता राहिलों नाही."

"म्हणजे एका काळीं तुम्ही कवि होतां म्हणायचं तर! मला हें माहीत नव्हतं."

"मी कधीच कवि नव्हतों आणि हें जर तुला माहीत असेल तर तुझ्या शहाणपणाची तारीफ केली पाहिजे."

"तारीफ करायला आता वेळ नाही. ही पहा गाडी अगदी जवळ आली. मी जातें." असें म्हणून ती आपली मंडळी होती तिकडे जावयास निघाली. त्या माणसाने कांही बोलण्याचा प्रयत्न केला, पण तिच्या मागोमाग मात्र तो गेला नाही. इतर मंडळींना भेटण्याचा त्याचा बेत नव्हता हें त्यावरून उघड झालें. गाडी आली आणि दोनच मिनिटें थांबली. ती गाडी पुण्याहून लोण्यावळ्यापर्यंत जाणारी होती; त्यामुळे तिच्यांत गर्दी फारशी नव्हती. आमची मित्र मंडळी मागेच होती. त्यामुळे ती सर्व मागच्या डब्यांत शिरली. सुंदरला भेटलेला मनुष्य मात्र अगदी गाडी सुटण्याच्या वेळेला पुढच्या डब्यांत शिरला. गाडींत बसल्यावर कांही वेळ मंडळी स्तब्ध होती. सुंदर आणि विश्वनाथ हे खिडकीच्या बाजूला एकमेकांसमोर बसले होते. क्षणभराने विश्वनाथ म्हणाला, "तुला कोण भेटलं होतं?"

"तें समजण्याची तुला फारच इच्छा असेल तर सांगतें."

"मला तें समजावं अशी मुळीच इच्छा नाही. तुला विचारलं त्याचं कारण तें नव्हे. तुझ्या चेहऱ्याकडे पाहून तूं जरा रागावल्या-सारखी दिसलीस म्हणून विचारलं."

"मी रागावल्यासारखी दिसलें? मग माझ्याकडे तूं बराच निरखून पाहत आहेस म्हणावयाचा."

"सुंदराताई, इथं मात्र तूं मात केलीस. आपण समोरासमोर बसलों आहों, तेव्हा निरखून पाहण्यासाठी विशेष खटपट पडते असें मला वाटत नाही. आणि मी डोळे झाकले नाहीत तर तूं दिसणारच!"

"माझ्याकडे पहाण्याचं टाळावं म्हणून तूं डोळे झाकावेस असं माझं म्हणणं नाही. पण तुझे डोळे उघडे होते असें मात्र आता वाटत नाही. कारण, मी रागावलेली नाही. मग माझ्या चेहऱ्यावरून तुला तसं कसं दिसलं कोण जाणे!"

"कोण जाणे म्हणजे? खरं बोलशील तर तें तुझं तुला माहीत असणार. तूं रागावली होतीस हें खास. कां रागावली होतीस हें सांग-ण्याची तुझी इच्छा नसेल तर माझा आग्रह नाही. पण तिकडे दूर जाऊन उभी राहिलीस त्याच्यापूर्वी रागावलेली नव्हतीस. त्यावरून त्या माणसाची गाठ पडल्यावर तुला राग येण्यासारखं कांही तरी झालं असा तर्क करायला हरकत कोणची?"

"माझी कसलीच हरकत नाही. पण ही तर्ककुतर्क करीत बसण्याची सवय चांगली नव्हे."

"कांही कारण नसतांना बात झोकून देणें हीही सवय बरी नव्हे. तूं आता हसलीस तेव्हा माझ्या म्हणण्याचा व्यंग्यार्थ तुला कळला. हें पहा, लोणावळं जवळ आलं. ती जी झाडी दिसते तिच्यांत करवंदं चांगलीं मिळतात. माझ्या मनांत उद्या सकाळीं तिकडं जाऊन खूपशीं करवंदं आणायचीं आहेत."

"त्या झाडीपेक्षा त्या समोरच्या टेकडीवर जास्ती आणि

चांगलीं करवंदं मिळतात." सुंदर म्हणाली, "मात्र ती टेकडी चढावी लागते हं. तुला चढण्याचे श्रम नको असतील तर गोष्ट निराळी."

याप्रमाणे बोलण्यास सुरवात करून त्यांनी विषय बदलला आणि इकडे तिकडे बोलणें चाललें आहे इतक्यांत लोणावळें आलें. तेथे सर्व मंडळी उतरून आपल्या बिऱ्हाडीं गेली. घरीं पोचल्यावर आपल्यास भूक नाही असें प्रत्येकाने सांगितलें. परंतु जेवण तयार होतें आणि तें वाया जाऊं नये म्हणून कांही वेळाने ते जेवावयास बसले. त्या रात्रीं सुंदरला बराच वेळ झोप आली नाही. अण्णासाहेबांच्या बरोबर झालेला संवाद तिच्या डोक्यांत खेळत होता. त्या संवादामुळे तिच्या मनाला हेलकावे बसले होते. त्यांच्याशीं बोलणें जरी फार वेळ झालें नव्हतें तरी त्यांत बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी निघाल्या होत्या यांत शंका नाही. त्यामुळे आपल्या वागण्याच्या पद्धतीचा व ज्यांना ती तत्त्वें असें म्हणत होती त्या गोष्टींचा सांगोपांग विचार करण्याची तिला इच्छा झाली. अशा तऱ्हेचा जबरदस्त विचारप्रवाह डोक्यांत सुरू झाल्यावर झोप येणें मुष्कील व्हावें यांत नवल नाही. आपण ज्या प्रकारें वागतों त्यांत आपला हेतु कितीही शुद्ध असला तरी त्या वागण्याचा परिणाम दुसऱ्यावर काय होतो हें पाहावें लागतें या विचारांत बरेंचसें तथ्य आहे याबद्दल तिला शंका नव्हती. हा जो परिणाम दुसऱ्यावर होतो तो ज्या प्रकारचा होतो त्या प्रकारचा होण्याला दुसऱ्याच्या अंगचे गुणावगुण कारणीभूत होत असतील ही गोष्ट खरी असली तरी त्या परिणामाच्या दोषांचा कांहीना कांही तरी वाटा आल्याशिवाय राहत नाही असा अण्णासाहेबांच्या म्हणण्याचा आशय होता आणि तो अगदी चुकीचा होता असें तिला म्हणवेना. मोहनचें चित्र तिच्या डोळ्यांसमोरून सरकलें. मोहन हा कांही वाईट मुलगा नव्हता. त्याच्यांत कांही दोष असल्यास तो भाबडेपणा हा होता असें म्हणावें लागेल. परंतु भाबडीं माणसेंसुद्धा आपल्या वागण्यामुळे जर आपल्याविषयी चमत्कारिक कल्पना करूं लागलीं तर त्यांत, भाबडेपणाला द्यावयाचा तितका दोष देऊनसुद्धा, दोषाचा बराचसा भाग आपल्या वाट्याला राहतोच.

मोहननंतर दुसऱ्या एका माणसाचें चित्र तिच्या मनश्चक्षूं-

समोरून सरकलें आणि त्या माणसाशीं आपण ज्या प्रकारें वागलों त्याचा विपर्यस्त अर्थ करण्याला त्या मनुष्याच्या अंतःकरणाचा दुष्टपणा कितीही कारणीभूत असला तरी आपली वागणूक, अगदी सौम्य शब्दांत म्हटलें तरी, शहाणपणाची झाली नाहीं हें कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाही हें तिच्या मनांत आलें. कित्येक पुरुष अशा प्रकारें वागतात आणि त्यांचें तें वागणें खपूनही जातें; परंतु विचार केल्यावर असेंही दिसतें की सर्वच पुरुषांचें असलें वागणें खपून जातें असें नाही आणि जरी तें खपत असलें तरी त्याचें अनुकरण स्त्रियांना करण्याची कांही आवश्यकता आहे की काय हा प्रश्न राहतोच. ज्याप्रमाणे लोकांना कित्ता घालून देणाऱ्या पुढारी माणसांनी ज्याचा भलताच अर्थ होईल, ज्यामुळे उत्कृष्ट तत्त्वांबद्दल सामान्य लोकांच्या मनांत शंका उत्पन्न होईल, असें कांहीही करूं नये किंवा बोलूं नये, त्याप्रमाणे जिचा सहजासहजीं विपर्यास होण्याचा संभव आहे अशा तऱ्हेची वागणूक स्त्रियांनी करणें ही एकच गोष्ट स्त्रिया स्वतंत्र झाल्या याची द्योतक आहे की काय? याखेरीज दुसऱ्या कांही उपायांनी त्या स्वतंत्रतेचें अस्तित्व प्रस्थापित होणें शक्य नाही काय? असे अनेक प्रश्न त्या संवादाचा परिणाम म्हणून तिच्या डोक्यांत आले आणि त्यामुळे कांही वेळ ती गोंधळून गेली; पण त्या गोंधळलेल्या स्थितींत सुद्धा अशा सर्व विचारांना जी उलट बाजू आहे तीही तिच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाही. स्त्रियांच्या कसल्याही वागण्याचा विपर्यस्त अर्थ करणें हा निश्चय म्हणजे मर्दपणाची कसोटी असा दंडक ज्या समाजांत आहे, जेथे पुरुषांनी आपलपोटेपणामुळे घालून दिलेल्या नियमांपासून स्त्रियांनी अणुरेणूमात्रही ढळतां कामा नये अशी सक्ती आहे, जेथे पुरुषांवर असल्या नियमांची सक्ती नाही, आणि जेथे जोराचा धक्का बसल्याशिवाय समाजामध्ये यत्किंचितही स्थित्यंतर होण्याचा संभव नाही, तेथे समाजाला ज्याने खरोखर धक्का बसेल असें वर्तन करणें आवश्यक ठरत नाही काय? आता असा धक्का देणें हें योग्य आणि आवश्यक ठरल्यावरसुद्धा जी गोष्ट समाजाच्या दुराग्रहामुळे नव्हे तर समाजांतील बहुतेक विचारी लोकांच्या मताप्रमाणे गर्हणीय ठरलेली

आहे तिचा अवलंब करण्याची आवश्यकता आहे की काय? उदाहरणार्थ, पुरुष आपल्याला कांहीच स्वतंत्रता देत नाहीत यासाठी पुरुषांप्रमाणे खूप दारू पिऊन अस्ताव्यस्तपणाने भररस्त्यावर वागणें एवढाच मार्ग आपली स्वतंत्रता व्यक्त करण्याला योग्य असा ठरतो की काय? कारण अशा तऱ्हेने वागण्याची पुरुषांना जरी मुभा असली तरी त्या वागण्याला चांगलें कोणीच म्हणत नाही; तेव्हा अशा तऱ्हेचें अस्ताव्यस्त वागणें सोडून दिलें तरी सुद्धा आताच म्हटल्याप्रमाणे समाजाला दाखविण्यासाठी धक्के देण्याची जरूरी राहतेच; ही गोष्टही तिच्या लक्षांत आली. एक काळ असा होता की पायांत जोडे घालणारी किंवा अंगांत पोलका घालणारी बाई म्हणजे खराब असली पाहिजे असें पुष्कळ लोक म्हणत. त्या वेळीं ज्या बायांनी अंगांत पोलकीं घातलीं व पायांत जोडे घालून त्या काळच्या समाजाला जोडे दिले त्यांना जरी पुष्कळ त्रास झाला तरी त्यांनी मागाहून येणाऱ्या सर्व स्त्रियांचा मार्ग मोकळा करून ठेविला यांत शंका नाही. अशा प्रकारें एकदा एक तऱ्हेचे, नंतर त्याविरुद्ध दुसऱ्या तऱ्हेचे विचार तिच्या मनांत एकामागून एक आले आणि पुष्कळ वेळ झोप न लागल्यामुळे ती किती तरी वेळ या कुशीची त्या कुशीवर झाली. नंतर हवेंत थंडी थोडी अधिक वाढल्यामुळे म्हणा किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणामुळे असो–तिला झोप लागली. एकदा झोप लागल्यावर मात्र ती जी निजली ती चांगली सात वाजेपर्यंत जागी झाली नाही. तिच्या मैत्रिणींनी चहा तयार झाल्यावर तिला उठविलें.

सकाळीं चहा पाणी आटोपल्यानंतर हिंडावयास कोठे जावयाचें हा प्रश्न निघाला. पण आदल्या दिवशींच्या सफरीमुळे मंडळी फार दमली होती, त्यामुळे सकाळचा वेळ गप्पा मारण्यांत गेला आणि नऊ वाजतां चहाची दुसरी आवृत्ति निघून दुपारीं जेवण झाल्यावर लौकरच बाहेर पडावें आणि नागफणी (Duke's Nose) किंवा वाघाच्या उडीचा कडा (Tiger's Leap) यांपैकी कोणत्या तरी एका ठिकाणीं जावें येथपर्यंत विचार आला. शेवटीं बरीच भवति न भवति होऊन वाघ उडीकडे जाण्याचा ठराव सर्वानुमतें मान्य झाला.

मंडळी जेवायला बसणार होती इतक्यांत पाकिटांत बंद केलेलें सुंदरच्या नांवाचें एक पत्र तिला कोणी आणून दिलें. तिने त्यावरचा पत्ता पाहिला. तें पोष्टाने आलेलें नव्हतें हें स्पष्टच होतें; चौकशी करितां कोणा माणसाच्या हातीं आलें असें समजलें. तिने तें उघडून न पाहतां पोलक्याच्या खिशांत घालून ठेवलें आणि सर्व मंडळीबरोबर ती जेवावयास बसली. नंतर तिने तें पत्र सावकाशपणें वाचलें.

---

## प्रकरण नववें

# सुरवातीची प्रस्तावना

सुंदर तें पत्र वाचण्यांत गुंतली आहे ही संधि, तिला सोडून जरा दुसरीकडे चक्कर मारून येण्यास, बरी आहे. आणि चक्कर मारायची तर लोणावळयाहून खंडाळयापर्यंतच जावें असा निर्बंध निदान कथाकाराला नाही. तो आपल्या कल्पनारथावर वाटेल तितक्या वाचकांना बसवून दुनियेंत वाटेल तिकडे नेईल; किंबहुना विमानांत बसून त्यांना जर आकाशसंचार करावयाचा असेल किंवा पाणबुड्या जहाजांत बसून त्यांना जर समुद्राचा तळ पाहावयाचा असेल अथवा पाताळ लोकांतसुद्धा जाऊन जर त्यांना नाग किंवा नागकन्या यांचें दर्शन घ्यावयाचें असेल तर तेंसुद्धा घडवून आणणें कथाकाराला कांही अशक्य नाही. पण आमच्या वाचकाना देवांगना म्हणजे अप्सरा अथवा नागकन्या यांच्या दर्शनाला जाण्याइतका मात्र लांबचा पल्ला तूर्त गाठावयाचा नाही. लोणावळयाहून खंडाळयाला न जातां मुंबई पर्यंत सफर केली तर तूर्त आपलें काम होईल.

लोणावळयाच्या थंड हवेंतून मुंबईच्या उकाड्यांत चला म्हटल्या-बद्दल कित्येक वाचक रुष्ट होतील हें खरें, पण तेंसुद्धा एकदोन बोलपट पाहून झाल्यावर आणि आईस्क्रीमच्या दोनतीन 'प्लेटी' चाखल्यावर

मुंबईच्या उकाड्यांतही गारीगार होणार नाहीत असें नाही. मुंबईत उकाडा असतो हें खरें, पण महाबळेश्वराची थंड हवा उपभोगण्याची ज्यांत व्यवस्था आहे असे सुंदर बंगलेही तेथे पुष्कळ आहेत. अशाच एका बंगल्यांत आपण जाऊं. हा बंगला माटुंग्याच्या नव्या वस्तींत आहे. त्याच्या आजूबाजूला बरीच जागा असून तींत छानदार बगीचा केलेला आहे. या बगीच्याचा विशेष म्हणजे त्यांत निरनिराळ्या जातींच्या गुलाबांची रेलचेल केलेली आहे. पांढरे, लाल, पिवळे, गुलाबी, अशा निरनिराळ्या रंगांच्या गुलाबांचे ताटवे तेथे विपुल आहेत. बंगल्याची रचना ‘ भाड्याने देण्याकरितां ’ केलेली नसून ती कोणा तरी हौशी गृहस्थाने स्वतःला राहण्याकरितां बांधलेली हवेली आहे हें पाहताक्षणींच लक्षांत येई. या बगीच्यांत कांही बाकेंही टाकलेलीं आहेत व एका बाजूस टेनीसचें कोर्ट दिसतें. अर्थात ऐन दुपारीं जेवणाच्या वेळीं बगीच्यांतही कोणी भेटण्याचा संभव नाही आणि टेनीस कोर्टावर तर नाहीच नाही—पण या ठिकाणीं नाहीच नाही म्हणण्यांत कांही प्रमाद तर होत नाही ना ? कॉलेजच्या किंवा दुसऱ्या क्लबांतील वगैरे टेनीस कोर्टावर अकरा अकरा वाजेपर्यंत मंडळी ‘टोले’ देण्यांत गर्क नसतात असें नाही. पण या बंगल्यांत सध्या तरी बाहेर कोणी दिसत नाही. बंगल्याच्या देवडीपुढे कमान होती त्यांतून आंत गेल्यावर प्रथम व्हरांडा दिसतो व त्यांतून आंत शिरलें म्हणजे दिवाणखाना लागतो. या [illegible] बसायला खुर्च्या व कोचें आहेत. तेथे एका बाजूला तीन मंडळी बसली होती. तमाखूचा वास येत होता त्यावरून सिग्रेटा पेटल्या असाव्यात असें अनुमान करण्यास हरकत नव्हती.

“ छेः, बुवा, अगदी कंटाळा आला आहे ! या जगांत नवीन अशी चीज उरलेली दिसत नाही. आहेत त्या वस्तु पुनः पुनः पाहण्याचा अगदी कंटाळा आलेला आहे बुवा आपल्याला !” त्या तिघांपैकी आरामखुर्चीवर बसलेला तरुण मनुष्य म्हणाला. त्याच्या तोंडांत किंवा हातांत सिग्रेट नव्हती; पण समोर वर्तुळ मेजावर सिग्रेट पेटविण्याचा सर्व सरंजाम पडला होता व जवळ बसलेले दुसरे दोघे तरुण सिग्रेट तोंडांत धरून मधून मधून धुरांचे भपकारे सोडीत होते.

"एकूण तूं अगदी कंटाळून गेला आहेस, बाळ! तुझ्या वडिलांनी तुला इतका पैसा ठेवला नसता तर ही ब्याद तुझ्या पाठीमागे लागली नसती."

"एकूण माझ्या संपत्तीचा हा परिणाम आहे असं तुझं म्हणणं, होयना बाबू? बापू, तुझंही मत तसंच आहे का?"

"एकंदरींत जवळ जवळ बहुतेक तसंच!" बापूने सांगितलें.

"वाहवा! वाहवा!" बाबू हसत हसत म्हणाला; "जर कधी कधी खरा अस्सल, शंभर नंबरी, बावनकशी, बिनचूक, बिनधोक असा जर नेमस्त पक्ष निघाला तर त्याचा पुढारी होण्याला हा आमचा बापू अगदी एकदम सोळा आणे लायक आहे."

"हें कुठल्या नाटकांतलं वाक्य पाठ केलंस?" बापूने विचारलें.

"वेडा रे वेडा!" बाबूने उत्तर दिलें. "आजकाल नाटकाच्या भाषेंत चमत्कृति नसते. त्यांत अर्थही नसतो. चमत्कृति असते ती नटांत असते; चमत्कार इतकाच की नटांच्या किंवा नाटकवाल्यांच्या खिशांत तो कुठं गडप झालेला असतो त्याचा पत्ताही लागत नाही. पण हें राहूं द्या. तुझ्या कंटाळ्यावर रामबाण युक्ति सांगूं का बाळ?"

"अरे, त्याला बाळासाहेब तरी म्हण." बापूने सुचविलें.

"कां, मला बनवायचा विचार आहे वाटतं?" बाळने विचारलें.

"अरे बुवा, मी कसचा तुला बनवतों! मग बाबू, सांग तुझी युक्ति. माझ्या लक्षांत आली आहे ती."

"मग तूंच सांग." बाबू म्हणाला.

"युक्ति तुझी, तेव्हा तूंच सांगावीस." बापूने उत्तर दिलें. "पण ती आता बाळच्याही लक्षांत आलेली असणारच. बाळ तसा चाणाक्ष आहे."

"बाळासाहेब आता चाणाक्ष झाले." बाळ म्हणाला. "हर-बऱ्याच्या झाडाची पुढची डहाळी कोणती?"

"आता माझी युक्ति ऐक." बाबू बोलला. "संपत्तीचं आधिक्य हें तुझ्या निर्वेदाचं समवायी कारण आहे.—"

"अरे, मराठींत बोल!" बापूने सुचविलें.

"ठीक; अगदी माधवराव कुंटयांच्या भाषेंत बोलतों. फाजील संपत्ति जवळ झाल्यामुळे तुला कोणत्याच गोष्टीचें कौतुक उरलें नाही. तें कौतुक उत्पन्न होण्यासाठी जवळचा पैसा कमी कर. कमी करण्याचा सोपा उपाय म्हणजे त्यांतील निदान निम्मा पैसा मला देऊन टाक."

"युक्ति पण युक्ति;" बापू म्हणाला; "म्हणजे बाळनं तुला दत्तक घ्यावं असं तुझं म्हणणं."

"त्याचं लग्नही अद्यापि झालेलं नाही. तेव्हा त्याला आठ मुलगे होणार का एखादा कमी होणार हें आताच सांगतां येणार नाही. एखादा कमी पडला तर दत्तकाची गोष्ट–बाकी आपल्याला आठवा हिस्साही पुरे होईल. तुझा पैसा एवढा आहे, बाळ, की त्याचा शंभरावा भाग आणि माझ्यासारख्या दरिद्रयाची उभ्या जन्माची मिळकत ही सारखीच."

बाळ कांही वेळ स्तब्ध होता. मग तो म्हणाला, "बाबू तुझी युक्ति कांही वाईट नाही. मग तुला कितवा हिस्सा पाहिजे? निम्मा का आठवा का शंभरावा? का मुळीच नको?"

"तूं तरी मारवाडी दिसतोस पक्का!" बाबूने उत्तर दिलें. "निम्यापासून मुळीच नकोपर्यंत आलास. ठीक, मला मुळीच नको. दुसऱ्याचा घेऊन पचण्याची पंचाईत. मला आहे माझा तेवढा पुरे. सांगायचं तात्पर्य इतकंच की तुझा कंटाळा पैशामुळं आहे."

"पैसा खर्च करण्याच्या युक्त्यांचा अवलंब मी अनेक वेळां केलेला आहे." बाळने सांगितलें.

"तेव्हा आता आपण पैसेवाले आहों ही गोष्ट विसरून जरा गरिबासारखा वाग, म्हणजे तुला गंमत वाटेल आणि तुझा कंटाळा नाहीसा होईल. आज आपण तिसऱ्या वर्गाने लोणावळयापर्यंत प्रवास करूं." बाबू म्हणाला.

"तिसरा वर्ग? त्याला पहिल्यांतून दुसऱ्या वर्गांत आण आधी!" बापूने सांगितलें.

"ठीक आहे. मी तिसऱ्यांत येतों. आज शुक्रवार आहे. संध्याकाळीं डेक्कन क्वीनने निघूं."

"डेक्कन क्वीनला थर्ड क्लास नसतो, थर्डक्लास पाहिजे तर मेलने गेलं पाहिजे." बापू म्हणाला.

"ठीक आहे. आपण मेलने जाऊं. तिसऱ्यापेक्षा खालचा एखादा वर्ग असेल तर त्यानेही आपण जाऊं. माझी मुळीच हरकत नाही." बाळने सांगितलें.

याप्रमाणे कांही वेळ बोलणें झालें. इतक्यांत जेवणाची वर्दी आली व सर्व मंडळी उठली. त्यानंतर थोडी विश्रांति घेऊन हें त्रिकूट मेलच्या वेळीं दादर स्टेशनवर गेलें. तिसऱ्या वर्गाच्या तिकिट ऑफीस-जवळ बरीच गर्दी होती. तेथे बाबू घुसला व थोडीशी रेटारेटी करून तीन तिकिटें घेऊन आला. तेव्हा बाळासाहेब म्हणाला, "काय बाबूराव! तिसरा दर्जा मोठा सुखाचा खरा! अशा गर्दींत कोणी खिसा कापला तर काय होईल?"

"काय होणार आहे?" बाबूने उत्तर दिलें; "खिसा कापणाऱ्याला पश्चात्ताप होईल. कारण माझ्यासारख्याच्या खिशांत त्याला कांही मिळणार नाही. फार तर सुपारीचीं दोन खांडं, एकदोन विड्या, रिकामी झालेली काड्यांची पेटी––"

"अहो, बाबूराव! खाली फलाटावर चला. गाडी आली." बापू बोलला आणि ते प्लॅटफार्मवर आले तोंच गाडी स्टेशनांत शिरली. दादरवर जितके उतारू उभे होते त्यांनीच एक लंबी मोठी गाडी भरून जाईल असें बाळासाहेबांना वाटलें. दोन तीन ठिकाणीं त्यांनी जागा पाहिली पण तिघांना एकत्र बसतां येईल अशी जागाच दिसेना. शेवटीं भोंगा वाजला. गाडीने शिटी फुंकली; पोर्टरने घंटा बडविली; तेव्हा ते तिघेही ज्या दरवाज्यासमोर होते त्यांतूनच डब्यांत गडबडीने

शिरले. एका बाकावर एक इसम खुशाल बळकटी पसरून हात पाय ताणून पडला होता व समोरच्या बाकावरही तसाच दुसरा पडला होता. त्यांतल्या एकाला बापू म्हणतो, "अहो, पाटील, जरा उठा."

"पुढे जा! तिकडे जागा पुष्कळ आहे." पाटलाने डोळे झाकले.

"तुम्ही देतां का जरा जागा?" बापूने दुसऱ्याला विचारलें.

"चार दिवस जाग्रण झालंय् मला." त्याने उत्तर दिलें. "पुढे जा. गाडींत जागा खूप आहे. लोकांना बघायलाच नको."

"भर दिवसा माणसं उभीं असतांना तुम्हांला मात्र उठायला नको!" बाबू म्हणाला.

"कां? मोठे तालेवार दिसतां की? पुढं जा! आज चार दिवस झाले, झोप नाही. आणि इथं ही कटकट."

"झोपायला जागा मोठी छान काढलीत." बाबू म्हणाला. "रात्रीं झोप नाही म्हणतां! तें काय नाटकं पहात होतां काय? का नाटकांतच काम करतां तुम्ही?"

"कां रे बाबा? तोंड करूं नको हं."

"तुम्ही उठून बसा म्हणजे आमचं तोंड बंद झालं. आणि तुम्ही पाटील, तुम्ही पण उठून बसा. झोपायला इथं जागा नाही. आम्हांला बसायला जागा पाहिजे."

"असं काय?" पाटील म्हणाला; "मग आम्ही हलत नाही. झोपणार. जा वाटेल तिकडे नाही तर—"

"संध्याकाळीं सहा वाजतां झोप तरी कशी येते या लोकांना?" बाळासाहेबांनी बाबूला विचारलें. बाबूने त्याला कांही उत्तर न देतां पाटलाची उशी व तिच्या बाजूचें डोकें हीं खिडकीच्या बाजूला रेटण्यास सुरवात केली व थोडीशी जागा झाल्यावर तो तेथे रेटून बसला. पाटील अर्थात् अवघडला व कांही बोलणार इतक्यांत तिकिट

एक्झ्यामिनर तेथें आला व त्याला बाळासाहेबानें सर्व हकीकत सांगितल्यावर त्यानें दोघांनाही बिछानें गुंडाळण्यास व उठून बसण्यास लावलें. बाळ, बाबू व बापू एकदाचे बसले. इतका प्रकार होत असतां गाडी ठाण्याजवळ आली. पुढें कल्याण आलें. तेथें मंडळींनी चहा मागविला. त्या वेळीं बाबू आपल्या शेजाऱ्याला म्हणतो—" कां, चहा घेतां का पाटील? जरा चहा घ्या म्हणजे डोळयांतील झोप जाईल." पाटलानें विशेष तक्रार न करतां होय म्हटलें व मग तो दुसरा होता त्याच्यासाठीही चहा मागितला. पैसे देण्याच्या वेळीं पाटलानें व त्या दुसऱ्यानेही खिशांतून आणेली काढली पण बाबूनें सर्वांचेच पैसे चुकते केले व त्यांना आपापल्या आणेल्या खिशांत परत ठेवण्यास सांगितलें. मग पाटलानें आपला पानसुपारीचा बटवा काढला. तो म्हणाला, "तुम्ही अलीकडची मंडळी. तुमच्या चालीरीती आम्हांला समजत नाहीत. माझ्या चहाचे पैसे तुम्ही दिलेत. आता माझी पानसुपारी तर घ्या."

सर्वांनी पाटलांच्या पानसुपारीचा स्वीकार केला. त्या दुसऱ्या गृहस्थानें जवळची वेलची काढून सर्वांना दिली. मग बाबूनें सिग्रेटची पेटी काढली, त्यांतील एक सिग्रेट पाटलानें घेतली व त्या दुसऱ्या उतारूनेही एक घेतली. याप्रमाणें सर्व मंडळींची परस्परांशीं मोठी दोस्ती झाली. बाळासाहेबांनी विचारलें, " का, पाटील, उतरणार कोठें?"

" आम्ही तळेगावला उतरणार. तिथून मोटरीनं जुन्नरला जाणार. जवळच आमचा गाव आहे. येतांसा का तकड? गरिबाची झोपडी बघून तर जा!"

. बांबू म्हणाला, " तुम्ही आणि गरीब, पाटील! तुम्ही खरोखर सांगा वर्षाची कमाई केवढी करतां? देवाला स्मरून सांगा हं!"

" देवाला स्मरून सांगतों!" पाटील म्हणाला. " सालच्या काठीं तीनचार हजाराला मरण नाही."

" मग मुंबईत रेसब्रीस खेळत नाही?" बाबूनें विचारलें.

"त्या भानगडींत पडलं की भीकच मागितली पाहिजे. आमच्या-कडचे किती तरी लोक धुळीला मिळालेले आहेत. मी गरीब माणूस त्या पंचायतींत पडत नाही. आणि हा चहा आणि सिग्रेट. खरं म्हणाल तर मला नाही आवडत. आमची ही विडी काय वाईट आहे व्हय!"

"खरं आहे तुमचं म्हणणं!" बाळासाहेब म्हणाले, "तुम्ही असे वागतां म्हणून सालाच्या काठीं तीनचार हजार कमावतां. घरीं शेतीभाती बरीच असेल?"

"शेतीभाती आहे, बागाईत पण आहे. सर्व कांही देवाच्या दयेनं आहे. घरी पांच मुलगे आहेत; दहाबारा बैल आहेत; तीन चार गाई म्हशी आहेत. एकदा याच आमच्या गावाला रावसाहेब! मुंबईत राहून आम्हांला तर कंटाळा येतो. पैशाच्या पाठीमागे लागून मुंबईला जाऊन आम्ही बसतों. मार्कीटांत दुकान घातलं आहे तेव्हा कोणीतरी मुंबईत राहिलंच पाहिजे. पण खरं सुख परत गावीं गेलं म्हणजे मगच लागतं."

"आम्ही येऊं केव्हा तरी तुमच्या गावाला. आज तर आम्ही लोणावळ्याला उतरणार." बाळासाहेबाने सांगितलें.

"आज नाही, चार दिवसांनी या, आठ दिवसांनी या. मी आता गावीं महिनाभर राहणार आहे." पाटील म्हणाला.

याप्रमाणे बोलणें चाललें होतें. कर्जत येऊन घाट सुरू झाले व बोगद्याचें कधीही नाहीसें न होणारें कौतुक करतां करतां गाडी खंडा-ळ्याला आली व लोणावळा आल्यावर पाटलाचा निरोप घेऊन हे तिघे मित्र खाली उतरले. बाळासाहेबाचा बंगला उजव्या बाजूला होता. तेव्हा मंडळी पायपूल ओलांडून पलीकडे गेली व संध्याकाळची वेळ होती त्यामुळे हमालाच्या डोक्यावर सामान देऊन तिघेही चालूं लागले. कांही वेळ चालल्यावर दूर दूर अंतरावर बंगले दिसूं लागले. मंडळी धरणाच्या बाजूला वळली. अंधार लौकरच पडणार असें स्पष्ट दिसत होतें. बाळासाहेबाचा बंगला जवळ आला होता. धरणाचा रस्ता डाव्या बाजूला टाकून मंडळी बंगल्याकडे वळणार इतक्यांत दुरून आवाज आला व कोणी तरी ओरडतें आहे असें बाळासाहेबाला वाटलें.

तो थांबला. त्याच्या बंगल्याचा माळी त्याला पाहून पुढे आला होता. त्याच्याकडे वळून बाळासाहेब म्हणाला, "दाजी, या हमालाला बंगल्यावर नेऊन त्याचे पैसे चुकव. मग भटजीला बोलावून आमची जेवणाची व्यवस्था कर. आम्ही येतोंच." मग तो आपल्या मित्रांना म्हणाला, "आवाज धरणाकडून आला. आपण तिकडे जाऊं."

---

## प्रकरण दहावें

# सुरवात

आवाज ऐकूं आला तो कोणा तरी स्त्रीचा आवाज असावा असें बाळासाहेबांस वाटलें. धरणावरून जाणाऱ्या रस्त्याने खाली उतरून, पश्चिमेकडे टेकडया दिसतात, त्यांना समोर ठेवून चालूं लागलें म्हणजे वाघउडीचा रस्ता लागतो. आता अंधार पडला होता आणि माणसाची आकृति सुद्धा अस्पष्ट दिसूं लागली होती; तथापि आवाज त्याच बाजूने आला असें निश्चित वाटल्यामुळे बाळासाहेब व त्याचे दोन मित्र हे धरणाचा रस्ता उतरून चालूं लागले. दूर हिंडावयास गेलेला एखादा मनुष्य परततांना त्यांना भेटला परंतु एकंदरींत त्या बाजूला सर्वत्र निर्मनुष्य झालें होतें असें म्हणण्यास हरकत नाही. बापूच्या खिशांत एक विजलीचा दिवा ( टार्च ) होता आणि एकदोन वेळां त्याच्या प्रकाशांत दूरवर पहाण्याचा त्यांनी प्रयत्न केला पण त्याचा फारसा उपयोग झाला नाही. सुमारें दहा मिनिटें ते चालत होते पण तो आवाज कांही पुनः ऐकूं आला नाही. बापू म्हणाला सुद्धा "बाळ, आवाज तुला खरोखरच ऐकूं आला का ऐकूं आल्याचा भास झाला?" त्यावर मागे मान सुद्धा न वळवितां बाळासाहेब म्हणाला, "चांगलं बाईचं ओरडणं ऐकूं आलं. भास वगैरे कांही नाही." मग सर्वजण स्तब्धपणे आणखी पांच मिनिटें चालले. मागे वळून पाहिलें म्हणजे लोणावळयाच्या बंगल्यांतील दिवे लुकलुक करीत असलेले दिसत. धरणाच्या रस्त्याचा दरवाजा लागतो त्याच्या

जवळचा मोठा दिवाही चांगला दिसत होता. याप्रमाणे ते तिघे चालले असतांना त्यांना जवळच कोठे तरी—"हां, ऊठ आता, घेरी आल्याच्या तुझ्या सोंगानं मी फसणार नाही," असे शब्द ऐकूं आले. ते तिघांनीही स्पष्ट ऐकले. तेव्हा बापूने ज्या दिशेने आवाज आला तिकडे टार्चचा उजेड फेकला. त्या उजेडांत त्यांना जें दृश्य दिसलें त्यामुळे ते सर्वजण अगदी चकित होऊन गेले.

अंगांत बटनें न लावलेला टेनीस खमीस, खाली खाकी रंगाची चड्डी, त्याच्या खाली पायांत मोजे न घालतां चढविलेला इंग्रजी बूट, एका हातांत उन्हाच्या वेळीं घालण्याची इंग्रजी टोपी आणि त्याच हातांत आडवी घेतलेली एक भक्कम काठी अशा सरंजामांत एक तरुण उभा होता आणि त्याच्याच समोर निश्चेष्ट दिसणारी एक स्त्री पडलेली होती. टार्चचा उजेड त्या तरुणाच्या चेहऱ्यावर पडला न पडला तोंच त्याने आपलें तोंड फिरविलें; त्यामुळे त्याचा चेहरा जसा दिसावा तसा कोणालाही दिसला नाही. तरी पण त्या चेहऱ्यासंबंधीं कांही कल्पना बाळासाहेबाच्या मनांत राहून गेल्या; विशेषेंकरून त्या तरुणाचे डोळे कांहीसे चमत्कारिक होते व त्याच्या नाकाचा आकार थोडासा लक्षांत राहण्यासारखा होता. पण असें कांही तरी आपल्या लक्षांत राहिलें हें सुद्धा त्या वेळच्या गडबडींत त्याला समजलें नाही. बाळासाहेब व त्याचे मित्र जरा अधिक जलद चालूं लागले. इतक्यांत कोणी तरी पळण्याला सुरवात केली असा आवाज त्यांना ऐकूं आला तेव्हा तेही धावूं लागले. बापूने टार्चचा उजेड पुनः पाडला तेव्हा तो चमत्कारिक नाकाचा तरुण तेथे दिसला नाही. तेव्हा त्याने टार्च सभोंवार फिरविला व तसें करतांना तो थोडासा थांबला. बाळासाहेब पुढे धावतच होता. कांही वेळाने तो त्या स्त्रीजवळ जाऊन पोचला असें टार्चच्या प्रकाशांत बापूला दिसलें तेव्हा बापू व बाबू दोघेही लौकरच तिकडे गेले. "त्या माणसाच्या मागे धावत जाऊं का!" म्हणून बापूने बाळाला विचारलें पण बाळ म्हणाला, "तो माणूस आता सापडणं कठीण. या अंधारांत त्याचा पाठलाग करणं सोपं नाही. अगोदर टार्च इकडे कर पाहूं. ही बाई तर अगदी बेशुद्ध पडलेली दिसते."

बापूने टार्चचा उजेड त्या बाईवर पाडला. तिचा चेहरा खरोखर सुंदर दिसत होता, पण तिच्या चेहऱ्याच्या सौंदर्याचा विचार करण्याची ती वेळ नव्हती. एकाएकी भोवळ येऊन मनुष्य पडावा त्याप्रमाणे ती पडली होती. तिच्या पायांतील वहाणांपैकी एक पायांतच होती व दुसरी सरकून जरा दूर पडली होती. तिच्या हातांत बांगड्या होत्या व कानांत कुड्या होत्या; गळयांत कांही दिसत नव्हतें. ज्या कोणी तिच्यावर हल्ला केला किंवा तिला भिवविलें त्याने तिच्या अंगावरील दागिन्यांना हात लावला नव्हता हें स्पष्ट होतें. ती पांढरें पातळ नेसलेली होती व तिच्या अंगांत साधेंसें एक पोलकें होतें. बाळ खिशांतील रुमाल काढून तिला वारा घालूं लागला. वास्तविक तसा वारा घालण्याची आवश्यकता नव्हती; कारण त्या वेळीं वारा जरी जोराने वाहत नव्हता तरी मधून मधून वाऱ्याची चांगली झुळूक येत होती.

अशा प्रसंगीं काय केलें पाहिजे हें त्यांपैकी एकालाही माहीत नव्हतें आणि आकस्मिक कांही सुचेल हें शक्य नव्हतें. काय करावें म्हणजे ही बाई शुद्धीवर येईल याचा प्रत्येकाच्या डोक्यांत विचार चालला होता. सुदैवाने हा विचार त्यांना फार वेळ करावा लागला नाही. ती बाई जराशी हलली आणि क्षीण आवाजाने म्हणाली, "मुकाटयानं चालता हो!" असें म्हणून ती पुन: निश्चेष्ट पडली. काय करावें हें समजेना तेव्हा बाळासाहेबाने हिय्या करून तिचा हात हातांत घेतला व बोटापासून मनगटापर्यंत तो हळूहळू चोळण्यास सुरवात केली व तिचे पाय तसेच चोळण्याला बापू व बाबू यांना सांगितलें. हातापायाला याप्रमाणे हात लागतांच ती स्त्री पुन: जागी झाली व म्हणाली, "हां मुकाटयाने चालता हो—" मग तिने डोळे उघडले व ती उठून बसण्याचा प्रयत्न करूं लागली. तेव्हा बाळासाहेब म्हणाला, "उठवत नसेल तर थोडा वेळ पडून राहा. तुम्ही काय बोलतां हें आम्हांला समजत नाही. पण तुमचा शब्द ऐकून तुम्हांला साहाय्य करावं म्हणून आम्ही येथे आलों आहोंत. तुम्हांला भिण्याचें अगदी कारण नाही."

तिने बाळासाहेबांकडे पाहिलें. ज्याच्याशीं आपली बोलाचाली

झाली त्याहून हा निराळा मनुष्य आहे हें तिच्या लक्ष्यांत आलें. ती म्हणाली, "जरा खांद्याला हात द्याल तर मी उठून बसतें." त्याप्रमाणे ती उठली आणि काय झालें तें तिचें तिलाच ठाऊक, तिनें रडण्याला सुरवात केली. बराच वेळ तिला हुंदके आवरले नाहीत. तिच्या रडण्यांत अर्थात् कोणीही व्यत्यय आणला नाही. कांहीही न बोलतां ते तिघेही थोडेसे दूर उभे राहिले. कांही वेळाने तिचें रडणें थांबलें. पदराने तिने डोळे पुसले. मग जरा प्रयासाने ती उठून उभी राहिली व म्हणाली, "मला तहान लागली आहे आणि पायांतील शक्ति अगदी गेल्यासारखी वाटते. तुम्ही माझ्यासाठी फार त्रास घेतलांत. माझ्या या रडण्यानं तर तुम्हांला चमत्कारिक होऊन गेलं असेल; पण मी तरी काय करूं? मला राहवेना!" तिच्या डोळयांत पुन: अश्रु उभे राहिले व एक दोन हुंदकेही बाहेर पडले. बापूने खिशांतून 'एक्स्ट्रा स्ट्रांग' दोन वडया काढल्या व तो म्हणाला, "आमच्या बाळा-साहेबाचा बंगला इथून जवळ आहे. तिथं गेल्यावर चहा, कॉफी, पाणी—वाटेल तें मिळेल. सध्या ही तोंडांत टाका म्हणजे बरं वाटेल." एक शब्दही न बोलतां तिने ती वडी तोंडांत टाकली, व थोडया वेळाने ती म्हणाली, "आतां मला थोडं बरं वाटताहे. तुमचा बंगला जवळ असेल तर मला थोडंसं पाणी प्यायला द्या. मी राहतें ती जागा येथून बरीच दूर असावी. तिथं मला पोचविण्याची कृपा करा."

बाळासाहेबाने तिच्या बंगल्याचा पत्ता विचारला व तो कळल्यावर तो म्हणाला, "तुमची जागा इथून तीन मैलांहून कमी नाही. माझा बंगला जवळ आहे तिथं चला—कोणताही संकोच न धरतां आपलं घर आहे असं समजून तिथं थोडीशी विश्रांति घ्या. प्रथम थोडी कॉफी घ्या. म्हणजे तुम्हांला हुषारी येईल. जेवणही तयार असेल. जेवण झाल्यावर टांगा बोलावतों व तुम्ही सांगाल त्या ठिकाणीं पोचवण्याची व्यवस्था करतों. पण मनांत संकोच ठेऊं नका आणि बिलकूल भिऊं नका."

कांहीही उत्तर न देतां ती स्त्री त्यांच्याबरोबर हळू हळू चालूं लागली. बाळासाहेब व ती पुढे आणि बापू व बाबू मागे याप्रमाणे ते

चालले होते. मधूनमधून बापू टॉर्चचा उजेड पाडीत होता. थोड्या वेळाने ते बंगल्याशीं येऊन पोचले. बंगल्याच्या दाराशीं हातांत कंदील घेऊन माळी उभा होता. त्याला कॉफी ताबडतोब करण्याची वर्दी ब्राह्मणाला देण्याचें सांगून ते आंत शिरले. व्हरांड्यांत खुर्च्या होत्या तेथे बापू व बाबू बसले. बाळासाहेब त्या स्त्रीला घेऊन आंत गेला व त्याने तिला स्नानाची खोली दाखविली. मग तो बाहेर येऊन आपल्या मित्रांच्याजवळ बसला. तिघे एकही शब्द बोलले नाहीत. ब्राह्मणाने कांही वेळाने कॉफी आणून ठेवली. त्याच वेळीं ती स्त्री नीटनेटकी होऊन किंचित् हसतमुखाने बाहेर आली. तिघांनीही उठून तिला खुर्चीवर बसावयास सांगितलें व मग ते कॉफीकडे वळले.

आता ती तोंड धुवून नीटनेटकी होऊन आलेली होती आणि दिव्याच्या प्रकाशांत तिचा चेहरा सुंदर व आकर्षक होता हें बाळासाहेबाला स्पष्टपणें दिसलें. तिचें वय विशीच्या फारसें पलीकडे नसावें असें त्याला वाटलें व तिच्या आता प्रसन्न दिसणाऱ्या मुखावरून व सस्मित आणि सुबुद्ध दिसणाऱ्या डोळ्यांवरूनही तिचा स्वभाव आनंदी असावा हेंही त्याच्या लक्षांत आलें. त्याने पेल्यांत कॉफी ओतली. तिला विचारून साखरेचे तीन खडे त्यांत टाकले व दूध घालून व कॉफी थोडीशी ढवळून त्याने तिच्या हातांत पेला दिला. आणखी तीन पेले तयार करून त्यांतील दोन आपल्या मित्रांना दिले व एक आपण घेतला. चमच्याने कॉफी ढवळत बाळासाहेब म्हणाले, "कसलेही प्रश्न विचारून आपल्याला त्रास द्यायची माझी इच्छा नाही. जेवण झाल्यावर घटकाभराने मी तुम्हांला आपल्या बंगल्यावर पोचवीन. पण तुम्ही सुखरूप आहांत हें तुमच्या मंडळींना कळावं म्हणून माळ्याला आताच तिकडे पाठविला."

कॉफी पितां पितां ती म्हणाली, "तुमचे माझ्यावर फार फार उपकार झाले आहेत. ते कांही मला फेडतां येणं शक्य नाही. मी अगोदरच घरीं जाणं बरं झालं असतं. पण जेवणाचं आपण दिलेलं आमंत्रण नाकारून आपला हिरमोड करणं मला रास्त वाटत नाही. आपण जे प्रश्न विचाराल त्यांचीं उत्तरं मी आनंदानं देईन.

आम्ही नात्याचीं कांही मुलेंमुली मिळून चार दिवस बदल करण्यासाठी लोणावळयाला आलों आहोंत. आज टायगर्स लीपकडे हिंडावयास गेलों होतों. परत येतांना मी जरा जलद चाललें व पुढे येऊन इतर मंडळीची वाट पाहत उभी राहिलें. माझ्याबद्दल मनांत कांही कारणानं राग असलेला एक माणूस एकदम माझ्याजवळ आला व त्यानं माझा हात जोरानं धरून पळायला सुरवात केली. काय होत आहे याचं मला कांही वेळ भानही राहिलं नाही. केवळ हाकलेल्या जनावराप्रमाणें मी त्याच्या बरोबर पळत होतें. त्याने माझा हात घट्ट धरला होता. याप्रमाणें कांही वेळ पळत आल्यावर आपण दुसऱ्या रस्त्याने आलों आहोंत व माझे सोबती या रस्त्याने येणार नाहीत असं त्याने मला सांगितलं व नंतर तो माझ्याशीं चमत्कारिक गोष्टी बोलूं लागला. आम्ही कांही वेळ चालत होतों; मग त्याने माझ्याशीं लगट करण्याचा प्रयत्न केला. मी देहभान विसरलें व त्याच्या दोन तीन थोबाडांत लगावल्या. तेव्हा तो जरा दूर झाला, पण माझी पाठ सोडीना. एका ठिकाणीं मी ओरडलें व नंतर मला वाटतं मला घेरी आली. त्यानंतरची हकीकत माझ्यापेक्षा आपल्यालाच जास्त माहीत आहे."

बाळासाहेब गंभीरपणें म्हणाले, "तुम्ही ओरडलांत तें मला स्टेशनवरून बंगल्याकडे येतांना ऐकूं आलें, म्हणून काय गडबड आहे हें पाहण्यासाठी आम्ही आलों. बापूजवळ टॉर्च आहे त्याच्या उजेडांत तो पाजी माणूस आम्ही अर्धवट पाहिला; पण तोंडावर उजेड पडतांच त्याने यःपलाय केलें. आम्ही तुमच्याजवळ येऊन पोचतों तों तो बराच दूर गेला होता. शिवाय एवढ्या उघड्या रानांत रात्रीच्या वेळीं त्याचा पत्ताही लागला नसता, पण त्याचा चेहरा कांहीसा माझ्या लक्षांत आहे. तेव्हा इथंच जर तो कुठं असेल तर आज उद्या सापडणार नाही असें नाही."

"तुम्हांला त्यासंबंधीं विशेष तसदी घेण्याचं कारण नाही;" ती म्हणाली. "तो कोण आहे हें मला माहीत आहे आणि आता तो लोणावळयाला क्षणभरही राहील असं मला वाटत नाही; आणि राहिला

तरी मला त्याची फिकीर नाही."

"पण असल्या माणसाचा बंदोबस्त केलाच पाहिजे." बापू म्हणाला.

"तें खरं आहे;" तिने उत्तर दिलें; "बंदोबस्त करायची वेळ आली आहे असं मलाही वाटतं."

"बंदोबस्त करण्याची वेळ आली आहे तर तो होण्याचा राहील असं मला वाटत नाही." बाळासाहेब म्हणाला. "बरं, आता तुम्हांला जरा हुषारी आल्यासारखं वाटतं ना? आता झालेल्या सर्व गोष्टी विसरा आणि मनाला बिलकुल त्रास करून घेऊं नका. आणि आम्हांला आपले मित्र समजून कांही सांगायचं असल्यास जरूर सांगा."

"तूर्त सांगण्यासारखं कांही नाही. पण तुम्हांला भूक लागली असेल आणि माझ्यामुळं तुमच्या जेवणाला उशीर झाला असेल."

"आणि आमच्या या प्रश्न विचारण्याच्या धांदलींत तुम्हांला इतकं चालल्यामुळं सपाटून भूक लागली असेल हेंही आम्ही विसरलों. चला, जेवण तयार आहे." असें म्हणून बाळासाहेब उठला. पंधरा मिनिटांनी ती सर्व मंडळी जेवावयास गेली. लक्ष्मीची पूर्ण कृपा असल्यामुळे व तो लोणावळयाला मधून मधून वरचेवर येत असल्यामुळे तेथे आपल्या बंगल्यांत कांही नोकर माणसें त्याने कायमचीं ठेऊन दिलीं होतीं. त्यामुळे जेवणाचा थाट प्रवासी धर्मशाळेसारखा नसून घरच्यासारखा होता यांत कांही नवल नाही. जेवण चाललें असतांना ते सर्वजण अगदी मोकळया मनाने बोलत होते. ती स्त्रीसुद्धा संकोच न धरतां आपल्या घरोब्याच्या माणसाशीं बोलावें त्याप्रमाणें बोलत होती. तिच्या वागण्यामुळे त्या ठिकाणीं संकोचाचें वातावरण राहिलें नाही व त्यांचें जेवणखाण मोठया आनंदाने झालें. त्यानंतर कांही वेळ मंडळी पुढे अंगणांत येऊन गप्पा मारीत बसली. इतक्यांत टांगा आला तेव्हा मंडळी उठली. त्या स्त्रीने त्या तिघांनाही नमस्कार केला; पायांत वहाणा घातल्या व त्यांचे आभार मानले. बाळासाहेबाने अंगांत कपडे चढविले आणि तिला टांग्यांत मागे बसवून तो स्वत: टांगेवाल्याजवळ जाऊन बसला. टांगा चालू झाला

आणि वीस पंचवीस मिनिटांनी लोणावळ्याच्या अगदी दुसऱ्या भागांत आला. त्या स्त्रीने सांगितल्यावरून तिकडे एका बंगल्याजवळ तो टांगा थांबतांच पांच सात मंडळी 'सुंदर' म्हणून दरवाजाकडे धावली, बाळासाहेबांनी आणलेली ती सुंदरच होती हें चतुर वाचकांच्या लक्षांत यापूर्वीच आलें असलें पाहिजे.

सगुणा आणि सुहासिनी पुढे आल्या. "तुझा शोध करायला विसू आणि मोहन गेले आहेत. आम्ही अगदी घाबरून गेलों, तूं कुठं चुकलीस म्हणून"--याप्रमाणे त्या बोलताहेत इतक्यांत बाळासाहेबांना पाहून चपापल्या. सुंदर व बाळासाहेब टांग्यांतून खाली उतरले. सुंदर म्हणाली, "हे एक नवे मित्र आपल्याला लाभले आहेत. त्यांनी आज मला वाचविलं."

सर्व मंडळी बंगल्यांत आली आणि पुढचा अर्धा तास बोलण्याच्या गर्दीत गेला हें सांगावयास नकोच. इतक्यांत विसू व मोहन हेही टांग्यांतून आले. ते बिचारे निराश झाले होते व भ्यालेलेही होते. पण आल्यावर सुंदरला पाहून त्यांचा जीव खाली पडला. दुसऱ्या दिवशीं भेटण्याचें ठरवून आल्या टांग्यांतून बाळासाहेब परतले. चोहोकडे गार वारा सुटला होता; आकाशांत चांदण्या मौजेने चमकत होत्या. पण बाळासाहेबांचें लक्ष दुसऱ्या विचारांत गुंतलें होतें. त्यामुळे तो शीतल वारा आणि तारकांची ती शोभा हीं त्यांच्या मनांवर कांही परिणाम करूं शकलीं नाहीत.

## प्रकरण अकरावें

# बाळासाहेबाचें स्वागत

बाळासाहेब परत आपल्या बंगल्यांत येऊन पोचले त्या वेळीं बाबू आणि बापू झोपीं गेले होते. माळी कंदील घेऊन समोर व्हरांड्यांत बसला होता. टांगेवाल्याचे पैसे चुकते केल्यावर तो परत गेला. बाळासाहेब कोणालाही जागें न करतां आपल्या खोलीकडे वळले.

त्या वेळीं वारा चांगला वाहत होता आणि हवेंत पुष्कळ गारवा आलेला होता. परंतु आगगाडींतून उतरल्या घटकेपासून तों सुंदरला घरीं पोंचवीपर्यंत झालेल्या सर्व गोष्टी डोक्यांत घोळत असल्यामुळे बाळासाहेबाची झोप नाहीशी झालेली होती. आता चार घटका त्याचा सुंदरशीं जो संबंध आला, तिच्याशीं जें थोडें बोलणें चालणें झालें, तिची वागणूक जी त्याने पाहिली, त्यामुळे त्याच्या मनांत अनेक विचारतरंग सुरू झाले होते, यांत कांही नवल नाही. सगळा झालेला प्रकार एखाद्या कादंबरींत व्हावा तसा झालेला होता. सुंदरसारख्या तरुण मुलीला असा त्रास देण्याइतका शत्रु कोण असावा व काय म्हणून असावा; आणि त्याच्याशीं तिने अगदी एकटीने काय म्हणून झगडावें या प्रश्नांचा तो जसजसा अधिक विचार करूं लागला तसतसें त्या प्रश्नांचें उत्तर देणें त्याला अधिक अधिक कठीण वाटूं लागलें. पण जसे असले प्रश्न त्याच्यापुढे उभे राहिले त्याप्रमाणे तिचें रूपही त्याच्यापुढे उभें राहिलें. केवळ रूपच नव्हे तर तिचें तें निर्मळ हास्य, तिची निर्भय मुखचर्या, तिची सभ्य पण धीट वागणूक, प्रश्नाचें उत्तर सादर पण सडेतोडपणाने देण्याची तिची पद्धत या सर्व गोष्टींचा त्या दोन चार क्षणांतसुद्धा त्याच्यावर परिणाम झाल्याशिवाय राहिला नव्हता. बाळासाहेब हा श्रीमंताचा केवळ सोकाजीराव मुलगा नव्हता. तो चांगला शिकलासवरलेला होता आणि कॉलेजमध्ये असतांना अलीकडच्या मुली पूर्वीपेक्षा कोणत्या बाबतींत व किती प्रमाणांत भिन्न असतात हेंही त्याने पाहिलेलें होतें. मुलीच्या भोवती गोंडा घोळणाऱ्यांचा एक लहानसा वर्ग असतो. त्यांतील कांहीजण स्वतःला मदनाचा अवतार समजतात व ओष्ठावरील केशच्छेदन, मस्तकावरील केसकलापाचें स्त्रियांनासुद्धा लाजविण्यासारखें नेपथ्य, झिळमिळीत कपडे घालण्याची लकब इत्यादि जनानी मर्दपणाच्या आविर्भावाने आपण कोणालाही भुरळ घालूं अशा ऐटींत ते गर्क असतात. बाळासाहेब मिशाळ बाबू नव्हता. पण उपरोक्त प्रकारच्या मंडळींतलाही तो नव्हता, एवढेंच नव्हे तर तशा प्रकारच्या मंडळीबद्दल त्याला एक तऱ्हेचा तिटकारा वाटे. त्यामुळे मुलींच्याबद्दल खडानूखडा

माहिती आहे असे सांगणारे, कोठल्याही समारंभांत त्यांच्या सेवाशुश्रूषेला आवश्यकता नसली तरी तत्पर असणारे आणि एखाद्या मुलीची गाठ टेनीस कोर्टावर पांच वाजतां पडायची असेल तर चार वाजून पस्तीस मिनिटांनी नाकाखाली वस्त-ऱ्याच्या साह्याने साफसुफी करणारे, आणि इतकी यातायात करून शेवटीं कोणी विचारीत नाही कां पुसत नाही अशी खात्री होऊन अलीकडच्या सर्व मुलींबद्दल सरसहा निंदेचे उद्गार काढणारे व हिची काय भानगड आहे आणि तिची काय आहे याच विषयावर जिकडे तिकडे व्याख्यानें देणारे अशा मंडळीशीं त्याचें कधी जमत नसे. एकंदरींत स्त्रियांपासून दोन हात दूर असावें अशा पंथांतला तो होता. आज आकस्मिकपणें सगळा प्रसंगच असा आला की एका मुलीला साहाय्य करणें हें त्याला कर्तव्य म्हणून प्राप्त झालें. तें कर्तव्य त्याने उत्तम प्रकारें पार पाडलें हें मागील प्रकरणांत स्पष्ट झालेंच आहे. जसा तो मुलींच्या भोवतीं नाचणारा नव्हता तसा मुलींची ओळख असणें, त्यांच्याशीं बोलणें, वेळींप्रसंगीं त्यांना साहाय्य करणें वगैरे गोष्टी केल्या तर आपण कांही पातक केलें असेंही तो समजत नव्हता. तथापि आजचा प्रसंग त्याच्या आयुष्यांत थोडा नवीन व विशेष होता यांत शंका नाही व त्याचा थोडाबहुत परिणाम त्याच्या मनावर होणें साह-जिक होतें. तो परिणाम किती झाला याचें एक गमक म्हणजे त्याला बराच वेळ झोप आली नाही हें घेतां येईल. बराच वेळाने त्याला झोप लागली, तरी तो आपल्या मित्राच्या बऱ्याच पूर्वी उठला व लौकरच नेहमीप्रमाणें एक पेलाभर चहा पिऊन बापू आणि बाबू यांचा चहा गाळला होता त्या वेळीं थोडासा हिंडून परतही आला. त्याला बापू म्हणाला, "बाळ, आज आपण टायगर्स लीपकडे जाऊं."

"ती जागा बरीच दूर आहे. निदान चार वाजतां तरी निघालें पाहिजे." बाबूने सांगितलें.

डोक्यावरची टोपी खाली काढून खुर्चीवर बसतां बसतां बाळा-साहेब म्हणाला, "आज संध्याकाळीं मी रिकामा नाही."

"मला वाटलंच." "बापू हसूं लागला. "काल परत येतांना

एन्गेजमेंट ठरलेली दिसते--एन्गेजमेंट म्हणजे--समजलं ना? आपली संध्याकाळीं भेटण्याची."

"तिच्याबरोबर पांचसहा माणसें आहेत—" बाळने उत्तर दिलें.

"तुझ्याबरोबर दोघेच्च आहोंत आम्ही." बापू म्हणाला. "पण तूं काळजी करूं नकोस, बाळ आम्ही तुझी बाजू कांही खाली पडूं देणार नाही. पण कायरे, आम्ही नाही कां या एन्गेजमेंटमध्ये?"

"तुम्ही कसे नसाल?" बाळासाहेबाने विचारलें. "आपण सर्वांनी मिळून आज पांच वाजतां त्यांच्या बंगल्यावर चहा प्यायला जायचं ठरलं आहे."

"मग त्या वेळीं आमच्या बाळच्या अभिनंदनाचा ठराव येईल. त्याला आपण गजरांत अनुमोदन देऊं." बापू म्हणाला.

"म्हणजे तूं भाषण करून नाही कां अनुमोदन देणार त्या ठरावाला?" बाळने विचारलें. "शिवाय अभिनंदनाचा ठराव आलाच तर तो आपणां येणार; तेव्हा त्या वेळीं आपणांपैकी कोणालाही टाळ्या वाजवतां येणार नाहीत."

"बरें, तें राहूं द्या." बाबू म्हणाला; "ती तुला काय काय म्हणाली? तिची सर्व हकीकत कळली का?"

"मीं कांही तिची हकीकत विचारली नाही—" बाळासाहेब म्हणाला.

"मी आपला तिच्याकडे नुसता पाहत होतों—" बापू वात्रटपणाने मध्येच म्हणाला.

"खरें आहे. मी नुसता तिच्याकडे पाहत होतों; कारण असलं लावण्य पाहण्याचा प्रसंग वरचेवर येत नाही. ती मुलगी सुंदर आहे, ही गोष्ट कांही कोणी कोणाला सांगायला नको. आणि सौंदर्याने मन आकर्षित करून घ्यावें याचंही तुला आश्चर्य वाटायला नको."

"अरे, बाबा, मला मुळीच आश्चर्य वाटत नाही." बापू म्हणाला. "मला आश्चर्य वाटतं तें हें की उठल्याबरोबरच भेटण्याची तूं तिच्याशीं एन्गेजमेंट कशी केली नाहीस?"

यावर ते तिघेही हसले. मग चहा.झाल्यावर ते भटकण्यासाठी म्हणून बाहेर पडले, पण थोडयाच वेळाने उन फार पडलें म्हणून ते परत आले. बाबू जरी फार हिंडला नव्हता तरी त्याला चहा पुनः पाहिजे होता. अर्थात् चहा आला तेव्हा सर्वांनाच आला. चहापानानंतर बापूने सिग्रेट पेटविली व तिचा धूर काढून त्या धुराकडे पहात पाहत तो म्हणाला, "मला असं वाटतं बाळ, की काल ही जी बाई भेटली इच्याशीं आपण फार ओळख करून घेऊं नये. अशी एकटी गाठून तिच्यावर एका माणसानं हल्ला करावा हें लक्षण कांही बरं नाही."

"कोणाच्या लक्षणासंबंधानं बोलतोस हें तूं?" बाळासाहेबाने विचारलें.

"अर्थात् तिच्या. काय तिचें नांव, सुंदर–वाः नांवसुद्धा सुंदर!"

"मग तुला हें नांव पसंत नाही? आपण तें बदलून टाकूं."

"एकूण नांव बदलण्यापर्यंत मजल आली म्हणायची!" बापू गंभीरपणें म्हणाला. "काय म्हणतात ना—दृष्टि पडे आणि प्रेम जडे; अशीच तुझी अवस्था झालेली दिसते."

"तुझी अवस्था मात्र मला कठीण दिसते." बाळासाहेब म्हणाला. "सुतानं स्वर्गाला जाण्याच्या कलेंत तूं अगदी निष्णात दिसतोस. तूंच म्हणालास की तिचं सुंदर हें नांव आपल्याला नापसंत आहे म्हणून."

"मग त्याचा तुला इतका राग कां?" बापूने विचारलें. सुंदर या नांवांत ध्वनि नाही. अगदी केवळ वाच्यार्थ. नांवच सुंदर असं दिलं की त्या नांवाच्या अतिपरिचयानंच सौंदर्याची हानि होते. पुष्कळ वेळां सौंदर्य नसलं म्हणजे असलं नांव देतात. जास्वंदीच्या फुलासारखा चेहरा असेल तर कमल नांव देणं किंवा जिच्याकडे पाहिलं तर हसूं यावं तिला सुहासिनी नांव देणं वगैरे––"

"वगैरे म्हणजे काय?" बाळासाहेबाने विचारलें. "या मुलीच्या बाबतींत तर नांव अगदी बरोबर आहे. कायरे बापू?"

"तें कळलं आहे रे मला," बापूने उत्तर दिलें. "ती सुंदर आहे याबद्दल कां माझा मतभेद आहे? पण नांव जरा निराळं हवं होतं. बाकी तें तूं आता बदलणार आहेसच म्हणा. मग नांव बदलण्याचा केव्हा आहे समारंभ? आम्हांला ती वेळ अगदी मुद्दाम राखून ठेवली पाहिजे."

"अद्यापि तुझं सुतानं स्वर्गाला जाणं चाललंच आहे. पण हें नांव ठेवण्याचं तूर्त आपण तहकूब करूं. मघां तूं म्हणालास की एका माणसानं तिच्यावर हल्ला केला. हें तिचं लक्षण कांही बरं नाही."

"हो. म्हणालों असं मी." बापू बोलला.

"त्या बिचारीचा त्यांत काय अपराध?" बाळासाहेबाने विचारलें. "एखाद्या बदमाषानं तिच्यावर हल्ला केला तर त्यांत तिचा अपराध काय?"

"तो माणूस आपल्या ओळखीचा आहे असं तिनं काल रात्रीं इथं सांगितलं. तो जर तिच्या ओळखीचा आहे तर बदमाष असणार नाही. आणि जर एखादा बदमाष तिच्या ओळखीचा असेल तर तिचं लक्षण बरं नाही हें उघड आहे." बापूने जयदर्शक मुद्रेने हसत हसत सांगितलें.

"तूं वकील फार चांगला होशील." बाळासाहेब म्हणाला.

"होशील म्हणजे? वकीलच होणार आहें मी; पण वकील जरी झालों तरी तुझ्या विरुद्ध पक्षाचं वकीलपत्र मी केव्हाही घेणार नाही. माझं म्हणणं इतकंच की या मुलीची जास्त चौकशी केल्याशिवाय कांही ठरवणं बरं नव्हे."

"कमाल आहे तुझ्या टारगटपणाची!" बापूच्या पाठीवर एक धक्का देऊन बाळासाहेब म्हणाला. "मी लग्नाला उभा राहिलों आहें कीं काय तिच्याबरोबर!"

"म्हणजे? मी तर तसंच समजलों."

"मग, बापूसाहेब, आपला समज चुकीचा आहे." बाळासाहेबाने सांगितलें. "आता आपली तिच्याशीं ओळख झाली तर ती नाही झाली असें का म्हणून चालणार आहे?"

" छे: छे:; तसं कसं चालेल? " बापू म्हणाला. " पण बाळ, जमलं तर कांही वाईट नाही. तिच्या रूपाबद्दल प्रश्नच नाही. बाकीचे पस्तीस गुण जमले की जमलं. बरं ही चेष्टा राहू द्या. मला तूं हें सांग की तिचा बंगला किती दूर आहे? "

" आहे दोन अडीच मैल." ` ` उत्तर दिलें.

" आणि तिथं पांच वाजतां चहा प्यायला जायचं? म्हणजे चार वाजतां येथून निघालं पाहिजे. चार वाजतां ऊन किती असतं याची कांही तुला कल्पना आहे का? "

" मला सगळी कल्पना आहे. इथं चार वाजतां किती तरी माणसं हिंडायला जातात. "

" पण बाळ, कोणी तरी आणि किती तरी अशा माणसांत आपली गणना करून घ्यायची का? " बापूने विचारलें. "एक चांगला टांगा बोलावूं आणि इथून पावणे पांचला निघूं. म्हणजे बरोबर पांच वाजतां तिथं. निघतांना थोडा चहा पण घेऊं. "

" पण तिकडे चहालाच जायचं ना? " बाळने विचारलें.

" माझा बाबा नियम आहे की चहाचं आमंत्रण असलं तरी घरीं चहा घेतल्याशिवाय बाहेर पडूं नये. चहाचीच गोष्ट काय, कोणी जेवायला बोलावलं असलं तरी दोन घास घरीं खाऊन घ्यावेत, म्हणजे पानावरून उपाशीं उठण्याचा संभव राहत नाही. "

" स्वानुभवाच्या गोष्टी का या? " बाबूने विचारलें.

" अगदी स्वानुभवाच्या. ते पुण्याचे का सातार्‍याचे का ठाण्याचे का कल्याणचे मला आठवत नाहीत, पण म्हणे लोकमान्य टिळक गेले होते त्यांच्या घरीं. हे गृहस्थ चांगले लक्षाधीश होते म्हणे आणि पुनः टिळकांचे अगदी दोस्त. ते टिळकांना म्हणाले, 'माझ्या गरिबाच्या घरीं पिठलं भात मिळेल तो गोड करून घ्या.' टिळकांच्या बरोबर त्यांचे कांही गण होतेच. त्यांना वाटलें की यजमानांचा हा औपचारिक विनय आहे. पण पुढे प्रत्यक्ष पानावर जेव्हा बसले तेव्हा काय पिठलें आणि भात! दुसरें कांही नाही. त्यांतले एक होते खंबीर–ते

म्हणाले पिठलें तर पिठलें. त्यांनी तें दुसरे वेळीं मागितलें. तेव्हा यजमान म्हणतात, 'चांगले पायलीभर चणे पाठविले होते दळायला, पण पावशेराचं दळणं झालं आणि गिरणीचं यंत्र बिघडलं—' तेव्हा बाबा, जग हें असें आहे. म्हणून म्हणतों—"

"तूं तर थापा देण्यांत पटाईत दिसतोस! तुझी गोष्ट उघड उघड खोटी आहे." बाबू म्हणाला.

"कशावरून?" बापूने विचारलें.

"अरे शहाण्या, एवढा गृहस्थ चणे गिरणींत का दळायला पाठवील? त्याची बायको, त्याच्या सुना, त्याच्या मुली, त्याची आई आणि त्याची सासू आणि घरीं आलेली एखादी पाव्हणी यांपैकी कोणीच अस्तित्वांत नसेल तर दळण गिरणींत जाण्याचा प्रश्न. शिवाय दुसरें असें पहा, टिळकांच्या वेळची गोष्ट तूं सांगितलीस. तेव्हा पुणें आणि सातारा, ठाणें आणि कल्याण इकडे दळायच्या गिरण्या होत्या का?"

"बोलला मोठा शहाणा!" तोंड वेंगाडत बापू म्हणाला. "म्हणे गिरण्या होत्या का? ज्या टाण्यांत एवढा थोरला तुरुंग आणि वेडयांचें इस्पितळ आहे तिथं दळण्याची गिरण नव्हती? ज्या पुण्यांत टिळक आणि रानडे होऊन गेले तिथं दळण्याची गिरण नव्हती? ज्या कल्याणला एवढं मोठ जंक्शन आहे आणि स्टेशनापलीकडे खानावळ आहे तिथं का दळण्याची गिरण नसेल? ज्या साताऱ्यांत अजिमताऱ्याचा एवढा किल्ला आहे तिथं का गिरण आणि ती सुद्धा दळण्याची नसेल? अरे कांही शहाणपणानं बोल."

बापूचें हें गंभीर भाषण ऐकून बाळ व बाबू यांना सडकून हसूं आलें आणि शेवटीं त्यांत बापूही सामील झाला. जेवणखाण करून दोन तास विश्रांति घेतल्यावर चार साडे चार वाजतां चहा घेऊन टांग्यांत बसून ही मंडळी सुंदर जेथे आपल्या मंडळीसहित उतरली होती त्या बंगल्याकडे गेली. टांगा खरोखर पांचाच्या ठोक्याला बंगल्यासमोर थांबला. दारांत सुंदर उभी होती. तिच्या तजेलदार नेत्राकडे पाहतांच आपलें स्वागत किती अंत:करणपूर्वक झालें आहे हें बाळासाहेबाला पटलें आणि त्याला आपल्या सर्व शरीरभर आनंदाच्या

लहरी उसळताहेत की काय असें वाटलें. सुंदर त्या वेळीं विशेषच सुंदर दिसत होती. तिच्या सस्मित आणि प्रसन्न मुखाकडे पाहून बापूचा सर्व वात्रटपणा पार निवळला आणि तो बाबूला अगदी हळूच म्हणाला, "या चेहेऱ्यावर झळकणारं तेज सद्गुणांचं आहे यांत शंका नाही."

---

## प्रकरण बारावें

# परिचयाची प्रगति

तिच्या सस्मित, तेजस्वी, आकर्षक मुखाकडे पाहून बापूची वात्रटपणाची चित्तवृत्ति मावळली आणि ही तेजस्विता व प्रसन्नता सद्गुणांच्या वास्तव्याखेरीज मिळावयाची नाही असें त्याने आपल्या मित्राला हळूच सांगितलेंही; एवढेंच नव्हे तर आपला मित्र बाळा-साहेब याच्याशीं या मुलीचें लग्न होईल अशा प्रकारची जी थट्टा त्याने सकाळीं चालविली होती त्या थट्टेचा अर्थ आता अगदी मना-पासून त्याला रास्त वाटूं लागला. म्हणजे, सुंदर बाळची जर पत्नी होईल तर बाळ मोठा भाग्यशाली असा विचार त्याच्या मनांत आला. बाळने तिला काल रात्रीं पाहिली; प्रथम पाहिली तीसुद्धा मोठ्या धांदलींत; नंतर त्याने तिला टांग्यांतून घरीं पोचविलें, तेव्हा मागे पाहण्याची इच्छा झाली असली तरी तिला आचरणांत न आणण्याची त्याने खबरदारी घेतली हें त्याच्या सुविनीत स्वभावाला अनुरूप असेंच झालें. पण आता त्याला ती दिसली तेव्हा तिचें वास्तविक सौंदर्य त्याच्या डोळ्यांसमोर पूर्णपणें उभें राहिलें व तो क्षणभर चकित झाला. आदल्या दिवशीं संध्याकाळीं तशा स्थितींत पाहून त्याच्या अंतःकरणांत प्रथम कारुण्यभाव उत्पन्न झाला, आणि कुत्सितपणाची त्याला सवय नसल्यामुळे एखाद्या वाईट माणसाने तिच्या पाठीमागे असें काय म्हणून लागावें हा प्रश्न जरी उभा राहिला, तरी तिच्याविषयीं त्याच्या मनांत अनादराची कल्पना आली नाही. पण आता तिचें त्या संध्याकाळच्या सूर्यप्रकाशांत निर्वेधपणें दर्शन झाल्यानंतर त्याच्या

अंतःकरणांत उल्लास, औत्सुक्य, आनंद या भावना उत्पन्न झाल्या. त्या उत्पन्न झाल्या याची वार्ता त्याला नव्हतीच. तो तिचें मधुर सौंदर्य आपल्या डोळ्यांनी प्राशन करण्यांत इतका गर्क झाला होता की ती स्वागताचे शब्द काय बोलली हें सुद्धा त्याला ऐकूं आलें नाही. त्याचे मित्र बंगल्याच्या व्हरांड्याकडे गेले तरी हा होता तेथेंच उभा राहिलेला ! मग सुंदरने जेव्हा हसत हसत मोठ्याने म्हटलें, "या बंगल्याच्या बगीच्यांत सुंदर फुलं आहेत; पण चहा झाल्यावर तीं पहाण्याला वेळ आहे;" तेव्हा तो देहभानावर आला आणि तिच्या हसऱ्या मुखकमलाकडे पाहून तोही हसला आणि म्हणाला, "हा बगीचा इतका सुंदर आहे आणि यांतील फुलं इतकीं बहारदार दिसतात की मी त्यांकडे पहाण्यांत अगदी तल्लीन होऊन गेलों. चला, आपला चहा तयार झाला असेल, माझ्यामुळे विलंब नको." मग ते दोघेही बंगल्यांत गेले आणि सर्वांचा यथोक्त परिचय झाल्यावर सर्व मंडळी कांही वेळ चहापानांत गर्क झाली. त्यानंतर बंगला इकडे तिकडे पाहिल्यावर ते थोडीशी सहल करण्यासाठी बाहेर पडले. टेकडीला वळसा घेऊन वाट चढते तिकडून ते निघाले. त्या रस्त्याला करवंदें पुष्कळ मिळतात, त्यामुळे बरीचशी मंडळी करवंदें काढण्यांत गुंतली. सुंदर व बाळ बोलत बोलत चालले होते व करवंदें काढण्यांत बरीच मंडळी गुंतली आहेत हें त्यांच्या लक्षांत न [illegible] ते थोडेसे पुढे गेले. मग मंडळी मागे राहिली आहे हें त्यांना समजलें. तेव्हा करवंदीचें एक मोठें झाड पाहून तेथे ते थांबले व दोघे एकदम करवंदें हुडकूं लागले. त्या झाडाचीं करवंदें बरींच आंबट निघालीं व तीं तोंडांत घालतांच त्यांचीं तोंडें आंबट दिसूं लागलीं आणि गोळा केलेलीं सर्व करवंदें त्यांना मोठ्या नाखुषीनें फेकून द्यावीं लागलीं. कांही वेळ आंबट तोंडाने एकमेकांकडे पाहिल्यावर सुंदर म्हणाली,

"पुष्कळ वेळां मोठ्या हौसेनं आणि खटपटीनं अशीं फळं तोंडांत टाकण्यासाठी गोळा करावींत आणि मग तीं तोंडाला आंबट लागून फेकून द्यावींत हा या संसाराचा नियमच दिसतो."

"या तुमच्या बोलण्यावरून तुमच्या आनंदी चर्येच्या मागं

बऱ्याच गंभीर विचारांची खळबळ चाललेली दिसते. पण संसाराचा तुम्हांला अद्यापि अनुभवही नाही." बाळ म्हणाला.

सुंदर जरा चपापली. मग ती हसली. "संसाराचा मला अनुभव नाही ही गोष्ट खरी. पण मी त्या शब्दाचा उपयोग केला तो अगदी सामान्य अर्थानं." ती म्हणाली.

"समजलं. संसार म्हणजे व्यवहार; या जगाची राहटी. पण तुम्ही जें वाक्य बोललांत तें तोंडांतून बाहेर पडायला एक चांगल्या ग्रंथांचं पाठांतर तरी पाहिजे किंवा त्यांतील सत्य अनुभवानं पटलेलं तरी असलं पाहिजे."

"किंवा जगांत जें चाललं आहे त्याकडे जरा लक्षपूर्वक पाहणाराला नाही का असले विचार सुचणार ?

"तेंही शक्य आहे." बाळने उत्तर दिलें. "पण तें वाक्य तुमच्या तोंडून ऐकून मला जरा चमत्कारिक वाटलं. कालचा तुमच्यावरचा प्रसंग—निदान त्याचा शेवटचा भाग—मी प्रत्यक्ष पाहिला. त्यामुळे हें वाक्य कांही तरी अर्थानं भरलेलं असावं असं मला वाटलं. पण माझ्या बोलण्यानं मी तुम्हांला दुःख तर देत नाही ना ?"

"छे: छे: तुम्ही म्हणतां तें खरं आहे. दोन आणि दोन मिळवले म्हणजे चार होतात. त्या न्यायानं माझ्यावरचा कालचा प्रसंग आणि असलं जरा जड अर्थाचं वाक्य यांत संदर्भ दिसतो यांत शंका नाही; आणि त्याबद्दल तुमच्या मनांत विचार यावेत हें स्वाभाविक आहे. शिवाय, माझ्यासंबंधीं सर्व माहिती विचारण्याचा तुम्हांला पूर्ण अधिकार आहे. काल तुम्ही माझ्यावर जे उपकार केलेत ते माझ्या हातून फिटणं शक्य नाही. अगदी प्रेमाच्या आप्तांनी जसं करावं तसं केलंत."

"काल जें मी केलं तें कोणाहीसंबंधीं केलं असतं. तसं करणं हें माझंच काय पण प्रत्येकाचं कर्तव्य आहे. तेव्हा मी तुमच्यासाठी कांही विशेष केलं हा भलता मोठेपणा तुम्ही उदारपणानं मला दिलांत तरी मला तो घेतां येत नाही, हें तुम्हीही कबूल कराल."

"ठीक आहे. तुमची मर्जी ! मोठेपणा हा देवघेवीचा पदार्थच नाही. तेव्हा तो देणं माझ्या हातचं नाही आणि न घेणं तुमच्या हातचं नाही."

"पण मला एकच गोष्ट सांगायची आहे. ती सांगण्याचं धारिष्ट करतों याची क्षमा करा. कालच्या प्रसंगावरून—मला त्यासंबंधीं तुम्ही कांहीही सांगू नका—तुमचा कोणी तरी मोठा शत्रु असावा असं दिसतं. तेव्हा त्या शत्रूचा बीमोड करण्यांत किंवा त्याच्याशीं झगडण्यांत जर कसलंही साहाय्य लागेल तर तें माझ्याकडे मागण्यांत मुळीच संकोच करूं नका. मी भित्रा नाही; माझ्याजवळ पैसा आहे; माझ्याजवळ मनुष्यबळ आहे—"

"तुमच्यासारख्याला पैसा व मनुष्यबळ यांचा तोटा येण्याला कारण दिसत नाही. तुम्ही जें आता बोललांत त्याबद्दल तुमचे आभार मानायला माझ्याजवळ पुरेसे शब्दही नाहीत. पण जरा विचारतें म्हणून रागावूं नका. या असल्या झगडयांत माझाच पक्ष रास्त असेल हें आपण गृहीत धरून चालला आहांतसं दिसतं."

"मी गृहीत धरून चाललों नाही—त्यासंबंधीं माझी पुरी खात्री आहे."

"हा जरा उतावीळपणा नाही कां होत? माझ्या चेहऱ्यांत आकर्षकता आहे असं मी ऐकलं आहे. तिचा तर हा परिणाम तुमच्यावर झाला नाही ना?"

बाळासाहेब जरा गोंधळला; पण तो क्षणमात्रच. मग तो म्हणाला, "तुमच्या चेहऱ्यांत आहे याबद्दल तुमच्याखेरीज कोणाला शंका असेलसें वाटत नाही. आणि ती इतकी आहे की तिचा परिणाम कोणावरही होईलच. पण केवळ या आकर्षकतेमुळे मी हा उतावळेपणा करीत आहे असं मात्र नाही. अगोदर हा उतावळेपणा नाही. कालपासून जें मी पाहिलं त्यावरून माझी तशी खात्री झालेली आहे."

"आपलं मत बनविण्यांतही जरा घाई होत आहे असं मला वाटतं." सुंदर गंभीरपणें म्हणाली, " विरुद्ध अशा गोष्टी आपल्या कानावर येणार नाहीत असें नाही. माझ्यासंबंधीं भलभलत्या गोष्टी तुम्हांला कोणीतरी सांगतील. आणि भलतंच मत बनविल्या-बद्दल तुम्हांला पश्चात्ताप होईल."

"मला तसं वाटत नाही. आणि तसा प्रसंग आलाच–म्हणजे माझं मत बदलण्याचा प्रसंग आलाच–तर, स्त्रियांबद्दल आमच्या पुरुषांची जी चिरंतन साशंकवृत्ति आहे तिचा तो एक दाखला होईल."

"अशी साशंकवृत्ति आहे तर मग एकूण ?"

"आहे हें खरं–नाही म्हणण्यांत अर्थ नाही. आणि ती वृत्ति तशी असण्याला कारणही अगदी सबळ आहे."

"तें कोणतं ?"

"तुमच्यासारख्या सुबुद्ध व चतुर मुलीला तें माहीत असलंच पाहिजे. पुरुषांची स्त्रियांबद्दल दृष्टि बहुतेक कामातुर असते. त्यामुळे कोणतीही स्त्री या दृष्टीच्या झपेतून सुटलेली नसणार असं मानण्यांत बऱ्याचशा पुरुषांना–न कळत कदाचित्–पण अभिमान वाटतो."

"पुरुषजातीबद्दल तुमची वृत्ति कांही मोठीशी सरळ दिसत नाही. पण हा वाद राहूं द्या. तूर्त माझ्या प्रश्नाचं उत्तर मला मिळालेलं नाही; आणि तेंही तुम्ही द्याच असं मी म्हणत नाही. मात्र तुमचा माझ्यावर जो विश्वास आहे त्याबद्दल मी तुमचे आभार मानतें."

"पण माझ्या मागणीला तुम्ही उत्तर नाही दिलं ?"

"मागणी ?" सुंदरने चपापून विचारलें.

"जरा बोलण्यांत चूक झाली." बाळासाहेब म्हणाला, "माझ्या देणगीचा तुम्ही स्वीकार केला नाहीत असं मी म्हणणार होतों. तुम्हांला कसलंही साह्य लागलं तर तें माझ्याकडे मागण्याचा संकोच करूं नका."

सुंदर प्रसन्नतेने हसली. "म्हणजे मागणी मी करावयाची आहे आणि देणगी आपण देणार—"

"मी कांही बोलण्यांत चुकलों नाही ना ?"

"नाही. बोलण्यांत मुळीच चुकलां नाहीत. उत्तम मित्र ही जगांत दुर्मिळ वस्तु आहे. तेव्हा तुमच्या सांगण्याप्रमाणं मला जरूर लागेल तेव्हा तुमचं साहाय्य मागण्याला मी संकोच करणार नाही," सुंदरने उत्तर दिलें.

आता बाळासाहेब हसला आणि म्हणाला, "तुम्ही माझ्या देणगीचा स्वीकार केल्याबद्दल मी तुमचे आभार मानतों. पण माझ्या डोक्यांत एक शंका आलेली आहे. ती विचारूं का?"

समोरच्या टेकडीवर दिनराज अस्तास चालला होता. त्याच्या आरक्त बिंबाकडे सुंदर पाहत होती. तिने मान वळविली आणि ती म्हणाली, "शंका असेल तर जरूर विचारा. शंका कधीही मनांत शिल्लक ठेवूं नये."

"हें जें मी साह्य आपल्याला देईन म्हणतों त्यांत माझा हेतु शुद्ध आहे अशी तुमची खातरजमा आहे का?"

आता मात्र सुंदर मोठ्याने हसली; पण मग ती थोडीशी लाजली. समोर अस्तंगत होत चाललेलें रविबिंब आणि तिचें मुख-कमल यांच्यातलें साम्य पाहून बाळ क्षणभर आश्चर्यचकित झाला. किंबहुना तिच्या मुखचंद्रम्याच्या उदयाने लज्जा पावून त्या रवि-बिंबाने टेकडीखाली उडी घेतली की काय असेंही त्याच्या मनांत आलें. मग ते दोघेही उठले आणि परत फिरले. बाळासाहेब म्हणाला, "माझ्या प्रश्नाचं उत्तर नाही मिळालं मला."

"उत्तर मिळण्यासाठी का प्रश्न विचारला होता?"

"मग प्रश्न कशासाठी विचारतात?"

"काव्यांत प्रश्नालंकार म्हणून एक अलंकार आहे. जो प्रश्न विचारतात त्याचं उत्तर त्या प्रश्नांतच असलं म्हणजे तो अलंकार होतो."

"पण तो अलंकार होण्याला कांही तरी चमत्कृति त्या उत्तरांत असली पाहिजे नाही?" बाळासाहेबाने विचारलें.

"जिथं प्रश्नच चमत्कारिक तिथं त्याच्या उत्तरांत चमत्कृति असणारच.—पण ती पहा, मंडळी जवळच आहे. त्यांनी करवंदं खूपच गोळा केलेलीं दिसतात. आपलीं करवंदं आंबट निघालीं. आता त्यांचींच घेऊन खाल्लीं पाहिजेत." याप्रमाणें बोलून ती भराभर चालूं

लागली व थोडयाच वेळांत ते दोघेही आपल्या मित्रांच्या जवळ आले. ते जवळ आलेले पाहून बापू हसून म्हणाला, "आम्हां सर्वांना गुंगारा देऊन तुम्ही कुठं गुप्त झालां होतात? आम्हांला वाटलं तुम्ही कांही आता लौकर परत येत नाही. बोलत तरी काय होतां एवढा वेळ?"

"काय हा चमत्कारिक प्रश्न!" मोहन म्हणाला.

"मग त्याचं उत्तर तूंच देऊन टाक." विश्वनाथने सांगितलें.

"जरा हात आटोपा—म्हणजे जीभ आटोपा." बाळासाहेब म्हणाले. "भलभलते तर्क करूं नका. सुतानं स्वर्गाला जायची सवय बरी नव्हे हें तुम्हांला माहीत आहेच."

"आम्हांला कांही माहीत नाही." बापू म्हणाला. "हा सूत कोण कुठला वगैरे आम्हांला कांही माहीत नाही. शिवाय एवढ्यां-तच स्वर्गाला जाण्याची आमची इच्छा नाही."

"कायरे, भाषेंत ध्वनि असतो याची तुला वार्ता आहे काय?" बाळासाहेबाने विचारलें.

"हा ध्वनि कुठचा?" मोहनने विचारलें. तो पुढे बोलणार इतक्यांत बाळू म्हणाला, "ध्वनि म्हणजे आवाज एवढाच अर्थ आम्हांला माहीत आहे. कवितेंत ध्वनि असतो असें म्हणतात. तो अर्थात् कविता गाऊन दाखविणाऱ्या कर्त्रीचा आवाज होय."

यावर ते सर्व हसले. मग विश्वनाथ अगदी गंभीरपणें म्हणाला, "काल रात्रीं आम्ही आमच्या सुंदरबद्दल अगदी हवालदील झालों होतों. तुम्ही ऐन वेळीं होतां म्हणून बरं झालं. नाही तर काय प्रसंग ओढवला असता कोण जाणें. आम्हां सर्वांतर्फे, बाळासाहेब, मी आपले आभार मानतों."

"आणि आमचे आभार कोणीच का नाही मानीत?" बापूने वात्रटपणाने विचारलें. "हा विजेचा दिवा कांही बाळासाहेबांचा नव्हता. तो माझा आहे आणि त्याचा उजेड जर पडला नसता तर कोणाला कांहीही करतां आलें नसतें."

"खरं आहे. बापूच्या शहाणपणाच्या उजेडामुळे सर्व कांही जुळून आलं." बाळासाहेब म्हणाला. "तेव्हा बापू व बाबू यांच्यातर्फे मी तुमच्या स्वीकार करतों; आणि आता भाषेचा भार कोणी कोणाच्या पाठीवर लादूं नये अशी मी सर्वांना विनंती करतों. खरें विचाराल तर सध्या आम्हांला करवंदें पाहिजेत–आम्ही काढलीं तीं एकजात आंबट निघालीं–तेव्हा थोडीं करवंदं आम्हांला द्या–"

"आम्हांला म्हणजे?" बापूने विचारलें.

"म्हणजे मला—" बाळासाहेब थोडासा लाजला असा भास झाला; "मला आणि सुंदराताईंना—"

"अहो सुंदराताई!" विश्वनाथ म्हणाला, "तुमचा बाळासाहेबांच्या 'आम्हींत' अंतर्भाव आलेला दिसतो. मग—"

"मग काय?" सुंदर जरा रागाच्या बोलली.

"तसें कांही नाही." विश्वनाथ म्हणाला, "हीं करवंदं घे आणि बाळासाहेब तुम्ही पण घ्या. फार गोड आहेत."

"तूंच गोळा केलेलीं, तेव्हा गोडच असणार." सुंदर म्हणाली. तिने एक करवंद तोंडांत टाकलें व पुढे ती कांही तरी बोलणार इतक्यांत ती मंडळी उभी होती तेथे एकदम कोणी तरी दुरून टाकलेला धोंडा पडावा त्याप्रमाणें कांही तरी येऊन पडलें. बाळासाहेब लागलीच खाली वाकले व पाहतात तों खरोखरच भोवती कागद गुंडाळलेला तो एक लहानसा दगड होता. एखादे वेळीं तो कोणाला लागलाही असता. प्रकाश अगदी नाहीसा झालेला नव्हता. बाळासाहेबाने दगडाभोवती गुंडाळलेला कागद काढून घेतला व तो साफ करून दोन्ही हातांनी धरला. त्यावर पेन्सिलीने कांही तरी लिहिलेलें होतें. तें त्या संधिप्रकाशांत स्पष्टपणें वाचतां येईना. तेव्हा बापूने आपला टार्च काढून त्याचा प्रकाश त्या कागदावर पाडला. तेव्हा पुढील मजकूर बाळासाहेबाने वाचला:—

"काल ज्याने तुला साहाय्य केलें त्याच्या गळयांत पडण्याचा तुझा विचार दिसतो. त्याला तुझी सर्व हकीकत लौकरच कळविण्याची

व्यवस्था होईल. शिवाय माझ्याखेरीज इतराच्या गळ्यांत तूं पडण्यापूर्वी मी तुझा गळा दाबण्याला सुद्धा कमी करणार नाही."

बाळासाहेबाने तें वाचलें आणि त्याला चमत्कारिक झालें. त्याने सुंदरकडे साभिप्राय पाहिलें. ती म्हणाली, "तें तुम्ही घाईंत वाचलेंत त्यांत तुमचा दोष नाही. आपण सर्व मित्र आहोंत."

"हें काय गौडबंगाल आहे?" विश्वनाथने विचारलें.

"गौडबंगाल कांही नाही. माझ्या पाठीमागे जो राहुकेतु सारखा लागलेला आहे त्याचा हा एक आणखी मूर्खपणा आहे."

"मी वाचायला नको होतें; निदान मोठ्याने वाचायला नको होतें." बाळासाहेब म्हणाला. "पण कांही बिघडलं नाही–आपण सर्व मित्र आहोंत." असें म्हणून बाळासाहेबाने ती चिठी सुंदरकडे दिली व सुंदरने ती पोलक्याच्या खिशांत एक शब्दही न बोलतां ठेवून दिली.

---

## प्रकरण तेरावें

# मोहनची स्पष्टोक्ति

"हें काय गौडबंगाल आहे?" हा प्रश्न विश्वनाथाने मोठ्याने विचारला व नंतर तें पत्र वाचण्याची चूक केली तशीच आपण हें विचारण्याची चूक केली असें त्यालाही वाटलें. सर्व मंडळी घरीं परतली. दुसरे दिवशीं ट्रिपसाठी आलेली मंडळी परतणार होती; पण आग्रहावरून त्यांनी आपला मुक्काम एक दिवस अधिक वाढविला व त्या दिवशीं बाळासाहेबाकडे जेवणाचें आमंत्रण स्वीकारलें. सुंदरच्या पाठीमागे कोणी तरी दुष्ट मनुष्य लागला आहे हा विचार सर्वांच्या मनांत आला व तो कोण असावा याबद्दल जो तो मनांतल्या मनांत तर्क करूं लागला. त्यासंबंधीं विचार करतांना आज-

कालच्या शिक्षणानें जें स्वातंत्र्य ॱ ⁻ˑ⁻⁻ मिळूं लागलें आहे, निदान स्वातंत्र्याची जी अभिलाषा त्यांच्यांत उत्पन्न होऊं लागली आहे, तिच्या बरेवाईटपणाबद्दल शंकाकुशंका त्यांच्या मनांत येऊं लागल्या. त्यांत एक मौज अशी झाली की, गुप्त पोलिसांच्या गोष्टी वाचून डोकीं भारलेल्या एक दोघांनी आपापसांत कुजबुजतांना पुढील कल्पना बसविली. लोणावळ्याला ˝ : दोन वेळां हा प्रकार झाला किंवा तीन वेळां कांही तरी घडलें; त्याअर्थी त्या मंडळींपैकीच कोणी तरी वात्रटपणानें म्हणा, किंवा चिरडीनें म्हणा, असें वागण्यास सुरवात केली असली पाहिजे. परंतु आपल्यापैकी कोणीही इतक्या विचित्रपणें वागेल हें त्यांना खरें वाटेना. तथापि ही कल्पना कुजबूज करीत प्रत्येकाच्या कानांत शिरली--अर्थात प्रत्येकाच्या म्हणजे सुंदरखेरीज प्रत्येकाच्या.

रात्रीं मंडळी लौकरच झोपीं गेली; मात्र विश्वनाथ व मोहन बाहेर व्हरांड्यांत आरामखुर्चीवर गप्पा मारीत बसले होते ते उठले नाहीत. "बैस रे थोडा वेळ, मला अजून झोप आलेली नाही" असें म्हणून विसूनेच मोहनला बसवून घेतलें असें म्हटलें तरी चालेल. त्यांचे बिछाने व्हरांड्याच्या मागे दिवाणखान्यांत होते आणि तेथे ज्या आणखी दोघांचे बिछाने होते ते कुंभकर्णाच्या गोत्रांतील होते. त्यांना एकदा झोप लागली आणि बाहेर जरी नौबदी झडूं लागल्या तरी ते जागे होण्याची मुष्कील! मुली पलीकडच्या खोलींत झोपल्या होत्या. त्यांना अगदी मुद्दाम लक्ष दिल्याशिवाय ˑ ˑ ˝ बोलणें—आणि तेंही फार मोठ्यानें चाललें असल्याशिवाय—ऐकूं येणें शक्य नव्हतें. व्हरांड्याच्या बाजूला खोल्या होत्या त्यांतही कोणी कोणी झोपले होते; पण त्यांनाही विसू आणि मोहन यांच्या ˋ ˋ त्रास होण्यासारखा नव्हता. शिवाय ते हळूहळू बोलत होते आणि एकंदरींत आवाज वर असा चढलाच नाही. विश्वनाथानें आग्रह करून जेव्हा मोहनला बसविलें तेव्हा मोहन म्हणाला, "काय? माझी टर बीर उडविण्याचा विचार नाही ना? तसा असल्यास मी आपला जाऊन स्वस्थ झोपतों."

"नाही, नाही; मला तुझ्याशीं कांही महत्त्वाच्या गोष्टीसंबंधानं बोलायचं आहे. ˑ एकटे भेटायला संधिच मिळत नाही ती

आता कोठे मिळाली; आणि अशा वेळाशिवाय ती मिळणें शक्य नाही."

"ठीक आहे, कोणत्या विषयासंबंधीं तुला बोलायचं आहे? आता सांग काय तें." मोहन बोलला.

"आज जो प्रकार झाला, परवा जो प्रकार झाला, त्यासंबंधीं तुला काय वाटतं?" विश्वनाथानें विचारलें.

"जें तुला वाटतं तेंच मला वाटतं. कोणी तरी पाजी माणसानं हा फाजीलपणा चालविला आहे. दुसरं काय?"

"दुसरं कांही नाही; पण प्रश्न इतकाच की, हा पाजी मनुष्य इथं असलेल्या आपल्याच मंडळींतला कोणी आहे की काय?"

"तुला माझा तर वहीम येत नाही, विशा?" मोहननें विचारलें.

"आणि आला तरी काय? मला तुझा वहीम येणं जसं अशक्य नाही तसंच माझा वहीम तुला येणार नाही काय? त्यांत तुझं सुंदरवर प्रेम होतं हें तुझ्याच कवितेमुळं पुष्कळांना कळलेलं आहे."

"एकूण माझी चेष्टा करण्याशिवाय तुझा दुसरा हेतु नाही."

"छेः छेः, चेष्टेचा हेतु मुळीच नाही."

"म्हणजे, खरोखरच तुझा माझ्यावर वहीम आहे की काय!"

"माझा वहीम मुळीच नाही तुझ्यावर. पण दुसऱ्या कोणाला तसा वहीम आला–येणं अगदी अशक्यच नाही–तर त्याचं निवारण करण्याची तुझ्याजवळ कांही तयारी आहे की नाही?"

"हा खासा न्याय! भलताच कांही तरी वहीम घ्यायचा आणि मग म्हणे त्याचं निराकरण करशील का? पहिली गोष्ट–असलं पाजी-पणाचं पत्र मी सुंदरला लिहीन का? दुसरी गोष्ट–हा दगड येऊन पडला तो दुरून कोणी तरी फेकला होता आणि मी तर तुझ्या मागंच उभा होतों. तिसरी गोष्ट–परवा संध्याकाळीं मला वाटतं तूं आणि मी घरीं एकदम पोचलों."

"खरं आहे. तूं म्हणतोस ती प्रत्येक गोष्ट खरी आहे. तेव्हा तुझ्यासंबंधीं वहीम घेणं म्हणजे केवळ मूर्खपणा आहे."

"तरी पण तुला तसा वहीम आला."

"मला तसा वहीम मुळीच आला नाही. पण कोणाला तरी आला असं मला वाटलं, म्हणून मी तुला विचारलं. मला तुझा वहीम यावा इतका का मी मूर्ख आहें?"

"माझी चेष्टा करायची तुला इतकी सवय लागलेली आहे, की माझ्या ठिकाणीं कसलाही आचरटपणा किंवा दुष्टपणा संभवणं शक्य आहे असं तुला वाटतं."

"मोहन, तूं भलताच विपर्यास केलास!"

"मध्येच जाडे जाडे शब्द घालून बोलूं नकोस. आता एवढंच सांग, सुंदरला तर अशी शंका आली नाही? वास्तविक, ती शहाणी आहे; पण तुझ्यासारख्यानं कान फुंकल्यावर कोणाची बुद्धि कशी चळेल याचा कांही नियम नाही."

"इंद्राय स्वाहा तक्षकाय स्वाहा" विसू म्हणाला. "अरे मोहन, मी मूर्ख आहें हें सिद्ध करण्यासाठी बिचाऱ्या सुंदरचे कान हलके समजण्याची आवश्यकता आहे का?"

"मी तिच्याबद्दल कांही म्हणत नाही, पण तुला ही शंका यावी हें बिलकूल बरोबर नाही."

"अगदी बरोबर नाही" व्हरांड्याच्या एका बाजूचें दार उघडून सुंदर बाहेर आली व वळून म्हणाली, "तुझं म्हणणं अगदी बरोबर आहे, मोहन. तुझा वहीम या विसूनं घेणं म्हणजे आर्षपणाची कमाल झाली."

"आता तुम्ही दोघे मिळून माझी चेष्टा करणार वाटतं?" मोहनने विचारलें.

"मोहन, मी तुझी चेष्टा करीत नव्हतों." विसू म्हणाला.

"तूं त्याची चेष्टा करीत नव्हतास," सुंदर बोलली, "पण त्याच्यावर भलताच आरोप करीत होतास. मी मोहनला चांगला ओळखतें. त्याच्याबद्दल अशी शंका घेणं म्हणजे सुद्धा पाप आहे."

"पण मी शंका घेतली नाही." विश्वनाथ काकुळतीने म्हणाला. "दुसऱ्या कोणाला शंका आली तर तूं काय उत्तर देशील असं मी त्याला विचारीत होतों."

"असं विचारणं आणि प्रत्यक्ष शंका घेणं सारखंच. मोहनला राग आला त्यांत कांहीच नवल नाही."

"आता मला बनवायचा तुम्हां दोघांचा विचार आहे वाटतं?" विश्वनाथने विचारलें.

"कोणालाही बनवायचा माझा विचार नाही." सुंदरने उत्तर दिलें. "पण अशा कांही गोष्टी या चार दिवसांत घडल्या आहेत, की एका ` ^ मी खुलासा केलाच पाहिजे. तो केला नाही तर भलत्यांना भलत्यांची शंका येऊन कांही तरी भलताच परिणाम होईल अशी मला भीति वाटते."

"तुला जर कांही सांगायचं नसेल तर सांगूं नकोस." विसू बोलला.

"जें सांगायला नको तें मी सांगत नाही. पण एक गोष्ट सांगितलीच पाहिजे. मला परवा संध्याकाळीं कोण भेटला आणि आज त्या दगडाभोवती गुंडाळलेलं पत्र लिहिणारा कोण हें माहीत आहे."

"काय, तुला माहीत आहे!" मोहनने विचारलें. "मग तूं स्वस्थ कशी बसलीस? तो माणूस इतक्या निकराला आल्यावर त्याची उपेक्षा करणं बरं नव्हे. नाही तर भलताच प्रसंग ओढवायचा."

"परवाचा प्रसंग कांही साधा नव्हता." विसू म्हणाला. "आणि तुला जर माहीत आहे तर त्या दुष्ट माणसाचा तूं बंदोबस्त करणं जरूर आहे. तूं बंदोबस्त करायचा म्हणजे आम्हांला सांगायचं; तो कोण आहे तो सांग; तो पुनः तुझ्या वाटेला जाणार नाही असा बंदोबस्त करणं हें काम माझ्याकडे लागलं."

"मी पण तेंच म्हणतों." मोहनने सांगितलें.

"तुमचे दोघांचेही माझ्यावर फार उपकार आहेत, आणि जरूर लागेल तेव्हा तुमची मदत मागायला मी संकोच करणार नाही.

पण आज मी अधिक कांही सांगत नाही. आपापसांत मात्र कोणी कोणा-वर वहीम घेऊं नये म्हणून इतकं सांगण भाग होतं."

"तूं सांगितलंस हें चांगलं केलंस; पण यांत तूं अधिक तें काय सांगितलंस, सुंदर?" विश्वनाथने विचारलें. "जरी आमच्या डोक्यांत एकमेकांबद्दल कांही तर्ककुतर्क निघाले, तरी तुझ्यावर चोरटेपणाने हल्ला करणं किंवा तुला असलं बदनामीचं पत्र पाठविणं या गोष्टी करण्याइतका वाईट मुलगा आमच्यांत कोणी नाही हें आम्हांला समजत नाही का?"

"तें समजलं असतं तर आता तुझी आणि मोहनची जी हुज्जत चालली होती ती चालली नसती." सुंदर म्हणाली.

"मी थट्टेनं विचारलेल्या प्रश्नाचा मोहननं भलताच अर्थ केला, तसाच तूंही करतेस, सुंदर!" विश्वनाथ म्हणाला. "पण माझ्या मनांत मोहनबद्दल कसलीही शंका नाही."

"त्याबद्दल मला जराशी शंका आहे," सुंदरने सांगितलें. "पण जाऊं द्या, तुझं म्हणणं मी कबूल करतें. तूं चेष्टा केलीस आणि तिचा अर्थ मोहननं किंवा मी भलताच केला. पण अशा चेष्टेला सुद्धा थारा मिळूं नये म्हणून मी सांगितलं तें लक्षांत ठेव. तो माणूस कोण आहे हें मला माहीत आहे!"

"त्याचं नांव तूं सांगणार नाहीस?" विश्वनाथने विचारलें.

"सध्या तरी त्याचं नांव सांगण्याचा माझा विचार नाही." सुंदरने उत्तर दिलें. "तुम्हीही त्याच्या नांवासंबंधीं विचार करण्याचं कारण नाही. माझ्या मूर्खपणाचं फळ मलाच भोगलं पाहिजे."

"तुझा मूर्खपणा? पण त्या माणसाचा पाजीपणा नाही का यांत? तो कांही नाहीसा होत नाही." विश्वनाथ म्हणाला.

"आपण परवा काल इथं होतों तेव्हा या गोष्टीची चर्चा केली. ती पुनः करण्याचं कारण नाही आणि मी पुनः सांगितलं ना की वेळ आली तर मी त्या माणसाचं नांव सांगेन. तुमची मदत घ्यायला मी मुळीच संकोच करणार नाही."

विश्वनाथ म्हणाला, "पण सुंदर, तूं वरचेवर आपल्या मूर्ख-पणाचा उल्लेख करतेस तें मला आवडत नाही."

"यांत आवडीनिवडीचा प्रश्न नाही. सर्वच चुका सारख्या भयंकर नसतात. सर्वच चुका बुद्धिपुरस्सर होत नाहीत आणि बुद्धि-पुरस्सर झालेल्या चुका पुष्कळ वेळां योग्य गोष्टी म्हणूनच केलेल्या असतात. चुकणं हें कोणालाही चुकलेलं नाही. तेव्हा एखाद्यानं आपण चूक केली हें कबूल करणं किंवा तशी त्याला जाणीव होणं यांत चूक असं कांहीच नाही."

"एकच शब्द वरचेवर आल्यामुळे तुझं हें वाक्य जरा दुर्बोध झालं आहे;" मोहन हसून म्हणाला. "पण सुंदर, तूं कांहीही चूक केलेली असशील तर ती या मनुष्याच्या पाजीपणाचं समर्थन करण्या-इतकी भयंकर असेल यावर माझा मुळीच विश्वास नाही."

"माझाही पण नाही." [illegible] सांगितलें.

"आणि माझाही पण नाही." सुंदरने हसत सांगितलें. "पण त्या माणसाचा आपणां सर्वांशीं मतभेद दिसतो एवढें खरें."

"तें खरें असेल आणि त्याला कांही इलाज नसेल. पण त्याच्या पाजीपणावर खास इलाज असला पाहिजे." विसू म्हणाला. "तूं मला त्याचं नांव सांग--"

"मी सांगितलं यापेक्षा अधिक कांही सांगणार नाही." सुंदरने उत्तर दिलें आणि ती जावयास निघाली.

"सुंदर, जरा स्पष्टपणें बोलूं का?" मोहनने विचारलें.

"अगदी बेलाशक." सुंदर खुर्चीवरून उठली होती ती पुन: बसली. "मला देखील आज झोप येत नाही. तेव्हा तुझं स्पष्ट बोलणं काय तें तरी ऐकून घेतें. अगदी स्पष्ट बोल. मला राग येणार नाही."

"कांही भलतंच बोलूं नकोस, हां, मोहन!" विसू म्हणाला. "आणि तुझं स्पष्ट बोलणं ऐकायला मी असलों तर चालेल का?"

"विसू, ही चेष्टा करायची वेळ नाही." मोहन म्हणाला.

"होय, मोहन, ही रात्रीची वेळ आहे. या प्रशांत समयाला चेष्टा कोणाला सुचेल ?"

"सुंदर," मोहन म्हणाला; "तुझ्या सौंदर्यानं पुष्कळांना मोहिनी पडते; आणि तुझ्या अतिशय मोकळेपणाच्या वागण्यानं तुझ्या मनांतील हेतूंबद्दल पुष्कळांची गैरसमजूत होते. मला वाटतं तुला सुद्धा ही गोष्ट कबूल असली पाहिजे."

"बिलकूल नाही." सुंदर म्हणाली.

"एखादा चांगला माणूस असा फसल्यावर आपणच मूर्ख होतों म्हणून स्वस्थ बसेल;" मोहन पुढे म्हणाला, "व तुझ्या दोषांचा तो उच्चारही करणार नाही. आता तुझे दोष—हे तुझे, का...पण तें राहूं द्या. दोष एवढं खरं. पण जर एखाद्या बाहेरून संभावित दिसणाऱ्या पण आतून दुष्ट असलेल्या माणसाचा तुजबरोबर प्रसंग आला व प्रथम तुझ्या [illegible] झालेली समजूत जर केवळ गैरसमजूत होती असं त्याच्या लक्षांत आलं तर तो मात्र तुझी गय करणार नाही."

"हें शक्य आहे." सुंदरने सांगितलें.

"हा जो माणूस सध्या तुला त्रास देत आहे तो अशा प्रकारचा माणूस असला पाहिजे." मोहन गंभीरपणें म्हणाला.

"पण तो दुष्ट आहे हें तुलाही मान्य आहे." विश्वनाथने बजावलें.

"तें मलाही मान्य आहे;" मोहनने उत्तर दिलें. "सुंदरचं वागणं हें त्याच्या दुष्टपणाचं समर्थन करण्याला पुरेसं आहे असंही मी म्हणत नाही. पण मला जें सांगायचं आहे तें निराळंच आहे. सांगूं का ?"

"मी ऐकण्यासाठी इथं बसलेली आहें." सुंदर म्हणाली व मोहनकडे टक लावून पाहूं लागली.

"तुझं आपल्यावर प्रेम आहे असं या माणसाला वाटलं असेल आणि त्याला तसं वाटण्यासारखी तूं वागली असशील—मला अर्थात् प्रत्यक्ष कांही माहीत [illegible] कदाचित् त्याच्या दुष्टपणाचा ठाव

न लागून त्याला भोळाबापडा समजून जशा मी तुझ्यावर कविता लिहिल्या आहेत तशीं तूं त्याला पत्रंही लिहिलीं असशील."

"कां? मला कविता करतां येणार नाहीत वाटतं?" सुंदरने हसण्याचा प्रयत्न केला, पण तिच्या मुद्रेवरचें गांभीर्य कायम होतें.

"माझं म्हणणं असं" मोहन पुढे म्हणाला, "की असा गैरसमज होण्यासारखी तुझी स्थितिच असूं नये. म्हणजे कांही भानगड होणें शक्य नाही."

"मग तुझं म्हणणं काय?" सुंदरने विचारलें.

"मला वाटतं," मोहन अगदी सावकाशपणें व गंभीरपणें म्हणाला, "तूं आता लग्न करावंस."

"तुझ्या सूचनेंत बराच अर्थ आहे." सुंदर म्हणाली.

"मला हसण्याची परवानगी आहे का?" विसूने विचारलें. "मला हें बोलणें ऐकून हसूं आवरेनासें झालें आहे."

"कोणालाही हसण्याची परवानगी नाही." सुंदर म्हणाली.

"विसू, तुला हसूं रे का येतं?"

"आता हसूं नको तर काय रडूं? हा मोहन मोठ्या गंभीरपणें तुला सांगतो की तूं लग्न कर; पण कोणाशीं लग्न कर हें बेटा सांगत नाही. मला तर त्याचं हें 'प्रपोझल' दिसतं."

"वा: रे शहाण्या!" मोहन तुच्छतादर्शक मुद्रेने म्हणाला. "मला जर प्रपोझल करायचं असतं तर तुला साक्षीदार ठेवला नसता."

"हें खरं." विसूने कबूल केलें. "मग मी न बोलतां चूप बसतों."

"हाच शहाणपणाचा मार्ग आहे." सुंदर त्याला म्हणाली. मग ती मोहनकडे वळून म्हणते, "तुझं म्हणणं, मोहन?"

"तूं त्याच्याशीं लग्न करावंस." विसू मध्येच बोलला.

"अरे, तूं बोलणार नव्हतास ना?" सुंदरने जरा रागाने विचारलें.

"म्हणजे? माझ्या बोलण्याचा राग का आला तुला? मग, मोहन, तुझं अभिनंदन करण्याची वेळ आली आहे की काय?"

"तूं स्वतःला समजतोस तितका मी तुला कधी शहाणा समजत नव्हतों." मोहनने उत्तर दिलें. "पण आता दाखवलास एवढा अजागळपणा तुझ्या ठिकाणीं असेल ही कल्पना नव्हती मला."

"बाजू उलटली खरी माझ्यावर!" विसू म्हणाला.

"मग आता मध्ये बोलूं नकोस." सुंदरने सुचविलें.

"तेव्हा माझें म्हणणें असें" मोहन सुंदरकडे वळून म्हणाला. "तुझं लग्न झालं की कसल्याही गैरसमजुतीला जागा राहणार नाही. विसू म्हणतो आहे—फाजिलपणानं—की हें मी तुला प्रपोझल करतों आहें. एक वेळ मी तें करणार होतों, पण तूं माझ्या बोलण्यावर आणि लिहिण्यावर इतकं गार पाणी ओतलंस—"

"मराठींत बोल रे! मोहन!" विसू म्हणाला.

"इतकं गार पाणी ओतलं आहेस की तुझ्यासारखी पत्नी मिळण्याचं भाग्य माझं नाही ही माझी खात्री होऊन चुकली आहे." मोहनने एक सुस्कारा टाकला.

सुंदर खुर्चीवरून उठली व मोहनच्या पाठीमागे उभी राहून एक हात तिने त्याच्या खांद्यावर ठेवला. ती म्हणाली, "मोहन माझ्यासारखी पत्नी मिळण्याइतका तूं दुर्भागी नाहीस. तुला माझ्यापेक्षा अनुरूप अशी पत्नी मिळेल आणि ती मिळावी यासाठी मी खचित खटपट करीन. माझ्या अंगांत जे गुण नाहीत ते माझ्या भावजयींत आहेत हें पाहून तरी मला समाधान होईल."

"माझ्या बोलण्यामुळं तुला राग तर आला नाही सुंदर?" पाठीमागे न वळतां मोहनने विचारलें." मला फारसा विचार करण्याची सवय नाही; पण गेल्या चार दिवसांत झालेल्या गोष्टींचा विचार मी केला आणि स्पष्टपणें तुला सांगावं असं ठरवलं. मी काय सांगितलं हें ऐकायला विसू होता हेंही ठीक झालं. म्हणजे मी काय बोललों यासंबंधी कोणी तर्ककुतर्क करण्याचें कारण नाही."

"मोहन," विसू म्हणाला; "तुझ्या कविता वाचून तूं इतका शहाणा असशील असं मला वाटलं नव्हतं. कवि म्हणजे वेडा हें माझं

मत मी आज आनंदानं बदलतों. मग आता आपलं पुढलं काम म्हणजे आपल्या सुंदराताईला योग्य असं स्थळ हुडकून काढलं पाहिजे."

"आजकालच्या मुली काळ आणि स्थळ यांचा विचार दुसऱ्यावर सोपवीत नाहीत." मोहनने उत्तर दिलें.

"तूं तर आज तत्त्वज्ञान्यासारखा बोलत सुटला आहेस." विसू म्हणाला. "सुंदर, आज काय झालंय् याला ?"

सुंदर कांही वेळ बोलली नाही. मग ती म्हणाली, "उद्या आपला बराचसा वेळ बाळासाहेबांच्या बंगल्यावर जावयाचा आहे. तिथं जरा वादविवाद करतांना दुसऱ्याच्या घरीं आहोंत हें लक्षात ठेवा."

"त्याची काळजी नको तुला!" विसूने उत्तर दिलें, "मी शहाणा आहेंच; मोहनबद्दलही आता शंका उरली नाही. बाकी कोणी चूक करणारच नाही. पण काय ग सुंदर, एवढी तुला त्या बाळासाहेबाची कदर काय म्हणून ?"

"आता आपली सभा बरखास्त करावी नाही ?" सुंदर हसत हसत निघून गेली.

---

## प्रकरण चवदावें

# चांडाळचौकडी

ज्या चाळींत किंवा इमारतींत आपण जाणार आहों तशा इमारती मुंबईत थोडथोडक्या नाहीत. मुगभाट किंवा कादेवाडी, ठाकुरद्वार किंवा फणसवाडी, झावबाची वाडी किंवा राबब्राची वाडी . . किंवा माकडवाडी कोठेही गेलांत तरी अशा इमारती कैक सापडतील. धोब्याच्या तलावापासून तों परळ दादर ओलांडून माटुंग्याची शीव लागेपर्यंत अशा इमारती शेंकडो आहेत. त्यांची मुख्य खूण म्हणजे त्या भररस्त्यावर असावयाच्या नाहीत. आंत गल्लयागल्लयांनी जाऊन त्या मिळावयाच्या. त्यांचा दर्शनी भाग अगदी गचाळ असावयाचा आणि आंत काय आहे त्याचा बाहेरच्या देखाव्यावरून अंदाजहि

लागावयाचा नाही. तेव्हा जेथे आता आपण जाणार त्याचा बिनचूक 'भूगोल' वर्णन करण्याची आवश्यकता नाही. दारापुढे घोड्याची गाडी कांही जाऊं शकत नव्हती. ती जवळजवळ पाव अर्धा फर्लोंग दूर ठेवावी लागे व तेथून अरुंद गल्लीने या इमारतींत प्रवेश करावा लागे. मुंबईत इतक्या उलाढाली झाल्या, जुनीं घरें पाडलीं, नवे रस्ते केले पण अद्यापि जे भाग पूर्वीसारखेच स्वयंभू आणि निरंतर आहेत त्यांतच ही इमारत असलेला भाग होता. इमारतींत शिरल्याबरोबर एक एक खोल्यांचे गाळे सर्वत्र दिसत होते व चौतर्फा गाळ्यांच्या मध्ये सगळ्या बाजूनी घाण पडण्याचें उघडें ठिकाण होतें. इमारतीचे चार जिने चढेपर्यंत देखावा सर्व सारखाच. पण चौथा जिना चढून वर गेल्यावर एकदम नव्या सृष्टींत आल्यासारखें वाटे. तेथे खोल्या खोल्या नसून प्रशस्त दिवाणखाने, लाकडी सामानाने भरलेल्या मोठाल्या खोल्या, चांगले कपडे घातलेलीं माणसें, दिवाबत्तीचा चांगला बंदोबस्त, झाडून पुसून स्वच्छता केलेली, असा प्रकार दिसत होता. त्यांपैकी एका मोठ्या खोलींत शिरल्यावर तेथून आंत एक मोठा दिवाणखाना दिसतो. तेथे खुर्च्याही आहेत आणि गादीतक्यांची बैठक पण आहे. खोलींत बाहेरून शिरण्यापूर्वी जरा भिंतीवर निरखून पाहिलें तर 'खाबू क्लब' म्हणून कोणी पेन्सिलीने फार ठळक न दिसेल अशा बेताने लिहून ठेविलेलें होतें. आताच दिवाणखान्यांत एका आरामखुर्चीवर एक तुंदिलतनु गृहस्थ चिरूट फुकत बसले होते. त्यांच्यासमोर तक्क्याला टेकून चांगले लांबरुंद पण अंगाबरोबर दिसणारे गृहस्थ तंबाखूचा बार भरीत होते. त्यांच्या-पलीकडे दुसऱ्या तक्क्याला खेटून संपूर्ण श्मश्रू केलेले तिसरे एक गृहस्थ पेपरमिंट खात होते व मधून मधून तपकिरीने नाकपुड्या चोंदीत होते. पलीकडे टेबलाकडे तोंड करून खुर्चीवर बसून एकजण कांही लिहीत होता. त्या चार आसामींच्या चेहऱ्यामोहऱ्याकडे पाहिलें तर त्यांच्यांत सारखेपणा कसलाही दिसत नव्हता. पण जेथे परस्परविरुद्ध अशा पंच-महाभूतांचें हें आपलें शरीरच बनलेलें आहे तेथे परस्परांविरुद्ध दिसणारीं माणसें एकत्र आलीं तर त्यांत नवल नाही. आरबी भाषेंतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टींत वर्णन केलेले एकएक डोळा नसलेले सात

असामी किंवा सरसकट हिरव्या दाढीचे नऊ पुरुष असा देखावा क्वचितच पाहावयास मिळतो.

त्या तुंदिलतनु गृहस्थांनी नाकावरचा चष्मा उतरला व तोंडांतला चिरूट काढून हातांत घेतला, आणि टेबलावर लिहीत बसलेल्या माणसाकडे वळून ते म्हणाले, "अरे नान्या, लिहिणें बंद कर आणि मी काय म्हणतों तें लक्षपूर्वक ऐकून घे."

"लेका सोन्या," नान्या म्हणाला, "तुला हजार वेळां सांगितलें की मला नान्या म्हटलेलं यापुढं खपणार नाही. मला नानासाहेब म्हटलं पाहिजे."

"आणि तूं मात्र मला सोन्या म्हणणार? तुला नानासाहेब म्हणावयाचं तर मला सोनाजीराव म्हटलं पाहिजे."

"कां सोकाजीराव म्हणूं तुला?" नान्यानें विचारलें. "तुझ्या पोटाचा आकार आता पहिल्या वर्गाच्या उतारूच्या वळकटीएवढा झाला आहे. तुला खरोखर पोटाजीराव म्हटलं पाहिजे."

तंबाकूचा बार भरीत बसलेले गृहस्थ एकदा तस्तांत खाकरले आणि मग वर मान करून म्हणतात, "नानासाहेब, कांही झालं तरी सोनाजीराव आपले पुढारी आहेत. त्यांच्याशीं आदबीनं वागलं पाहिजे."

"मग पुढाऱ्यांनी आमच्याशीं आदबीनं वागलं पाहिजे. हा सोन्या मला नान्या म्हणतो, तो काय मी नाटकांतला एखादा फाटका-तुटका नट आहें? आणि हें पहा तान्या—"

"लेका मला तान्या म्हणतोस?" तंबाखूचा दुसरा बार भरीत तो म्हणाला, "माझं नांव त्रिंबकराव आहे; लक्ष्यांत ठेव."

"पण तान्या नांव कसं फक्कड आहे. त्यांत इतिहास आहे. त्यांत रोमान्स आहे. का वाश्याशेट, तुम्हांला काय वाटतं?" नान्यानें विचारलें.

पेपरमिंट खाणारा व तपकीर ओढणारा गृहस्थ जरा रागानें म्हणाला, "मला वाश्याशेट म्हणण्याची सक्त मनाई आहे. मला वासोजीपंत म्हटलं पाहिजे. वासूसाहेब म्हटलं तरी चालेल."

सोनाजीराव दुसरा चिरूट पेटवून म्हणाले, "आपण सगळे जिवाभावाचे स्नेही, आपलीं चार डोकीं एकत्र करतों तेव्हा चार पैसे मिळतात. एकमेकांना अशीं नांवें ठेवून पोरकटपणाने भांडणें ठीक दिसत नाही."

"मला पोरकट म्हणण्याचा तुमचा हेतु आहे काय, सोनाजी राव?" वासूसाहेबांनी विचारलें. "तसें असेल तर मला खपणार नाही. माझ्या वयाची पन्नाशी उलटली, मिशा पांढऱ्या झाल्यामुळे मी संपूर्ण क्षौराला सुरवात केली, लोकांत माझा विद्वान म्हणून मोठा मान आहे. मी व्याख्यानं दिलीं आहेत, मी ग्रंथ लिहिले आहेत, मी शिक्षकाचं पण काम केलं आहे. मला नातवंडंसुद्धा झालीं असतीं, पण माझा पोरटा लग्नाशिवाय राहिला आहे. तेव्हा मला कोणी पोरकट म्हटलेलं खपणार नाही."

तंबाखूची लाली अधरोष्ठाखाली वाढलेल्या दाढींत पसरली होती ती त्रिंबकरावाने रुमाल घेऊन पुसली व तो म्हणाला, "वासू-साहेब, तुम्हांला पोरकट म्हणून सुद्धा कांही उपयोग नाही. तुमची गणना आहे मोठ्या विद्वानांत. तुम्हांला पोरकट म्हणणाऱ्याचीच पोरकटांत गणना होईल."

"पण केस पिकले म्हणून मिशा काढणं हें कांही प्रौढपणाचं लक्षण नव्हे. याला पोरकटपणाच म्हणतात." नाना म्हणाला.

"प्रौढपणाचं नसलं तरी शहाणपणाचं आहे खास." सोनाजीराव बोलले. "वरचा ओठ साफ झाल्यापासून आमचे वासूसाहेब कसे तरुण दिसायला लागले आहेत. आणि ते तरुण आहेत ही लोकांची समजूत कायम राहावी म्हणून तर त्यांचा पन्नासावा वाढदिवस करायचा बेत आपण रहित केला."

"तुम्ही तो कां रहित केला हें मला माहीत आहे." वासूसाहेब बोलले. "आजकाल ही वाढदिवसांची साथ आलेली आहे, त्यांत वाटेल त्याचा समारंभ चाललेला आहे. अशा सहस्रभोजनांत माझं सोवळं-भांडं फेकायची माझी इच्छा मुळीच नव्हती हें मी तुम्हांला स्पष्ट कळविलं होतं."

"हें पहा, आता वाद बंद. चहा मागवतों एकदा, म्हणजे तुमचीं डोकीं थंड होतील," सोनाजीराव म्हणाले. "आज नवीन मौज काय आहे ती सांगा मला. आपण हा क्लब काढला आहे करमणुकीसाठी. कोणाचें कांही होवो, आपली करमणूक झाल्याशीं कारण! परवा त्या रावबहादुरांची मुलगी आपल्या मास्तरबरोबर फाजीलपणानं वागते अशी गप्प आपण मुंबईच्या तीन चार पत्रांत उठविली; त्याचा परिणाम तो मास्तर आणि रावबहादूर यांच्या मारामारींत व पुढे परस्परांच्या फौजदारींत झाला. आपणाला पंधरा दिवस सिनेमा सुद्धा पाहण्याची जरूरी पडली नाही."

"पण त्या बिचाऱ्या पोरीवर मात्र रिकामं बालंट आलं!" नाना म्हणाला.

"आपल्याच लेखणींतून तें बालंट उतरलं होतं नान्याजी!" सोनाजीरावाने त्याला बजाविलें.

"माझी लेखणी बिचारी एक निर्जीव पदार्थ! पण तिला जिवंत ठेवणारा आपलाच रसरशीत मेंदू; मला त्या मुलीबद्दल फारच वाईट वाटतं!" नाना गंभीर मुद्रा करून म्हणाला.

"पण जिकडे लेख लिहून पाठविलेस तिकडून पैसे मिळाले ते घेतांना मुलीची नाही झाली आठवण तुला?" वासूसाहेब बोलले.

"तेव्हा मला तुमची आठवण झाली, वासूसाहेब." नानाने उत्तर दिलें. "कारण तुमच्या या पिकलेल्या आणि आता बहुतेक अदृश्य झालेल्या केसांच्या आंत गडकरी म्हणतात त्याप्रमाणे हिरवटपणा बराच आहे."

"माझा येथे असा पदोपदीं अपमान व्हायचा असेल तर हा मी चाललों." वासूसाहेबांनी तपकीर पुन: नाकांत चोंदली. "मी बिरबलचें चरित्र लिहिलेलें आहे आणि व्यंकटेशस्तोत्राचं संस्कृतांत भाषांतर केलेलें आहे. एका जर्मन ग्रंथाचं मराठींत भाषांतर करायला घेतलं असून फ्रेंच भाषेचं अध्ययन इटालियन भाषेतून सुरू केलं आहे. माझ्याशीं वागतांना प्रत्येकानं आदबीनं वागलं पाहिजे. हा नान्याचा मी बिलकूल सहन करणार नाही. का, सोनाजीराव, बोला."

"तुमचं म्हणणं अगदी कबूल आहे मला." सोनाजीरावानें उत्तर दिलें. "विद्वत्तेच्या कामांत तुम्ही आमच्या या संस्थेचं नाक आहांत. खोट्या कड्या उठवून जितक्या भानगडी उपस्थित होतील तितक्या उत्पन्न करणं व त्यापासून आपली करमणूक करून घेऊन पैसाही कमावणं हें या आपल्या संस्थेचं ध्येय आहे. तें साध्य होण्याला जसा नानबाच्या लेखणीचा, तसा, वासूसाहेब, आपल्या विद्वत्तेचा आम्हांला फारच उपयोग होतो."

"माझा कांहीच नाही का उपयोग?" त्रिंबकरावानें विचारलें.

"नाही कसा?" सोनाजीराव म्हणाले; "तमाखूचे बार भरीत भरीत लोकांच्या पोटांत शिरून त्यांची माहिती आणि असतील नसतील तीं बिंगें हस्तगत करून घेऊन मग त्यांची रेवडी उडविण्याची शिताफी तुझ्यासारखी कोणाला साधणार? सुधारकांनी भरविलेली पुनर्विवाहाच्या वाढदिवसाची सभा तुझ्याशिवाय होत नाही, तर सनातनी धर्ममार्तंडांची भेट तुझ्या वशिल्याशिवाय होत नाही. ठिकठिकाणच्या ब्राह्मणसभा तुझ्या सल्ल्याशिवाय चालत नाहीत, तर ब्राह्मणांना अस्सल शिव्या कोणत्या द्याव्यात हें विचारण्यासाठी ब्राह्मणेतर लेखकांना तुझ्याशिवाय त्राता नाही. तूं तर आमच्या संस्थेचा आहेस. त्रिंबक, तूं एक दिवसांत जितक्या कंड्या उठवितोस तितक्या उभ्या वर्षांत शंभर सुचणार नाहीत."

"हें पहा, सोन्या—असा टवकारून पाहूं नकोस—" नाना म्हणाला. "आपण आपापल्या प्रेमामुळं स्नेही झालों, यांत खासगी बैठकींत उपचार कशाला? जाहीर सभेंत किंवा लोकांच्या समोर आम्ही तुला सोनाजीरावच म्हणूं, पण असं बैठकींत तुला सोन्याच म्हणणार आणि तू मला नान्याच म्हणणार."

"मग मघाशीं कशाला लेका बोंब पाडलीस?" सोनाजीरावानें विचारलें.

"अरे, केली ती एक गंमत. आता वासूसाहेबांशीं मात्र आदबीनंच वागलं पाहिजे हें मलाही कबूल आहे. पण आताच आम्हा

तिघांचीही तूं खूप स्तुति केलीस; आता आम्हां तिघांच्या वतीनं तुझं गुणवर्णन करतों."

"जीभ आवर," सोनाजी म्हणाला; "माझं शरीर जितकं ऐसपैस आहे तितकाच माझा स्वभाव संकोची आहे. मला स्तुति अशी ऐकवत नाही.—"

"अरे, दुसऱ्याची स्तुति नव्हे, सोन्या!" वासूसाहेब पेपरमिंट तोंडांत टकलीत म्हणाले. "नान्या आता तुझीच स्तुति करणार आहे आणि तो चांगली करील. म्हटलंच आहे, स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधी जन्मती."

"तुम्हांलाही खोचदार बोलतां येतं, वासूसाहेब;" नाना म्हणाला. " माझी लेखणी वाटेल तें लिहीत असेल; आपल्या विद्वत्तेच्या जोरावर वासूसाहेबाच्या भानगडी पचून जात असतील; आमचा तान्या लोकांच्या पोटांत शिरण्यांत मोठा तरबेज असेल; पण नेहमी बिनचूक वाइटाचा कैवार घेऊन चांगल्याची गळेकापी करावयाची हें जें कसब त्याचा तूं केवळ ब्रह्मदेव आहेस. तुला स्वतःला जरी चार तोंडें नसलीं तरी ज्याच्या पाठीला तूं लागलास त्याच्यावर हजारों लोकांनी आपलीं तोंडें सोडावींत असं करायची करामत, हे रंगानं कोळशाला लाजविणाऱ्या माझ्या सोन्या, आणि पोटाच्या वाटोळेपणानं पाण्यानं भरलेल्या पखालीचा गर्व हरण करणाऱ्या माझ्या दैदीप्यमान पुढाऱ्या—ती करामत तुझ्याच ठिकाणीं आहे."

"तूं एखादें नाटक लिही रे तान्या!" सोनाजीराव कौतुकाने म्हणाले; "लोकांची कुटाळकी करायला नाटक हें फारच भारदस्त साधन आहे."

"पण त्याचा उपयोग दुसऱ्यालाही करतां येईल." त्रिंबक म्हणाला.

"इथं तूं चुकतोस तान्या! तुझ्यापेक्षा जास्ती कुटाळ, जास्ती फाजील नाटकं लिहिणारा एखादा कदाचित् मिळेल. पण तें नाटक एखाद्या कंपनीच्या गळ्यांत बांधण्याचं कर्म मात्र महा कठीण. आमचा नानबा तेंही काम जमवून देईल—हो, बरी आठवण झाली. आज एक

नवीन मजा मिळाली आहे. माझ्याकडे एक पत्र आलं आहे. माझ्याकडे म्हणजे–" सोनाजी म्हणाला.

"समजलंच आम्हांला." त्रिंबकराव म्हणाला.

"माझ्याकडे म्हणजे" सोनाजी पुढे म्हणाला; "नान्या ज्या पत्रासाठी नेहेमी लिहितो त्याच्या संपादकाकडे—त्या पत्रांत एक नवीनच भानगड उजेडांत आणली आहे. म्हणजे ती भानगड आम्ही उजेडांत आणावी अशी हें पत्र लिहिणाऱ्याची फार फार इच्छा आहे."

"हा पत्र लिहिणारा कोण ?" वासूसाहेबांनी विचारलें.

"वा, वासूसाहेब," म्हणाला; "असल्या पत्रावर कोणी सही का करतो ? वर्तमानपत्रांतील प्रत्येक लेख सहीनेच आला पाहिजे असा जर शिरस्ता पडेल तर कुटाळक्या करून आणि कंड्या उठवून पोट भरणाऱ्या आणि गंमत करणाऱ्या लेखकांवर मोठी संक्रांत येईल. बिनसहीचा लेख हें हलकट लेखकांचं मोठं शस्त्र आहे."

"अशा स्वतःला शिव्या घेऊं नकोस." नाना सोनाजीरावाला म्हणाला.

"आणि मला शिव्या देऊं नकोस." बजावलें. "मी जें जें सही घालून लिहिलं आहे त्यामुळं चांगल्या लोकांत मला मान आहे. पण सही न करतां मी लिहिलेल्या गोष्टी मीच लिहिल्या असं जर जगजाहीर झालं तर मला जगांत तोंडही दाखवितां येणार नाही."

"हें पहा," सोनाजी म्हणाला; "हा प्रश्न आपल्यापैकी कोणाचाही नाही. आपलं नांव कोणी काढील त्याचं नांव काढल्याशिवाय आपण राहणार नाही. हें जें पत्र आलं आहे त्याचा उत्तम उपयोग कोण करील ?"

तिघांनीही तें पत्र वाचलें. वासूसाहेब तें तीन वेळां वाचून म्हणाले, "आपण या नसत्या भानगडींत पडूं नये. या पत्रांतील सर्व मजकूर खोटा असण्याचा संभव आहे."

"संभव का ? मी म्हणतों तो सपशेल खोटा आहे." सोनाजीने उत्तर दिलें. "पण आपला सर्व व्यवहार खऱ्यावर का चालला आहे !

'शठं प्रति शाठ्यं' हा तर भगवद्गीतेचा निष्कर्ष आहे."

"उगीच भगवद्गीतेवर तुमचे निष्कर्ष लादूं नका. शिवाय 'सर्वं प्रति शाठ्यं' हें तुमचें व्रत आहे सोनोबा." वासूसाहेब म्हणाले.

"आपलं सर्वांचं व्रत आहे म्हणाना, वासूसाहेब! तुम्ही आम्ही कांही दोन नाही. अद्यापि काही खुळ लोक तुमची संभावितांत गणना करतात. आम्हांला सर्व लोक राजरोस बदमाष म्हणतात. हाच आपल्यांतला फरक." सोनाजीनें उत्तर दिलें.

"हा फरक कांही थोडा नाही." नाना म्हणाला. "वासूसाहेब कविता लिहितात. त्यांना कविसंमेलनाचं परवा आमंत्रण आलं होतं. मला साहित्यसंमेलनाचं आमंत्रण चुकत नाही. तुला, सोन्या, कुठलं तरी आमंत्रण येतं का सांग पाहूं!"

"तुम्ही दोघेही संभावित बरें, नान्या; आणि तान्या, तूंही लेका संभावित; पण माझ्यामुळे तुमची संभावना चाललेली आहे एवढं मात्र विसरूं नका; हं, बोला, मग या पत्राचा उपयोग कसा करून घ्यावा?" सोनाजीरावाने आपल्या तिघाही मित्रांना विचारलें.

"असल्या कुटाळपणाचा कांहीही उपयोग करूं नये." वासूसाहेब म्हणाले; "त्या पत्रांत ज्यांचा उल्लेख आहे तो गृहस्थ मला माहीत आहे. जिमखान्यावर त्याची माझी गाठ कधी कधी पडते. प्रकरण जाज्वल्य आहे."

"असें का?" [illegible] म्हणाले, "मग जाज्वल्य प्रकरणाशीं होऊं द्याच दोन हात! काय नान्या, घेतोस का हें काम अंगावर!"

"मला बुवा वेळ नाही." नानाने उत्तर दिलें. "माझ्यामागे सध्या काम आहे."

"काम म्हणजे आम्हीच दिलेलें ना?" सोनाजीनें विचारलें. "आणि यांत काय आहे? वर्तमानपत्राचा बातमीदार म्हणून जा या गृहस्थाकडे. त्याला सांग की तुमच्याबद्दल आणि एका तरुण बाईबद्दल आमच्याकडे बराच मजकूर आला आहे; आणि त्यांतील पुरावा पाहून आमची तर खात्री झालली आहे. पण तुमच्यासारख्याची अब्रू

काढणं हें आमचं काम नाही. आमचं वर्तमानपत्र अशा नीचपणानं आम्ही चालवलं नाही. आणि मग हळूच सांग की हजार दोन हजारांच्या खर्चान सगळा बंदोबस्त ठाकठीक होईल."

"तो नाही म्हणाला तर?" नानाने विचारलें.

"तो नाही म्हणणारच नाही. जगांतले सभ्य लोक भित्रे असतात म्हणून तर पाजी लोकांचं मजेंत चालतं. बरं, तो नाही म्हणालाच तर सांगून टाक की सहीनिशीं आणि भरपूर पुराव्यानिशीं आमच्याकडे हकीकत आलेली आहे, ती छापून काढावी लागेल; तुम्ही आपला, निदान त्या मुलीचा विचार करा आणि काय तें ठरवा."

"बुवा, माझ्या गळ्यांत ही भानगड नको." नानाने निक्षून सांगितलें. "परवाच मी मोठ्या पेचांत आलों होतों. नाक घासून दोन बंद माफी लिहून दिली तेव्हा सहीसलामत सुटलों. तूर्त तरी असली पंचाईत पुन: नको. वासूसाहेब म्हणतात की आपली त्याची ओळख आहे. त्यांना सांग तें काम!"

"अरे, वासूसाहेब कधी प्रत्यक्ष कामाला उपयोगी पडलाय्!" सोनाजीरावाने विचारलें. "पाजीपणाचे लेख लिहितो तो आणि त्यावर लिहिणाऱ्याचें म्हणून नांव टाकावें लागतें दुसऱ्याचें. लढाई उत्पन्न करण्याचं कसब त्याच्या अंगांत आहे, पण लढाईला जाण्याची धमक त्याच्याजवळ नाही. तेव्हा त्याचं नांव सोड. बरं त्रिंबक तुझं काय म्हणणं? तूं ओळखतोस का या जाज्वल्य प्राण्याला?"

"तसा विशेष ओळखत नाही." त्रिंबकने उत्तर दिलें. "मी वासूसाहेबासारख्या संभावितांच्या जिमखान्यावर जात नाही. पण त्याच्या घरीं जाऊन कांही तरी निमित्ताने गप्पागोष्टी करण्याइतका मी त्याला ओळखतों."

"मग तूंच काम घे हें अंगावर."

"मी घेईन. पण वर्तमानपत्राचा बातमीदार म्हणून जाणार नाही."

"ठीक आहे. जा म्हणजे झालं. पण कांही तरी निमित्तानं गेलं पाहिजे." [illegible] सांगतलें.

"अरे निमित्तांना काय तोटा ? वरसंशोधनासाठी म्हणून जातों. लग्नकार्याच्या गप्पा काढतों आणि त्या गप्पांत ही गप्प देतों घुसडून. मग पाहतों कशी काय मजा येते ती."

"शाबास, शाबास, तान्या. जसा शिवछत्रपतीचा तानाजी मालसुरा तसा तूं आमच्यांत तानाजी आहेस."

"म्हणजे तुम्ही शिवाजी वाटतं, सोनोपंत ?" बासूसाहेब बोलले. बोलतांना त्यांचें तोंड आंबट झालेलें दिसत होतें.

"तुम्ही वाईट वाटूं देऊं नका, वाश्याशेट." नाना वेडाबीत म्हणाला. "सोन्या जर शिवाजी तर तुम्हांला आम्ही रामदास समजूं. मग तर तुमची तक्रार नाही ना ?"

"नान्या, बंद कर." बासूसाहेब ओरडले.

"नान्या, जीभ लांब करूं नको." सोनाजीरावाने दरडावून सांगितलें. "कॉलेजांत जाणाऱ्या मुलींबद्दल एक सणसणीत आर्टिकल लिही. काय काय लिहायचं तें तुला माहीतच आहे. मग त्रिंबक, तूं केव्हा कामाला लागणार ?"

"केव्हा कामाला लागणार ? कामाला लागलोंच म्हणून समज. पण चहा मागव."

"चहाच का ? बरीच संध्याकाळ झाली आहे. चहापेक्षा जरा कांही तरी स्ट्रांग पाहिजे." नाना बोलला आणि हसला.

---

प्रकरण पंधरावें

# बाळासाहेबाला आलेलें पत्र

लोणावळ्याहून मंडळी जाण्यापूर्वी बाळासाहेबांच्या बंगल्यांत जेवावयास गेली होती. तेथे त्यांचा मुक्काम जवळ जवळ दिवसभर झाला असें म्हणण्यास हरकत नाही. एवढ्या वेळांत गप्पागोष्टी पुष्कळच झाल्या. जगांतले जेवढे म्हणून विषय होते त्यांची झाडून

हजिरी झाली. राजा राममोहन रॉयपासून हिटलरपर्यंत आणि सतीच्या चालीपासून तों सहवासोत्तर विवाहापर्यंत सर्व विषय वादविवादांत आले. हिंदुस्थानच्या भवितव्यतेची भवती न भवती झाली. सर्व प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या गुणावगुणांची झडती घेण्यांत आली. सुप्रसिद्ध संस्थानिकांच्या चरित्रांचे पाढे एकेकाने वाचले. निरनिराळ्या कॉलेजांतील प्रोफेसरांचा उद्धार झाला. कवि आणि ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध असलेल्या स्त्रीपुरुषांबद्दल मनसोक्त व अगदी निर्भीड चर्चा झाली. आणि शेवटीं एकमेकांची निदान कामचलाऊ माहिती ज्याने त्याने इतर सर्वांस दिली. परस्परांचे पत्ते परस्परांनी लिहून घेतले. याप्रमाणे दिवस कसा गेला हें सुद्धा कळलें नाही. जेवणापूर्वी सरबत झालें, जेवणानंतर चहा झाला; नंतर आईसक्रीम झालें आणि शेवटीं आता रात्रीं जेवूनच घरीं चला असें बाळासाहेबाने म्हणतांच सर्वांनी बिनतक्रार होकार दिला.

सर्व मंडळी गेल्यावर कांही वेळ बाळासाहेबाला एक प्रकारची खिन्नता आली. गेल्या चार दिवसांत घडलेल्या सर्व विलक्षण गोष्टींचें पर्यवसान कित्येक चांगले स्नेही मिळण्यांत झालें; पण त्यांपैकी सुंदरची मूर्ति त्याच्या अंतःकरणांत विशेष ठसली होती, हें सांगण्यास कांही हरकत नाही. आणि तिच्यासंबंधीं जें कांही तरी गूढ भासत होतें त्यामुळे त्याचें तिजविषयींचें औत्सुक्य अधिक वाढणें हेंही स्वाभाविक होतें. तिच्या परिचयामुळे त्याला उल्हास वाटला व तिच्याशीं बोलणें चालणें होऊन तिच्याबद्दल त्याचा ग्रह फार अनुकूल झाला. तिचें सौंदर्य आणि तिची बुद्धिमत्ता यांत अधिक आकर्षक कोणतें हें सांगणें सोपें नव्हतें; पण तिच्या बुद्धिमत्तेला सौंदर्याच्या कोंदणाखेरीज तजेला चढला नसता, असें म्हणणें अगदीच वावगें होईल असें नाही. तिच्यावर आलेल्या संकटाचें कारण काय असावें हा विचार त्याच्या मनांत आला, पण ज्या ज्या वेळीं तो येई त्या त्या वेळीं त्या संकटाला कारण तिचे दोष नसून गुणच असले पाहिजेत अशी त्याची अधिक खात्री झाली. मूर्ख किंवा दुष्ट लोकांना कांही गुण, दोष वाटतात, तसा प्रकार येथे झाला असला पाहिजे असें त्याला वाटलें.

सुंदर वगैरे गेल्यावर दोन दिवसांनीच तो माटुंग्याला परत आला

व नेहमींच्या कार्यक्रमांत पूर्वीप्रमाणें वावरूं लागला. लोणावळयाला भेटलेल्या मंडळीची त्याला वरचेवर आठवण होई आणि बापू व बाबू हे आले म्हणजे ती आठवण काढण्याला ते विसरत नसत; एवढेंच नव्हे तर बाळासाहेब आणि सुंदर यांच्या झालेल्या परिचयाच्या सुताने त्यांच्या विवाहविधीच्या स्वर्गापर्यंत पोचण्याला ते कमी करीत नसत. त्यांची थट्टा वरचेवर ऐकून एकदा आपल्या अंत:करणाची कसून तपासणी करण्याचें बाळने ठरविलें व सुंदरबद्दल कोणत्या भावना तेथे आहेत याचा अगदी ठाव घेण्याचा त्याने प्रयत्न केला. पण तसा ठाव लागणें सोपें नाही हें त्याच्या लक्षांत येण्यास वेळ लागला नाही; इतकेंच नव्हे तर या गोष्टीची जों जों त्याने अधिक विचारणा चालविली तों तों अंत:करणांत घोटाळा अधिक आहे असें त्याला वाटूं लागलें आणि त्याबरोबर मानसिक खळबळही वाढली. अर्थात् या गोष्टी तो कोणाजवळ बोलत नव्हता; पण बापू व बाबू त्याची जी चेष्टा करीत त्यावरून आपल्या अंत:करणांतील खळबळ या बेट्यांना समजली की काय अशी शंकाही त्याला केव्हा केव्हा येऊं लागली; पण त्यांचें सर्व बोलणें आटोपलें म्हणजे त्याच्या शंकेचें निरसन होत असे आणि आपलें अंत:करण पारदर्शक नाही असें वाटून त्याला जरा बरें वाटत असे.

अशा स्थितींत माटुंग्याला त्याला एके दिवशीं एक पत्र पोस्टाने आलेलें मिळालें. त्या पत्रावरील अक्षर अपरिचित होतें, म्हणून त्याला जरा चमत्कार वाटला. पण पत्र उघडून आंतील मजकूर वाचल्यावर तो आश्चर्याने चकित झाला. पत्र बिनसहीचें होतें. बाळला बिनसहीच्या पत्रांचा आणि वर्तमानपत्रांत वगैरे टोपण नांवाने दुसऱ्यावर हल्ले चढविणाऱ्यांचा मोठा तिटकारा होता. कित्येक नीच व हलकट लोक बाहेर संभावितपणाने मिरवून टोपणनांवाचा आश्रय करून वर्तमान-पत्रांतून चिखल उधळत असतात हें त्याला माहित होतें आणि ज्यांचीं टोपणनांवें प्रसिद्ध आहेत अशा थोड्या व्यक्ति सोडल्या तर त्यांपैकी बाकी-च्यांची आपलीं नांवें प्रसिद्ध व्हावींत अशी मुळीच इच्छा नसते. इतकेंच नव्हे तर वर्तमानपत्राच्या संपादकाने एकाद्या प्रसंगीं जर त्यांना खरें नांव घालून लिहा म्हणून सांगितलें तर ते कचरतात व मुळीच लिहिण्याच्या

भानगडींत पडत नाहीत. असल्या भेदरट, चोरट्या आणि हलकट माणसाबद्दल कोणालाही तिरस्कार वाटावा हें साहजिक आहे. पण त्यांतल्या त्यांत खाजगी पत्रें निनांवी लिहून कोणावर तरी तोहमत घेणाऱ्या सारख्यांच्या नीचपणाला सीमाच नाही, असें बाळचें स्पष्ट मत होतें; आणि म्हणून निनांवी पत्र आलेलें पाहून अगोदर बाळला अतिशय संताप आला.

पण पत्रांतील मजकूर वाचल्यावर कांही वेळ बाळ क्रोधातिशयानें स्वस्थ बसला होता. पत्रांतील सर्व मजकूर–आणि पत्र बरेंच लांबलचक होतें–सुंदरची नालस्तीच त्यांत होती. आपली आणि सुंदरची ओळख प्रसंगानें दोन दिवस झाली. असें असून आपला आणि तिचा कांही संबंध होणार असें गृहीत धरून असें लांबलचक आणि अत्यंत वाईट मजकुरानें भरलेलें पत्र आपल्याला लिहिणारा म्हणजे नीचांतला नीच आणि दुष्टांतला दुष्ट असला पाहिजे असें बाळला वाटलें. आणि मग त्यानें लोणावळ्याला जे दोन प्रसंग प्रत्यक्ष पाहिले होते त्यांची मनांत पुनः उजळणी केली व ज्यानें त्या संध्याकाळीं वाघउडीच्या रस्त्यानें परत येतांना धरणाजवळ सुंदरवर अचानक हल्ला केला व पुढे दोन दिवसांनी संध्याकाळीं टेकडीवर ज्यानें पत्र गुंडाळलेला दगड फेंकला त्याच माणसानें हेंही पत्र लिहिलें असलें पाहिजे अशी त्याची खातरजमा झाली. निनांवी पत्राला उत्तर देणें शक्य नसतें. त्यांतील विषानें अंगाची लाही होऊं लागल्यावर विषप्रयोग करणाऱ्याचा उलट चावा घेऊन आपल्या अंगांतील विष उतरण्याचा उपाय करणें हें शक्य नसतें. बाळ प्रथम बराच वेळ रागानें लाल होऊन बसला. पण हळूहळू तो थंडावला आणि मग त्यानें तें पत्र पुनः एकदा वाचून पाहिलें.

सुंदरच्याबद्दल आपल्याला लिहिण्याचा उपद्व्याप या नीच प्राण्यानें कां करावा याचा प्रथम बाळला उलगडाच होईना. फक्त तिचा आपला कारणपरत्वें थोडासा स्नेह जमला तर या स्नेहाचें रूपांतर पुढे प्रेमांत होऊं नये, किंबहुना त्या स्नेहाचा विकास दृढतर मैत्रींत होऊं नये अशी या माणसाची फार तीव्र इच्छा असली पाहिजे. एवढी त्याची समजूत झाली. एका तरुण मुलीच्या अब्रूवर उठणारा आणि ती अब्रू घेण्यासाठी निनांवी पत्रें लिहिणारा व चोरटे हल्ले करणारा हा माणूस

चांगला असणें शक्य नाही, आणि असल्या वाईट माणसाचा व सुंदरचा संबंध तरी कसा आला, याचें त्याला प्रथम क्षणभर आश्चर्य वाटलें. पण ती मंडळी लोणावळ्याहून जाण्यापूर्वी जेव्हा त्याच्या बंगल्यावर एक दिवसभर आली होती, आणि त्या दिवशीं पुष्कळ वेळ त्याच्या सुंदरशीं ज्या गप्पागोष्टी झाल्या होत्या त्यावरून तिच्या स्वभावाचे कांही विशेष त्याच्या नजरेस आले होते. सध्याच्या जगांत प्रत्येकाची गाठ भल्याबुऱ्या माणसाशीं पडते व त्यांचा बरेपणा बुरेपणा कळण्यास थोडासा वेळ लागतो. त्यांतील जे खराब असतात ते तसे आहेत हें कळल्यानंतर त्यांचा धिक्कार केला म्हणजे त्यांना चिरड येते व त्या चिरडीमुळे ते अशा गर्हणीय प्रकारानें वागण्यास सिद्ध होतात. कांही व्यवहारांत माणसें अशा दुष्ट लोकांना न दुखवितां त्यांच्यापासून दूर होतात; पण मुलींच्या बाबतींत ही गोष्ट फार कठीण असते. एखादी मुलगी अशा माणसापासून त्याला न दुखवितां दूर होण्याचा प्रयत्न करील; पण जर तो माणूस दूर न होतां तिच्या पाठीस हात धुवून लागेल तर तिनें काय करावें? आता हेंही शक्य आहे की आपल्याकडे स्त्रीपुरुषपरिचयाचें वातावरण अगदी नवीन असल्यामुळे एखाद्या मोकळ्या स्वभावाच्या मुलीच्या वागण्याचा भलताच अर्थ कित्येक करतात आणि त्या अर्थानुरूप त्यांची अपेक्षा पूर्ण करण्याचें तिनें नाकारलें म्हणजे मग संतापतात व तिचा द्वेष करावयास लागून तिच्या अब्रूवरही उठण्याला कमी करीत नाहीत. तशापैकीही प्रस्तुतचा प्रकार असण्याचा संभव होता. कसेंही असलें तरी सुंदरबद्दल अत्यंत प्रतिकूल मन करून घेऊन या कोड्याचा निकाल लावण्याचा जो एक अगदी सोपा रस्ता मोकळा होता, तो घेण्याचें मात्र बाळासाहेबाच्या मनाला पटलें नाही. पत्र दोनतीन वेळां वाचूनही तीच वाईट असली पाहिजे हें तत्त्व त्याला रुचलें नाही.

आणि त्या पत्राचा सगळा रोख तर त्या तत्त्वावर होता. कॉलेजमध्ये सुंदर अगदी 'नाचत" असते; तिच्या पुरुषमित्रांची संख्या फार मोठी आहे; ती आपल्या मित्राबरोबर एकटीच हिंडावयास जाते आणि सिनेमा–नाटक पाहण्यासही जाते; तिला लाजलज्जा कांही नाही;

घरच्या माणसांचा तिच्यावर दाब बिलकुल नाही. तिने अनेकजणांना प्रेमपत्रिका लिहिल्या आहेत; व तिच्याकडे आलेल्या सर्व प्रेमपत्रिका जर एकत्र केल्या तर एक मोठा थोरला ग्रंथ होईल; ती मोठ्या चंचल स्वभावाची व चैनी वृत्तीची आहे; तिला नटण्यामुरडण्याचा फार हव्यास आहे व त्यांत तिचा हेतु दुसऱ्यावर आपली मोहिनी पसरावी हा आहे; अशा एक ना हजार गोष्टी त्या पत्रांत होत्या, व पुढे मोहनचें प्रत्यक्ष नांव घालून त्याच्यासंबंधीं व सुंदरसंबंधीं बऱ्याच कल्पना (तो पत्रलेखक त्यांना अगदी घडलेल्या गोष्टी म्हणत होता) लढविल्या होत्या. शेवटीं तिच्या पाशांत एक वेळ सापडून आपण स्वतः फसलों आहोंत व केवळ तुम्ही तिच्या हुशारीला बळी पडून मूर्ख बनूं नये, एवढी सद्‌भावाने सूचना देण्याकरितांच हें पत्र लिहिलें आहे, असें त्यांत होतें.

असा, की त्याच दिवशीं मोहन येणार होता. आपण मुंबईंत आलों आहोंत असें मोहनने बाळासाहेबाला दोन दिवस यापूर्वी लिहिलें होतें. मुंबईला आल्यास भेटल्याशिवाय जावयाचें नाही असें लोणावळ्यांत निरोप घेतांना ठरलें होतें व त्याला अनुसरून मोहनने हें पत्र लिहिलें होतें. त्यानंतर त्याने आपली बाळासाहेबाकडे येण्याची वेळ वगैरे नक्की केली. व त्याप्रमाणें तो आता इतक्यांत यावयाचा होता. तो दुपारीं जेवावयास यावयाचा होता व सकाळीं नऊ वाजतां टपाल जें आलें त्यांत वरील पत्र बाळला मिळालें. तें पत्र वाचून त्याची जी मनःस्थिति झाली ती घरीं पाहुणा–निदान त्या पत्रांत ज्याचें नांव उल्लेखिलें आहे असा पाहुणा–येण्याला फारशी अनुकूल होती असें म्हणतां येणार नाही. आणि जेव्हा मोहन आला तेव्हा त्याला बाळासाहेबाची चर्या थोडीशी चमत्कारिक वाटणें साहजिक होतें. पण मोहन साधा गडी असल्यामुळे आणि चर्येवर होणाऱ्या फेरफारावरून अनुमानें बांधण्याच्या पडण्याची त्याला सवय त्याच्या लक्षांत कांही आलें नाही. तो लोणावळ्याची आठवण ठेऊन आला व सुरवातीचा थोडासा संकोच त्याला कळलाही नाही. पुढे तो संकोच अर्थात् नाहीसा झाला.

कांही वेळ त्यांच्या इकडे तिकडे गप्पा झाल्या व त्यांत सुंदरचेंही नांव निघालें हें सांगावयास नको. मग बाळासाहेब म्हणाला,

"आज माझ्याकडे एक अगदी विलक्षण मजकुरानं भरलेलं पत्र आलं आहे. त्यांतील एकाही गोष्टीवर माझा विश्वास नाही. पण लिहिणारा कोणी तरी नीच मनुष्य असला पाहिजे. तुमचंही नांव त्या पत्रांत आलं आहे."

"माझं नांव तुम्हाला आलेल्या पत्रांत!" मोहनने आश्चर्यचकित होऊन विचारलें. "पण लिहिणाऱ्याचं नांव काय?"

"तीच तर पंचाइत आहे. 'पत्राखाली सही' 'आपण फसूं नये असें इच्छिणारा एक हितचिंतक,' अशी आहे." असें म्हणून बाळासाहेबाने तें पत्र जसेंच्या तसें मोहनच्या हातांत दिलें.

मोहनने तें घेतलें व वाचावयास सुरवात केली. दुसऱ्याच्या चर्येवरचे फेरबदल त्याला कळत नसत, पण आपली चर्या क्षणाक्षणाला पालटून आपल्या अंतःकरणांतल्या भावना व विचार यांना दर्शविते हेंही त्या बिचाऱ्याला माहित नव्हतें. तें पत्र वाचतां वाचतां अनेक विकारांची छाया त्याच्या मुखावर पसरली. पण अथपासून इतिपर्यंत तिटकारा व राग यांचें मिश्रण तींत स्पष्ट दिसत होतें. स्वतःचें नांव वाचल्यावर तर तो अधिक उत्सुक झाला, पण मजकूर वाचून त्याची चर्या बरीच म्लान झाली.

"लिहिणारा माणूस तोच तर खराच, पण हुषारही आहे." पत्र वाचून झाल्यावर तें बाळासाहेबाच्या हातीं देऊन मोहन म्हणाला.

"तुमच्या स्वतःबद्दल जो मजकूर त्यांत आहे त्यासंबंधीं तुम्हाला काय वाटतं?— माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलंच पाहिजे असं नाही." बाळने सांगितलें.

"तुमचा प्रश्न बरोबर आहे. माझी आणि सुंदरची ओळख अलीकडची आहे. ती ज्या प्रकारें माझ्याशीं वागते तशी सर्वांशीं वागते. अरेतुरे करणं, अगदी पुष्कळ दिवसांचा नात्यागोत्याचा संबंध असावा त्याप्रमाणं बोलणं, चालणं, वागतांना आपण हिंदुसमाजांतील स्त्री आहों

हें विसरणं, अशा गोष्टी ती करते. आणि त्यामुळं तिचं माझ्यावर उलट प्रेम बसेल असं मला कांही दिवस वाटत होतं. तिच्या सौंदर्यावर मी लुब्ध झालों हें खरं व पुढं जेव्हा तिचं माझ्यावर प्रेम नाही हें मला कळलं तेव्हा मी तिच्याबरोबर भांडलों सुद्धा! पण त्यानंतर ती ज्याप्रकारें माझ्याशीं वागते त्यावरून ती मोठी थोर अंतःकरणाची मुलगी आहे ही माझी खात्री आहे. तिच्या–माझ्या संबंधानं या पत्रांत दिलेल्या कित्येक गोष्टी खऱ्या आहेत. तिला घेऊन सिनेमाला गेलों आहें, नाटकाला गेलों आहें, हिंडायला गेलों आहें, पण त्यावरून काढलेले तर्क अगदी चूक आहेत. सुंदर पूर्ण निष्पाप, निष्कलंक आहे, आणि हें पत्र लिहिणारा माणूस अत्यंत नीच व दुष्ट आहे."

"त्याबद्दल प्रश्नच नाही." बाळासाहेब म्हणाला. "सुंदर कशीही असली तरी हा पत्र लिहिणारा अगदी नीच, हलकट यांत शंका नाही."

"पण ती कशीही नाही, बाळासाहेब मी देखील जेव्हा तिच्याशीं भांडलों, तेव्हा तिला अपशब्द बोललों आहें. तिच्याबद्दल अपशब्द बोललों आहें, पण त्याची आता मला लाज वाटते. अगदी निष्पाप अशी ती मुलगी आहे. ती काय बोलेल याचा नियम नाही; किती स्वतंत्रतेनं वागेल याचा नियम नाही; पण तिचं सौंदर्य आणि तिची तीव्र बुद्धि या गोष्टी निःसंशय स्वयंसिद्ध आहेत. तिच्यासंबंधीं अंतःकरणांत प्रकाश पडल्यापासून माझी आधुनिक मुलींच्याबद्दलची दृष्टि नुसती निवळली नव्हे तर बदलली हें मी आतापर्यंत कोणाजवळही बोललों नाही, पण ओघानं आलं म्हणून तुमच्याबरोबर बोलायला हरकत नाही."

"माझा प्रश्न जरा धीटपणाचा आहे." बाळासाहेब म्हणाला, "पण विचारतों त्याबद्दल रागावूं नका. चार दिवसांच्या ओळखीनंच माझा सुंदरबद्दल ग्रह किती चांगला झाला आहे, याचं प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे या पत्रांतील एकाही विधानावर माझा विश्वास नाही हेंच होय. तुम्ही सांगितलंत त्यावरून तर तो ग्रह बळावला. तेव्हा मी तुमचा व सुंदरचा मित्र व हितचिंतक आहे या नात्याने विचारतों, तुमचं तिच्यावर प्रेम आहे कां?"

"दिव्यावर झडप घालणाऱ्या पतंगाचं त्या दिव्यावर प्रेमच नसतं काय? तिला पाहून मी बेभान होत असें. तिच्यावर मी किती तरी कविता लिहिल्या आहेत. पण आता तिच्याबद्दल मला प्रेम आहे असं वाटत नाही. तिच्यावर माझा रागही नाही आणि अनुरागही नाही. पण तिच्याबद्दल माझा आदर किती तरी पटीनं वाढला आहे! तिच्यांत व माझ्यांत अंतर फार हें मला कळून चुकलं आहे."

"पण तिच्यावर कसलंहि संकट येऊं नये, तिचं सर्व प्रकारें बरं व्हावं असं नाही कां तुम्हांला वाटतं?

"तिच्या केसालाही धक्का लागूं नये, आणि तिच्या सुंदर केश-कलापापेक्षाही सुंदर असं जें शील त्याविरुद्ध निंदेची · तिला लागूं नये अशी माझी मनापासून इच्छा आहे. हा पत्र लिहिणारा जर प्रत्यक्ष भेटेल तर माझी इच्छा किती सक्रिय आहे हें निदान त्याला तरी समजून येईल— पण एक आहे—"

"काय आहे!" बाळासाहेबाने विचारलें.

"आपल्याला कांही गोष्टी अपरिचित आहेत म्हणून म्हणा, कांही समजत नाहीत म्हणून म्हणा, पण सुंदरचं वागणं कधी कधी गैरसमजाला कारणीभूत होतं असं मात्र मला वाटतं. मी तिला परवा सांगितलं की तुझं लग्न झालं असतं तर असा गैरसमज होण्याची भीति नव्हती."

"तुम्ही खरोखरच असं सुंदरला सांगितलं?" बाळासाहेबाने उत्सुकतेने विचारलें.

"असंच सांगितलं. आणि मग मी आणि विसू थट्टेनं असंही म्हणालों की तुझ्यासाठी एक चांगला नवरा शोधून काढला पाहिजे."

यावर दोघेही हसले आणि त्या हसण्यामुळे मोहनच्या लक्षांतही न आलेला जो थोडासा संकोच प्रथम वातावरणांत होता तो पार नाहीसा झाला व बराच वेळ कांही गोष्टी एकमेकांना सांगून ते हसत होते. मग बाळ उठला व तें पत्र टेबलाच्या खणांत ठेवतां ठेवतां म्हणाला, "आता जेवणाची वेळ झाली आहे. आणि तुम्हालाही भूक लागली असेल. तुमचं स्नान वगैरे झालं आहे ना? नाही तर सर्व तयार आहे"

"जेवणाखेरीज सर्व कांही झालं आहे." मोहनने उत्तर दिलें. मग ते दोघेही उठणार इतक्यांत कोणी भेटावयास आलें आहे म्हणून गड्याने सांगितलें. "जेवायच्या वेळीं कोण आलं आहे" म्हणून जरा त्रासानेच बाळ प्रथम म्हणाला, पण मग "खाली दिवाणखान्यांत बसायला सांग त्यांना, मी आलोंच" असें गड्याला सांगून मग मोहनला म्हणाला,

"पांच मिनिटांत त्या गृहस्थाला रजा देतों आणि मग आपण मजेंत जेवण करूं."

---

प्रकरण सोळावें

# मुलाखत

बाळ बाहेर अत्यंत नाखुषीने आला. तिकडे पानें वाढलीं आहेत अशी वर्दी आलेली व मोहनला बरोबर घेऊन तो जेवावयास चाललेला, अशा वेळेला हा भेटण्यासाठी कोण प्राणी आला आहे यासंबंधीं अचंबा करीत बाळ दिवाणखान्यांत आला व तेथे एक अगदी अनोळखी मनुष्य बसलेला पाहून त्याला थोडा रागच आला. ज्या माणसाची आपली ओळखसुद्धा नाही त्याने भलत्याच वेळेला येऊन आपल्याला त्रास काय म्हणून द्यावा, हा प्रश्न त्याच्या मनांत आला. बाळ त्या माणसाला म्हणाला, "काय, माझ्याकडे काम आहे आपलं? मी आताच जेवायला बसत होतों. आपली ओळख आहेसं मला वाटत नाही. तेव्हा काय काम आहे तें चट्दिशीं सांगा. मी गडबडींत आहें त्याची माफी करा."

तो गृहस्थ हसला. " आपण मला ओळखत नाही कारण आपली माझी ओळख नाही. पण आपणाला प्रत्यक्ष ओळख नसतांना ओळखणारे पुष्कळ आहेत. माझं काम एकदोन मिनिटांत आटपण्यासारखं नाही. पाहिजे तर आपण जेवण करून या, मी इथं

आपली वाट पाहत बसतों. किंवा ・` मी पुन्हा येईन—अर्थात् पुनः यायची माझी फारशी उत्सुकता नाही. मी मुंबईंत राहतों व पुनः मला इकडे हेलपाटा घालावा लागेल."

"पण काम तरी काय आहे ?"

"काम म्हणाल, तर माझं नसून आपलंच आहे. आपल्याला कांही आपल्याच हिताची गोष्ट सांगण्यासाठी मी आलों आहें."

"माझी तुमची ओळखही नाही. मग माझ्या कल्याणाबद्दल आपल्याला एवढी काळजी कां ?"

"त्याचं उत्तर सोपं आहे. कोणाचंही बरं करतां येईल तर केवळ ओळख नाही म्हणून तें करूं नये हें कांही शहाणपण नव्हे. आपण एका विलक्षण संकटांत येणार आहांत असें मला समजलें आहे. तेव्हा त्यांत आपला हात अडकण्यापूर्वी आपल्याला सूचना द्यावी म्हणून मी आलों."

"माझ्यासंबंधीं तुम्ही एवढी तसदी घ्यावी हे माझ्यावर आपले फार उपकार आहेत. माझ्यावर कांही संकट येणार आहे असं मला तरी वाटत नाही. पण तुम्हांला काय माहिती कळली आहे ती चट्दिशीं थोडक्यांत सांगा. माझ्याकडे जेवायला पाहुणे आले आहेत. ते खोळंबून बसले आहेत."

"माफ करा बाळासाहेब, आपला व आपल्या पाहुण्यांचा खोळंबा केल्याबद्दल; पण मला जें कांही सांगायचं आहे तें आपल्या अत्यंत जिव्हाळ्याचं आहे तेव्हा जेवणाला अर्धा तास उशीर झाला तरी तो क्षम्य आहे असंच आपल्याला शेवटीं वाटेल.

"ठीक आहे. अर्धा तास, पण चट्दिशीं सांगून टाका काय तें !" असें म्हणून बाळासाहेब खुर्चीवर बसला. मोहनही काय गडबड आहे हें पाहण्यासाठी आला व संवादाचा शेवटचा भाग त्याने ऐकला होता म्हणून तोही बाळासाहेबांजवळ येऊन बसला. त्याकडे पाहून तो गृहस्थ म्हणतो,

"तिऱ्हाइतासमोर बोलण्यासारखी गोष्ट मी आपल्याला सांगायला आलों नाही. तेव्हा हे पाहुणे जरा इथून घटकाभर जातील."—

"ते पाहुणे माझे मित्र आहेत. त्यांच्यासमोर कांहीही बोला."

"ठीक आहे. आपली मर्जी." तो गृहस्थ म्हणाला, "विषय जरा नाजुक आहे. आपलें लग्न अद्यापि व्हायचं आहे, बाळासाहेब?"

"माझ्या लग्नासंबंधीं कां विचारायला आलांत आणि त्याचीच एवढी ही प्रस्तावना? मग आपण तसदी व्यर्थ घेतलीत. तूर्त मला लग्न कर्तव्य नाही. मी आता जेवायला जातों."

"जरा थांबा, बाळासाहेब. मी लग्नासाठी विचारायला आलों नाही. मी कोणा मुलीच्या बापाचा गुमास्ता नाही. पण प्रश्न अशासाठी विचारला, की आपलं लग्न ठरलं म्हणून ऐकलं, व त्यासंबंधीं—"

"माझं लग्न ठरलं नाही. आपण हें कुठं व कसं ऐकलं हें मला समजत नाही. ठीक आहे. आपण या आता; माझ्यासारख्या अनोळखी माणसाच्या लग्नाबद्दल एवढी तसदी पुन: घेऊं नका—"

"बाळासाहेब, उठूं नका. आपल्याला थोडक्यांत सांगतों. आपलं ज्या मुलीवर प्रेम बसलं आहे—"

"माझं कोणत्याही मुलीवर प्रेम बसलेलं नाही. आणि माझं प्रेम कुणावर बसलं न बसलं तरी त्याची उठाठेव करायची त्रयस्थांना जरूरी नाही."

तो गृहस्थ हसला. बाळासाहेब एवढ्या रागाने बोलला म्हणून तो गृहस्थ हसला नाही किंवा दुसराही त्याच्यावर कसला परिणाम झाला नाही. त्याने खिशांतून एक पत्र काढलें आणि तें बाळासाहेबाच्या हातीं एक शब्दही बोलल्याशिवाय दिलें. बाळासाहेबाने तें वाचलें आणि तो उठला. "हें असलं हलकटपणाचं पत्र तुमच्या हातीं येण्याचं कारण? यांत तुमचा संबंध कुठं येतो? आणि हें कोणी तरी नीच माणसाने लिहिलेलें निनांवी पत्र तुम्ही माझ्याकडे कशाला घेऊन आलांत? हें पत्र तुम्हाला मी परत देणार नाही. तुम्ही आल्या पावलीं चालते व्हा."

" बाळासाहेब, असे गरम होऊं नका आणि पांचपंचवीस प्रश्न मला एकदम विचारूं नका. कारण मला त्यांचीं उत्तरं एकदम देतां येणं शक्य नाही."

" पण तुमचीं उत्तरं एकदम ऐकायला नकोत किंवा एकामागून एक ऐकायाला नकोत. माझ्या जेवणाला उशीर होत आहे. तेव्हा आता आपण जा."

" बाळासाहेब, जरा दमानं घ्या." तो गृहस्थ अगदी शांतपणें म्हणाला. " हें पत्र वाचून आपल्याला एवढी चीड आली, तेव्हा त्या मुलीचा आणि आपला कांही तरी संबंध--"

" तुम्ही एकदम चालते व्हा पाहूं!" बाळासाहेबांनी ओरडून सांगितलें. तो गृहस्थ उठला आणि म्हणाला, " तें पत्र द्या पाहूं"

" तें मी देणार नाही, आणि तुम्ही आता लौकर काळं करा."

" ठीक आहे. पत्र दिलं नाहीत तर फिकीर नाही. तें कांही अस्सल पत्र नाही, नक्कल आहे. आणि ज्या अर्थीं तुमचा मजबरोबर सभ्यपणानं वागण्याचा विचार दिसत नाही, त्या अर्थीं मी आता इथं बसण्यांत अर्थ नाही. हें पत्र लौकरच वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होईल. मी येतों हं बाळासाहेब—"

" जरा थांबा." बाळासाहेबाने दरडावून सांगितलें. "मोहनराव, इकडे या; हें पत्र वाचा."

मोहनराव हें नांव ऐकतांच तो गृहस्थ चपापला, पण मोहन येतांच त्याच्याकडे कौतुकाने पाहूं लागला. " एकूण हे का तुमचे पाहुणे?" त्याने विचारलें.

" कां? — तुम्ही यांना ओळखतां वाटतं?"

" मी ओळखत नाही, पण या पत्रामुळे ओळख पटते, एवढंच. पण मी आता जातों. माझं काम झालं—म्हणजे होत नाही."

" तुमचं काम काय होतं?" बाळासाहेबाने विचारलें.

"आपल्याला जेवायला उशीर करण्याची माझी इच्छा नाही." त्या गृहस्थाने उत्तर दिलें.

"माझ्या प्रेमाप्रमाणंच माझ्या जेवणाची फिकीर तुम्हांला नको. विचारलेल्या प्रश्नाचं उत्तर द्या. तुम्ही होऊन माझ्याकडे आलांत. मी तुम्हांला बोलावणं पाठवलं नव्हतं. तेव्हा सांगा, कशासाठी आलां होतां? केवळ कुटाळकीनं भरलेलं हें पत्र मला दाखवण्यासाठी?"

"नाही; केवळ तेवढ्यासाठी नाही. हें पत्र एक वर्तमानपत्र छापणार आहे. त्यांतील मजकूर खरा असो खोटा असो; तें प्रसिद्ध झालं तर तुम्हांला त्यामुळं बरं वाटणार नाही, व आपल्यासारख्या संभावित माणसाबद्दल असा मजकूर जाहीर व्हावा हें आम्हांलाही पसंत नाही."

"तुम्ही म्हणजे कोण?"

"आम्ही म्हणजे मी, दुसरं काय? तेव्हा मी या वर्तमानपत्र-वाल्याकडे गेलों आणि त्याला सांगितलं की तुम्ही हें पत्र छापूं नका. मी तुमची आणि बाळासाहेबांची तडजोड घडवून आणतों."

"तुमची माझ्याबद्दलची कळकळ खरोखर वाखाणण्यासारखी आहे. पण हें पत्र तुम्हाला आलं ना! मग वर्तमानपत्राकडे तुम्हीच देणार काय!"

तो गृहस्थ जरा गडबडला, पण त्याची शांत वृत्ति परत येण्याला फारसा वेळ लागला नाही. तो म्हणाला, "मी वर्तमानपत्राकडे देणार का वर्तमानपत्रकर्त्यानें हें पत्र माझ्याकडे दिलं याची चर्चा करण्यापासून फायदा नाही व सध्या तुम्हांलाही वेळ नाही व मलाही वेळ नाही. प्रश्न इतकाच, की हें पत्र वर्तमानपत्रांत प्रसिद्ध न होण्यासाठी तुम्ही—स्पष्टच बोलतों आता—केवढी रक्कम खर्च करायला तयार आहांत!"

"एकूण हें तुमचं काम आणि हा तुमचा लोकोपकाराचा धंदा!" बाळासाहेब संतापला तर नाहीच, पण हसत बोलूं लागला. "तुम्ही काय अंदाज केला आहे रकमेचा!"

"आपल्यासारख्यांना दोन एक हजार रुपये खर्च करणं कांही कठीण नाही, बाळासाहेब."

"ही रक्कम आपण फारच थोडी बोललांत!" बाळासाहेबाने उत्तर दिलें, "जो धंदा तुम्ही पत्करला आहे, त्यांत प्राप्ति एवढी थोडी असते हें मला माहित नव्हतं! दोन हजार रुपये दिले की तुम्ही या पत्राचा उपयोग करणार नाही. खासा धंदा! पण त्यांत ही प्राप्ति मला फार थोडी दिसते. काय मोहनराव, पत्र वाचून झालं का?"

मोहनने पत्र वाचून कांही वेळ झाला होता व त्याच्या चेहऱ्यावर निरनिराळ्या भावनांचीं चित्रें एकवटलेलीं दिसत होतीं. त्याने तें पत्र बाळासाहेबाच्या हवालीं केलें.

बाळासाहेबाने तें पत्र घेतलें व घडीकरून खिशांत घातलें. मग तो म्हणाला; "तुमचं नांव गाव मी आतापर्यंत विचारलं नाही व आताही विचारीत नाही. तुम्ही कोणत्या कुटाळकंपूतले आहांत हें मला चांगल माहित आहे. तुम्हाला दोन हजार रुपये काय, पण दोन दिडक्यादेखील द्यायचा माझा विचार नाहीं. तुम्ही हें पत्र वाटेल तिथं छापा. मात्र एवढं लक्षांत ठेवा, की ज्या वर्तमानपत्रांत हें प्रसिद्ध होईल त्याच्या संपादकाच्या आणि तें प्रसिद्ध झाल्याबरोबर तुमच्या पाठीचीं धिरडीं लोळवावयास मी चुकणार नाही."

"धमकी देतां काय?" त्या गृहस्थाने विचारलें.

"तानाजीराव तुमचं नांव नाही?" बाळासाहेबाने विचारलें. "ज्या थोर पुरुषाचं नांव तुम्ही घेतलंत त्या नांवाच्या लाजेसाठी तरी असले हलकेपणाचे धंदे तुम्ही करायला नको होते. मी तुम्हाला धमकी देत नाही. धमकी देऊन पैसे उकळणाऱ्याला धमकी द्यायची नसंत; त्याला चाबकाखाली झोडपायचं असतं. तुमच्या एडिटरसाहेबांना जाऊन सांगा, की पत्राचा खप होत नसेल तर असले धंदे करून पैसे मिळवण्याचा उपद्व्याप करूं नका. केव्हा तरी गोत्यांत याल—हं, मोहन-राव, तुम्हांला आता या गृहस्थाला काय सांगायचं असेल तर सांगा, त्यांना उशीर व्हायला नको."

मोहन कांही बोलणार होता, इतक्यांत तो गृहस्थ म्हणाला, "मी येतों माझ्या म्हणण्याचा नीट विचार करा. मी आठ दिवसांची मुदत देतों. तुमच्या त्या विदुषीनं लिहिलेल्या प्रणयपत्रिकाही प्रसिद्ध व्हायच्या आहेत. मग बाण सुटल्यावर आमच्या हातीं राहणार नाही. दोन हजार रुपयांची रक्कम तुम्हांला फार नाही."

"खरं आहे. ती रक्कम मला फार नाही. आणि आता माझ्याही हातीं कांही राहिलं नाही." असें म्हणून हात उगारला आणि त्या हातांत चाबूक कोठून आला हें त्याला कळलें नाही! पण त्या गृहस्थाने इकडची मान तिकडे वळविण्यापूर्वी त्याच्या पाठीवर, पायावर, हातावर सहा सात फटकारे जोराने बसले आणि काय झालें हें समजण्यापूर्वी त्याच्या सर्वांगांत वेदना शिरल्या. त्रिंबकराव ऊर्फ तानाजी याने आजन्मांत कधी चाबूक खाल्ले नव्हते असें नाही पण आज ज्या जोराने फटके बसले तसा जोर त्याच्या पूर्वी आला नव्हता. लोकांना धमक्या देऊन पैसे उकळण्याचा धंदा किफायतशीर खरा, पण तो गरीब लोकांशीं गाठ पडेल तेव्हा! सैतान जर भेटला, तर त्याच्या धंद्यांत किफायत नाही असें त्याला क्षणभर वाटलें, पण तें क्षणभरच. तो देहभानावर आला आणि म्हणाला, "बाळासाहेब, आता जाऊन मी पोलिसांत वर्दी दिली तर काय होईल?"

"तें, पापी मनुष्या, तूं जाऊनच पहा. पण तुला एक हिताची गोष्ट सांगतों. पुन: असल्या भानगडी करूं नकोस. आणि या मुलीच्या बाबतींत लक्षांत ठेव, गांठ माझ्याशीं आहे, आणि तुझ्या सोबत्यांना हेंच सांग. तुझ्यासारख्या कुटाळांना सभ्य लोक आपल्याला भितात असं वाटूं लागलं आहे. पण सगळेच सभ्य लोक भित्रे नसतात, हें ध्यानांत ठेव -- रामा!" आपल्या दारांत उभा राहिलेल्या नोकराला सांगितलें, "हा पाजी मनुष्य आताच्या आता इथून चालता झाला नाही तर याला धक्के मार आणि कंपाउडच्या आंत आला तर त्याला पोलिसाच्या हवालीं कर."

त्रिंबकराव कपडे सावरून व जेथे चाबकाचे फटकारे बसले होते तेथे चोळीत चोळीत झटक्यासरशीं कंपाउंडच्या बाहेर पडले आणि म्हणून मालकाचा हुकूम बजावण्याचा प्रसंग रामावर आला नाही. बाळासाहेब आणि मोहन जेवावयास गेले. जेवतांना कोणीही बोललें नाही. झाला प्रकार प्रत्येकाच्या डोक्यांत घोळत होता असें दिसलें. जेवण झाल्यावर बाहेर व्हरांड्यांत येऊन ते बसले व न बोलतांच त्यांनी पानसुपारी घेतली. थोडा वेळ गेल्यावर बाळासाहेब मोहनजवळच्या खुर्चीवर येऊन बसला आणि म्हणाला, “मोहन आजपासून आपलं अहोजाहोचं नातं संपलं. तूं माझा मित्र झालास आणि तूं पण मला आपला मित्र समजलं पाहिजेस. तुला माहित आहे का पत्र लिहिणारा कोण ?”

“मला माहित नाही. पण सुंदर म्हणते, की आपल्याला तो माहित आहे. आणि माहित असून ती त्याचा बंदोबस्त करीत नाही.”

“आता तिनं त्याचा बंदोबस्त नाही केला, तर आपण केला पाहिजे. तुझं सुंदरवर एकवेळ प्रेम होतं. तें कसलं होतं हें तुला तरी समजलं नाही किंवा तुझं तिच्यावर होतं तसलं तिचं तुझ्यावर नव्हतं. कसेंही असो, पण तिच्याबद्दल तुझ्या मनांत कसलीही शंका नाही ना ?”

“माझ्या मनांत कसलीही शंका नाही, व जी शंका मला येत असे तीही आता उरली नाही. तिच्या बाहेरच्या वागण्यांतील कित्येकांना वाटणारा आचरटपणा तिचं अंतरंग दाखवतो असं आता मला वाटत नाही. पण बाह्य वर्तनाचा आचरटपणा माणसाला भोवल्याशिवाय राहत नाही.”

“तूं म्हणतोस तें खरं आहे, मोहन. पण स्नेहीसोबती, आप्त-इष्ट माणसांना संकटकाळीं उपयोगी पडावं म्हणून असतात. त्यांनी वेळेवर मदत करावी, की ज्यांत पाप नाही अशा चुकाच उगाळीत बसाव्या ?”

“तुमचं म्हणणं माझ्या लक्षांत आलं, बाळासाहेब. आणि सुंदरच्या पाठीमागं हा कोणाचा ससेमिरा लागला आहे हें जर हुडकून

काढायचा तुमचा इरादा असेल, तर त्या कामांत माझा वाटेल तो उपयोग तुम्ही करून घ्या."

"या प्रकरणाच्या मुळाशीं जायचा माझा विचार आहे. त्यांत जर सुंदरची कांही चूक असेल तर ती तिच्या पदरांत घालायला मी मुळीच भिणार नाही. पण ज्या गोष्टी पुरुषांनी केल्या तर सहजासहजीं मिटवल्या जातात, त्याच्या एक शतांश आजकालची मुलगी जर वागली तर तिच्यावर भलते सलते आरोप करायची सवय आम्हांपैकी पुष्कळांना आहे. पण स्त्रियांच्यासंबंधीं कल्पनांत आता साऱ्या जगांत एवढं अंतर पडलं आहे की, ही सवय नाहीशी न करणं म्हणजे स्त्रियांच्या बाबतींत भयंकर अन्याय करणं होय, ही गोष्ट पुष्कळांच्या लक्षांतच येत नाही. लहान वयांत लग्न झालेल्या स्त्री-पुरुषांचं वर्तन थोर वयांत लग्न झालेल्या स्त्रीपुरुषांच्या वर्तनाहून अगदी निराळं असणार, ही साधी गोष्ट सुद्धा पुष्कळांना कळत नाही. सुंदरचं मोकळेपणानं वागणं मूर्ख आणि हलकट लोकांच्या गैरसमजाला कारण होतं, पण जर हलकट लोक तिला त्रास द्यायचा उपद्व्याप करतील तर त्यांचा बंदोबस्त जाणत्या माणसांनी केलाच पाहिजे."

मोहननें तें थोडेंसें लांबलचक भाषण शांतपणें ऐकून घेतलें. मग तो म्हणाला,

"आता जो गृहस्थ आला होता तो कोण?"

"हा एक कुटाळ कंपूचा संभावितपणानं वागणारा सभासद आहे. याची आणि तुझी प्रत्यक्ष भेट झाली हें एका अर्थी गैर झालं. मला या कंपूत शिरून त्यांच्या उद्योगाला आंतून सुरुंग लावतां येणं शक्य नाही. तुलाही तें आता करतां येणार नाही."

"असंच कांही नाही. आजचं हें पत्र वाचून माझं मन सध्या गोंधळून गेलं आहे. पण सुंदरच्या शत्रूंचा पत्ता लावून त्यांना योग्य शासन करण्याच्या कामांत वाटेल तें करायला मी तयार आहें. या कुटाळ कंपूत मला जाऊन हें पत्र लिहिणाऱ्याचा तलास लावतां येणार नाही, असं मला नाही वाटत."

"तें कसं काय?" बाळासाहेबानें विचारलें आणि मग ते बराच वेळ हळूहळू बोलत बसले होते. त्यांचें बराच वेळ बोलणें झाल्यावर मोहन जावयास निघाला आणि बाळासाहेबही बोलत बोलत बागेंतून दरवाजापर्यंत त्याच्याबरोबर गेला. मोहन दरवाजांतून बाहेर पडतांना बाळ म्हणतो, "आपण जें ठरवलं तें आपल्या दोघांमधीलच रहस्य आहे."

"हें माझ्या पूर्ण लक्षांत आहे." असें म्हणून मोहन स्टेशनच्या रस्त्याला लागला.

---

## प्रकरण सतरावें

# बाळासाहेबांचें साहाय्य

सुंदर आणि शारदा यांची गाठ बरेच दिवसांनी पडली होती आणि त्या अवधींत सुंदरमध्यें कांही तरी विशेष फरक पडला आहे, असें शारदेस वाटलें. लोणावळ्याच्या ट्रिपसंबंधीं तिला सर्व माहिती होतीच, आणि बाळासाहेबांचा परिचय हा आपल्या मैत्रिणीच्या आयुष्यांतील एक महत्त्वाचा प्रसंग हेंही तिच्या लक्षांत आलें होतें. लोणावळ्याला घडलेले अकल्पित प्रकार व सुंदरसंबंधीं गैरसमज पसरविण्याच्या खटपटीला आलेला भर यांच्या मुळाशीं कोण आहे, हें शारदेला माहित होतें आणि त्या माणसाचा दुष्टपणा मर्यादेबाहेर चालला व त्याची याउपर उपेक्षा करणें म्हणजे आपल्या स्वतःचें सर्व प्रकारें वाटोळें करून घेणें हें सुंदरच्या मनांत ठसविण्याची तिची फार इच्छा होती. लोकांनी उठविलेल्या कंड्यांची फिकीर न करणें हें कांही मर्यादेपर्यंतच क्षम्य असतें; ती मर्यादा ओलांडणें हा केवळ स्वतःविरुद्ध नव्हे, तर समाजाविरुद्ध अपराध होतो. कारण ती मर्यादा ओलांडणें म्हणजे अशा कंड्या उठविण्याऱ्या बदमाष लोकांना अप्रत्यक्ष साहाय्य करणें होय. आणि मुलींच्यासंबंधीं कंड्या उठविणें, 'कॉलेज गर्ल्स' बद्दल नाही नाही तीं विधानें करणें, परिस्थित्यनुरूप त्यांच्या वागण्यांत

जे फेरफार होणें अपरिहार्य आणि अनिवार्य असतें ते फेरफार म्हणजे कांही तरी भयंकर नैतिक अतिक्रमण आहे, अशा विचारांच्या लाटा मुद्दाम उत्पन्न करणें, हा तर कित्येकांचा जाणून बुजून व पुष्कळांचा न समजून व्यवसाय होऊन बसला आहे. शाळेंत व कॉलेजांत जाणाऱ्या मुलींबद्दल वाटेल तें भरमसाटपणाने लिहावें. फाटक्या तुटक्या नाटककारांनी हवीं तशीं चित्रें रंगवावींत; कथानक नाही, काव्य नाही, भावना नाही, कांही नाही, पण पोटांत अपरंपार मळमळ आहे, अशा कांही अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या झालेल्या कथाकारांनी वाटेल ते प्रलाप काढावेत, या गोष्टी तर राजरोस चालतात; पण कित्येक दुष्ट आणि नीच माणसांनी मलभलत्या वासना अंतः-करणांत वाढवून, आपल्या वासनेचें प्रतिबिंब आधुनिक बालिकांत आहे, असें स्वतःच्या सोईसाठी अगदी मनाची तशी खात्री होण्याइतकें कल्पून एखाद्या मुलीच्या पाठीमागे हात धुवून लागावें, यामुळे कित्येक मुलींवर भयंकर प्रसंग कोसळल्याशिवाय राहणार नाही, असें शारदेला वाटत होतें. आणि अशाच भयंकर प्रसंगांत आपली मैत्रिण सुंदर सापडली आहे असें तिला मनापासून वाटत होतें आणि म्हणून तिच्याशीं आज त्यासंबंधीं स्पष्टपणें बोलण्याचें तिने ठरविलें होतें.

लोणावळ्याहून लोहगडला जाऊन परत येतांना अण्णासाहेबां-बरोबर झालेल्या संवादामुळे आपल्या विचारसरणींत तात्त्विक नव्हे, पण व्यावहारिक फरक थोडाबहुत झालेला आहे हें सुंदरकडूनच शारदेला कळलें होतें व पुढे मोहनच्या विचारांतील परिवर्तनही तिला समजलें होतें. आज शारदेला सुंदरला कांही गोष्टी गोडपणाने पण स्पष्टपणानें सांगावयाच्या होत्या. बाळासाहेबांकडून सुंदरला एक पत्र आलें होतें व तसें पत्र आपल्याला आलें आहे असें सुंदरने सांगितल्यावर शारदा म्हणाली, "सुंदर, हा पुरुषांच्या बरोबरचा पत्रव्यवहार बराचसा संकटा-वह आहे हें निदान अनुभवानं तुला कळलं पाहिजे."

"होय; तें मला अनुभवानं कळलं आहे आणि अंतःकरणाच्या भावना दुसऱ्याला कळवण्यासाठीच नव्हे, तर स्वतःच्या स्मरणासाठी सुद्धा कागदावर अक्षरांनी रेखाटणं ही गोष्ट फार सावधगिरीनं केली

पाहिजे. म्हणजे ती करायची यातायात करूंच नये; या म्हणण्यांत बरेंच तथ्य आहे हेंही मला कबूल आहे. पण कोणीं मला पत्रं लिहिलीं तर त्याला माझा काय इलाज? त्या पत्रांना उत्तर दिलंच तर तें विचारपूर्वक द्यावं हें अगदी खरं आहे. पण हें बाळासाहेबांचं पत्र तूं वाचून पाहा, म्हणजे अगदी कोणीही पाहिलं तरी हरकत नाही, असं तें आहे हें तुला समजेल. जगांत केवळ कामकाजासाठी हजारों पत्रें लिहावीं लागतात हें तुला माहीतच आहे. आता सध्याच्या काळांत अशीं पत्रं स्त्रीपुरुषांना एकमेकांना लिहिण्याचे प्रसंग पदोपदीं उद्भवतात, त्याला तुझाही इलाज नाहीं व माझाही इलाज नाही."

शारदेने तें पत्र वाचलें. त्यांत कोणी न वाचण्यासारखा एकही शब्द नव्हता. तें पत्र पुढीलप्रमाणें होतें—

"कृ. सा. न. वि. वि. लोणावळ्याला परिचय झालेल्या नवीन मित्रांपैकी मोहनराव माझ्याकडे नुकतेच आले होते आणि त्यांच्या येण्याने मला फार आनंद झाला. ते येथे असतांना माझ्याकडे चमत्कारिक मजकुराने भरलेलें एक पत्र एका गृहस्थाने आणून दिलें. त्यापूर्वी थोडे दिवस जवळजवळ तशाच मजकुराचें एक पत्र माझ्याकडे आलें होतें. त्या पत्रासंबंधीं मी आणि मोहनने पुष्कळ चर्चा केली व कुटाळकीला आळा घालण्यासंबंधीं काय केलें पाहिजे याचाही आम्ही ऊहापोह केला. आपणांबरोबरही केव्हा तरी या गोष्टीचा ऊहापोह मला करावयाचा आहे आणि त्या वेळीं मोहनही येईल आणि आपली एखादी मैत्रिण आणाल तर चर्चा चांगल्या प्रकारें होईल. म्हणून आगाऊ सूचना देण्यासाठी हें पत्र लिहीत आहें. क. लो. अ. हे वि.

"मग असा प्रसंग आलाच तर कोणत्या मैत्रिणीला तूं बरोबर घेणार?" शारदेने विचारलें.

"तुला बरोबर घेणार." सुंदरने उत्तर दिलें. "पण आता असं एखादं पत्र आलं तर त्याला उत्तर द्यायला नको कां?"

" अशा पत्राला अशाच तऱ्हेचें उत्तर देणें ही गोष्ट निराळी, आणि वळवाच्या पावसाप्रमाणं मेघांच्या गडगडाडांत आणि विजांच्या कडकडाटांत अंत:करणांत काही तरी गडबडलेल्या भावनांना स्थिर समजून कागदावर शाईचा पूर आणणं ही गोष्ट निराळी." शारदेने हसून उत्तर दिलं.

" मोठं गडगडीत आणि कडकडीत वाक्य बोललीस! पण अशा पत्रांना उत्तर दिलं तरी मग तो पत्रव्यवहार होतो आणि त्या पत्रव्यवहाराचा सुद्धा व्यावहारिक लोक भलताच अर्थ लावायला कांही कमी करीत नाहीत; अर्थात् जिथं निदान सूत तरी आहे, तिथं स्वर्गाला जायला लोक कमी करीत नाहीत, यांत कांहीच नवल नाही."

" तुझं म्हणणं बरोबर आहे, सुंदर; पण कधी कधी अशा पत्रांत पुष्कळ चमत्कारिक मजकूर असतो हेंही तुला कबूल केलं पाहिजे. खुळ्यासारखीं पत्रं लिहून काय अनर्थ होतो याचा अनुभव तुला आहे. आपल्या हातून पोरकटपणानं गोष्टी घडतात. पण त्या पोरकटपणाचा भलता फायदा घेऊन दुष्ट लोक आपल्याला हवा तसा त्रास द्यायला मागंपुढं पहात नाहीत. आणि हा सगळा परिणाम—"

" केवळ पत्रं लिहिण्याचा नव्हे. सगळा परिणाम बाह्य रंगाला भुलून अंत:करणाची ओढ जिकडे जाईल तिकडे जाणं श्रेयस्कर आहे किंवा नाही यासंबंधीं विचार न करण्याचा. भावना ही नेहमी बुद्धीच्या अनुरोधानें वागली पाहिजे. निदान एखादी भावना बरी कां वाईट हें प्रत्येक वेळीं बुद्धीला विचारून घेतलंच पाहिजे. आणि ही गोष्ट सुरवातीला फार कठीण असते. उत्साहाच्या भरांत हें आपल्या लक्षांत राहत नाही. माझीही तीच स्थिति झाली. आणि कित्येक माणसं भुरळ परिणाम करण्यासाठी, आपल्या खऱ्या स्वभावाहून निराळं सोंग बेमालुमपणें आणतात, हेंही आपल्याला लहानपणीं कळत नाही."

" सुंदर, आता जें कांही झालं तें परत येत नाही. पण त्याचे दुष्परिणाम कसे दूर करायचे? तुझ्यावर कांही तरी भयंकर प्रसंग आणायचा त्या चांडाळाचा हेतु दिसतो. तुझं नांव बद्दू करायचं,

तुझ्या अब्रूचे धिंडवडे काढायचे, तुझ्याशीं कोणी लग्न करायचं नांवसुद्धा काढूं नये, अशा प्रकारें तुझ्याबद्दल भलभलत्या कंड्या उठवायच्या असा त्याने चंग बांधलेला दिसतो. आणि स्त्रियांच्या बाबतींत हे प्रयत्न यशस्वी व्हायला वेळ लागत नाही; त्यांतल्या त्यांत सुशिक्षित स्त्रियांच्याबद्दल वाईट गोष्टी विचार केल्याशिवाय ऐकायला समाज नेहमी तयार असतो. तेव्हा सुंदर, या सर्वांचा कांही तरी बंदोबस्त झाला पाहिजे."

सुंदरची मनोवृत्ति या वेळीं आत्मनिरीक्षणांत गुंतली होती. ती म्हणाली, "हा मनुष्य असा वागेल हें त्याची माझी प्रथम ओळख झाली तेव्हा माझ्या स्वप्नांतही आलं नव्हतं. त्याच्या बाह्यांगाची माझ्यावर भुरळ पडली यांत शंका नाही. त्याचीं पत्रं इतकीं गोड असत की तीं वाचताना मला अत्यंत समाधान होई. आणि तशीं पत्रं लिहिणाऱ्यावर छाप बसवण्यासारखं माझं सौंदर्य आहे असं वाटून मला न कळत मोठा गर्व झाला असला पाहिजे. आणि त्या गोड पत्रांना मी तशींच गोड उत्तर लिहून पाठवलीं. एक काळ असा असतो की, त्या वेळीं दुसऱ्याकडून सुंदर आणि लांब पत्रं यावीशीं वाटतात आणि आपणही आपलं अंत:करण त्यांत ओतलं आहे अशीं पत्रं लिहावीशीं वाटतात."

शारदा हसली. "तो तुझा काळ आता राहिलेला नाही ना?"

सुंदर हसली नाही. ती अगदी गंभीरपणें म्हणाली, "तो काळ आता राहिलेला नाही. आणि त्याचं कारणही उघड आहे. किनाऱ्यावर आदळणाऱ्या लाटा म्हणजे समुद्राचें जसें नव्हे तसं बाह्य रंगाला भुलून खळखळणाऱ्या हृदयवृत्ति म्हणजे अंत:करणाचं वास्तविक स्वरूप नव्हे. आणि म्हणूनच भावना स्थिर झाल्याशिवाय आणि ती स्थिर असतांना तिची तीव्रता अत्यंत वाढल्याशिवाय तिला काव्यांत आणि व्यवहारांत सुद्धा रसाचं स्वरूप येत नाही. बाह्य सृष्टीचा परिणाम वरवर होऊन अंत:करणांत जी तात्कालिक खळबळ उडते, ती घांदलीनं शब्दांकित करून त्यांना आपले हृदयोद्गार म्हणणारे कांही लोक यामुळंच कवि होऊं शकत नाहीत. कारण खरं काव्य उत्पन्न व्हायला भावना तीव्र पाहिजेतच, पण तिला स्थिरताही आली पाहिजे.

ती स्थिरता येणं म्हणजे त्या भावनेचं क्षणिकत्व जाऊन तिला चिरंतनत्व येणं होय."

"सुंदर, हें काव्याशास्त्रावरचं व्याख्यानच तूं सुरू केलंस. तें अर्थात् फार मनोरंजक आहे. तेव्हा तुझं म्हणणं माझ्या लक्षांत आलं. आणि तें म्हणणं खरं आहे. तूं त्या वेळीं जीं पत्रें लिहिलींस तीं कोणत्या मन:स्थितींत लिहिलींस त्याचा चांगला उलगडा तूं केलास. त्यानं माझं मोठं समाधान झालं. पण लोकांना मात्र हें सगळं खरं वाटणार नाही. तीं पत्रं कधी प्रसिद्ध झालीं, तर त्याचा भलताच विपर्यास करायला चांगलीं माणसं सुद्धा मागंपुढं पाहणार नाहीत."

"पण तीं प्रसिद्ध न होणं माझ्या किंवा तुझ्या हातांत नाही, शारदे. आणि त्याचा उगीच सारखा विचार तरी करून काय करायचं? अशीं पत्रं प्रसिद्ध करणारा माणूस सभ्य माणूस असं कोणीही समजणार नाही. हें तर खरं?"

"तें खरंच असंही म्हणवत नाही. कित्येक उत्तमोत्तम माणसांची देखील या बाबतींत दृष्टि मोठी विचित्र असते. एखादी बाई दुष्कृत्य करतांना सापडली किंवा आपण दुष्कृत्य केलं अशी तिनं कबुली दिली तर तिला जबर शिक्षा केली पाहिजे, तिला कुरूप केली पाहिजे, असा आग्रह धरणारे आमच्या समाजांतील साधु म्हणून नावाजलेले पुरुष सुद्धा ज्या पुरुषांनी दुष्कृत्यें केलीं त्यांना अल्प शिक्षा व्हावीं असं देखील म्हणत नाहीत. अशी जगाची रीत आहे."

"पुन: जगाची रीत आली! आणि असल्या मूर्खपणाच्या रीति हाणून पाडण्यासाठी कांही माणसं आपलं टाळकं फुटलं तरी बेहत्तर, पण टक्कर मारल्याशिवाय राहणार नाहीत. आणि अशी टक्कर मारणारीं माणसं निघाल्याशिवाय समाजाची प्रकृति सुदृढ राहणार नाही, त्याचा अपकर्ष होईल. असो. पण ही तात्त्विक चर्चा आता करायची आवश्यकता नाही. तुझ्या बोलण्यावरून तुला मला कांही तरी सांगायचं आहे."

"होय, मला कांही सांगायचं आहे. पण काव्य आणि तत्त्वज्ञान यांबद्दल तूं बोलूं लागलीस म्हणजे मग तें सांगायला वेळच मिळत नाही.

मला एवढंच सांगायचं की हें जें संकट उभं राहिलं आहे त्याचं कांही तरी निराकरण झालं पाहिजे, आणि तें तुझ्या एकटीच्या हातून व्हायचं नाही."

"दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत."

"खऱ्या आहेत तर त्यांसंबधीं तूं स्वस्थ किती दिवस बसणार? परवा त्या वर्तमानपत्रांत कांही मजकूर आला होता तो वाचून माझ्या काळजांत चर्र झालं. ती नाटिका तूं पाहिलीस कां? त्यांत कॉलेजांत जाणाऱ्या मुलींबद्दल काय भलभलता मजकूर आहे."

"हे पोटाचे धंदे आहेत, शारदे! आणि कित्येकांना पोटांतील मळमळ ओकायचं लेखन हें एक साधन असतं. त्या मळमळीला ते खळबळ असं नांव देतात आणि आपण लिहितों तें काव्य, हृदयोद्गार अशीही ते कंडी उठवतात. आणि अलीकडे असले फाटके तुटके लेखक आणि कवि दहापांच मिळून परस्पर प्रसंशेच्या तत्त्वावर मंडळं उभीं करतात. त्यांना एखादा डोक्यापेक्षा पोट मोठा असलेला आणि आपलं डोकं जगानं लहान कां म्हणावं अशी चिरड आलेला माणूस मिळतो, आणि मग पोटांतील मळमळ प्रसिद्ध करून ती विकायचा धंदा सुरू करतात. यांच्या वागण्याच्या कांही पद्धति ठरलेल्या आहेत. त्यांतले कित्येक एखाद्या कीर्तिमान् ग्रंथकाराच्या पुढं सारखी लाळ घोटून त्याच्या प्रभावळींत बसतात. कित्येक आपल्याजवळ नसलेली विद्वता, लोकांना दाखविण्याकरिता ज्यांतील एकही विचार कळायची आपल्याला अक्कल नाही, असले जाडे जाडे ग्रंथ काखेंत मारून गावभर हिंडतात. कोणी एखाद्या वर्तमानपत्राच्या हपीसांत लांगूल-चालनाने आपली जागा स्थिर करून मग आपल्या मळमळीच्या दुगाण्या चारी दिशांनी झाडीत असतात. शारदे, असले लोक काय लिहितात याचा विचार करणं म्हणजे त्यांच्या लिहिण्याला नसतं महत्त्व देण्यासारखं आहे."

"पुन: तुझ्या व्याख्यानाच्या तडाख्यांत मी सापडलें. पण अशा लिहिण्यानं ज्या भलत्या समजुती होतात आणि त्यामुळं त्यांपैकी कित्येकांवर खरं संकट कोसळायचं भय असतं, त्यांच्या

संरक्षणाची तजवीज होणं जरूर नाही कां?"

"जरूर आहे."

"तर मग आता माझं ऐक. हे बाळासाहेब चांगले गृहस्थ आहेत, त्यांना आलेलीं पत्रं तुझ्याचसंबंधीं असलीं पाहिजेत; तेव्हा निदान त्यांच्याशीं या गोष्टीची चर्चा कर. त्यांना सल्ला विचार. एक वेळ त्यांनी तुला साहाय्य केलें आहे. त्यांचं साहाय्य घे. आणि एकदा या प्रकरणाचा निकाल लावायच्या प्रयत्नाला लाग."

"तुझं म्हणणं मला कबूल आहे. मग तर झालं ना?"

शारदेने आपल्या मैत्रिणीकडे थोडें निरखून पाहिलें. तिचा चेहरा उमललेला होता. तो उमलण्यासारखा कोणता विचार सुंदरच्या मनांत होता, हें त्या वेळीं शारदेला कां समजलें नाही, हें सांगणें कठीण आहे.

---

प्रकरण अठरावें

# गटार बातमीदार

विश्वनाथ व मोहन बराच वेळ बोलत बसले होते, पण मोहनच्या कवितांची चेष्टा हा नेहमीप्रमाणें या संवादाचा विषय नव्हता. बोलणें सुंदरसंबंधीं होतें, आणि बाळासाहेबांच्या घरीं झालेला प्रकारही मोहनने विसूला सांगितला. विश्वनाथाने खाबू क्लबाच्या सभासदांबद्दल ऐकलें होतें एवढेंच नव्हे, तर त्यांतील एकादोघांची कारणपरत्वें त्याला थोडी प्रत्यक्ष माहितीही होती. शाळेंत असतां तो वासूसाहेबांकडे जाऊन कांही महिने संस्कृत शिकत असे. त्यामुळे त्यांची व त्याची चांगली ओळख होती. पण आपण खाबू क्लबांत आहोंत असें वासूसाहेब कोणाला समजूं देत नसत. त्यामुळे त्या ओळखीने त्या क्लबांत प्रवेश होणें फारसें सोपें नव्हतें, किंवा शक्य नव्हतें असें म्हटलें तरी चालेल. क्लबांतील इतर मंडळींचे धंदे व पराक्रम इतर पुष्कळ लोकांप्रमाणें त्यानें ऐकलेले होते. या क्लबांतील कोणी उठून सुंदरबद्दल एक पत्र पैदा करून तें बाळा-

साहेबाकडे नेण्याचा उपद्व्याप करावा या गोष्टीचें त्याला जरी आश्चर्य वाटलें नाही, तरी त्यामुळे त्याला चिरड यावी हें स्वाभाविक होतें. सुंदरबरोबर त्याचें दुसरें थोडेसें नातें होतें, व त्यांचा परिचय कित्येक वर्षांचा होता, आणि तिच्याबद्दल आदरबुद्धि असणारे व तिच्याशीं बरोबरीने व अगदी मोकळेपणाने वागणारे जे मित्र होते त्यांतील तो एक होता.

लोणावळ्याची सर्व हकीकत त्याला प्रत्यक्ष माहित होती. व तेथे एका रात्रीं बराच वेळ तो व मोहन यांचें बोलणें चाललें असतां तेथे सुंदर आली व तिला "तूं आता लग्न करून घे." असें मोहनने सांगितलें, ही गोष्ट आता त्याला साहजिकपणें आठवली. मुलींनी मुलांप्रमाणेंच स्वतंत्रपणें वागण्यास हरकत नाही असें त्याचें ठाम मत होतें आणि अण्णासाहेबांशीं बोलतांना सुंदरने कांही बाबतींत आपलें वागणें चुकीचें होतें, अशी कबुली दिली, तें त्याला त्या वेळीं आवडलें नव्हतें. आताही सुंदरला यत्किंचित् सुद्धा दोष देण्याला तो तयार नव्हता. आणि जरी त्यासंबंधीं मोहनचा–त्याचा थोडासा मतभेद झाला, तरी त्यांत मोहनने लागलीच पडती बाजू घेतली; त्यामुळे त्याला पुढे चर्चा करण्याची संधीच मिळाली नाही, आता मोहनला सर्वतोपरी साहाय्य करून सुंदरचा शत्रु हुडकून काढावयाचा व त्याला सापाप्रमाणें बाहेर ओढून काढून त्याचें डोकें ठेचावयाचें हा संकल्प त्याने मनांत तर केलाच, पण तो मोहनजवळ बोलूनही दाखविला. त्या दोघांचें याच संबंधीं बराच वेळ बोलणें झालें. मग ते दोघेही उठले आणि कपडे करून बाहेर प्रथम थोडा वेळ हिंडावयाला जाऊन मग एका गृहस्थाकडे जाण्याचें त्यांनी ठरविलें होतें, त्याप्रमाणे चौपाटीवर येऊन मग ते मलबार टेकडीकडे जाऊं लागले.

मलबार टेकडीवर शिडी रस्त्याने ते चढूं लागले. चौपाटीपासून वर टेकडीपर्यंत जो बगीचा केला आहे त्यांत पथिकांना बसण्यासाठी ठिकठिकाणीं बाकें ठेवलीं आहेत. अशा एका बाकावर थोडा वेळ बसून मग वर जावें असा विचार करून ते रिकामें बाक कोठे आहे की काय हें पाहूं लागले. संध्याकाळची वेळ असल्यामुळे बहुतेक बाकें

भरलीं होतीं आणि कोठें कोठें एका बाकावर दोन जागा शिल्लक होत्या, तरी उरलेल्या दोन जागा बायकामुलांनी किंवा दंपतींनी अडविल्या होत्या. तेथें बसणें त्यांना प्रशस्त वाटलें नाही. शिवाय त्यांना स्वत:साठी स्वतंत्र बाक मिळाल्यास हवा होता. थोडा वेळ इकडे तिकडे पाहिल्यावर तसा बाक त्यांना मिळाला. त्यांचें तोंड खाली समुद्राकडे असल्यामुळे तेथे बसून चौपाटीवरची मजेदार गर्दी त्यांना दिसत होती. वारा खालून वर येत होता. त्यामुळे वर येणाऱ्या मंडळीचे शब्द मधून मधून ऐकूं येत होते. कांही वेळ एक शब्दही न बोलतां समोर दूरवर पाहत दोघे बसले होते. इतक्यांत त्यांना कांही वाक्यें ऐकूं आलीं. त्यांतील विषय परिचयाचा वाटला, म्हणून ते शब्द कोठून येतात हें ते पाहूं लागले. त्यांच्याच खाली एका बाकावर दोन गृहस्थ साधारण मोठ्याने बोलत बसले होते व त्यांचा सर्व संवाद आपणांस ऐकूं येत आहे हें त्यांच्या तात्काळ लक्षांत आलें.

अर्थात् त्यांचें कुतूहल जागृत होऊन ते कान देऊन त्या खालच्या बाकावर चाललेला सवाद ऐकूं लागले. त्या बोलणाऱ्या गृहस्थांना आपलें संभाषण उत्सुकतेने ऐकणारे कोणी आपल्यामागे बसले असतील हें दिसत तर नव्हतेंच आणि तसें वाटण्याचेंही कारण नव्हतें. मोहन व विश्वनाथ यांना पुढील संवाद ऐकू आला.

"मग काय म्हणतां त्रिंबकराव? त्यानं तुमच्यावर चवदाव्या रत्नाचा प्रयोग केला?"

"होय. आणि तो तुमच्या भानगडींत पडलों म्हणून सोसावा लागला. बरं, कुणाला सांगायची सोय नाही. तें पत्र त्यानं आपल्या जवळ ठेवून घेतलं. शिवाय माझी व आपल्या मंडळींची त्याला माहिती आहे. मी पोलिसांत वर्दी देऊन आणखी भानगडी उपस्थित झाल्या असत्या व भीक नको पण कुत्रा आवर अशी आमची स्थिति झाली असती."

"पोलिसांत तुम्ही वर्दी दिली नाहीत हें ठीकच झालं. आणि पत्र त्यालाच पाठविलं होतं, तेव्हा त्यानं ठेऊन घेतलं यांतही बिघडलं नाही. अस्सल पत्र तुमच्याजवळ आहे. आणि त्या पत्राच्या नकला

निरनिराळ्या मंडळीकडे पाठवण्याचं आपण ठरवलं आहे. पण तुम्हांला चाबकाचे फटकारे खावे लागले ही गोष्ट वाईट झाली."

"वाईट झाली! अहो माझ्या ठिकाणीं तुम्ही जर असतां तर बेशुद्ध झालां असतां! त्याच्या हातांत चाबूक कसा व केव्हा आला हें सुद्धा मला समजलें नाही! माझी दृष्टी सारखी त्याच्यावर होती, पण त्या दृष्टीला सुद्धा नकळत जेव्हा माझ्या पाठीवर आणि हातावर आणि पायावर फटके बसले—काय त्या वेळीं माझी स्थिति झाली ती सांगतां येत नाही "

"आणि आता ती सांगूंही नका. झाली ती गोष्ट झाली. त्या मुरदाडाला आपण जेव्हा लोळवूं तेव्हा याचाही वचपा काढूं. तुमच्या जाण्यानं एक गोष्ट सिद्ध झाली आणि तीच फार महत्त्वाची आहे. त्याचं आणि त्या कारटीचं कांही तरी सूत जमलं आहे खास! आम्ही नुसता तर्क केला होता, पण आता शंकाच उरली नाही. माझ्या [illegible] त्या पोरीची टर उडवण्याचं आपण ठरवलं होतं. आता या बाळासाहेबाचाही खरपूस समाचार घेऊं."

"आपण म्हणतां, पण माझं नांव तुमच्या यादींतून वगळा. दोन हजार रुपये निघते, तर प्राप्तीचा वाटा मला मिळाला असता. आता प्राप्तीची गोष्ट दूरच राहिली, पण अंगभर चाबूक मात्र खाऊन आलों. मला त्याचा पुन: अनुभव नको!"

"तुम्हींच हातपाय गाळले तर कसं होणार, त्रिंबकराव! तुमच्या मंडळींनी या कामावर तुमची नेमणूक केली आहे, आणि ती योग्यच केली. असलीं कामं साधायला तुमच्यासारखा लायक माणूस दुसरा तुमच्या मंडळींत सुद्धा नाही. परवा सोनाजीरावांनी तुमची माझ्या-जवळ किती स्तुति केली! अहो, हा धंदा आहे. यांत एखाद्या वेळीं असं व्हायचंच!"

"असं व्हायचं, पण इतकं व्हायचं असेल तर मला ही भानगड नको. माझ्या अंगाचा ठणका अजून गेला नाही."

"अंगाचा ठणका जाईल हो, आणि आता मी माझ्या पत्रांतून करतों सरबत्ती सुरू! मग जाऊन पहा त्याचा आणि तिचा चेहरा!

अहो, दोन हजार नव्हे पांच हजार मिळतील, आणि मग तुम्हांला त्यांतला मोठा भाग मिळेल. सध्या मी तुम्हाला पन्नास रुपये देतों, मग तर झालं ना ? आम्ही आमच्या लेखकांना व साहाय्यकर्त्यांना दिडक्या देत नसतों; थापाथापीवर बहुतेक भागतं. आपल्या महाराष्ट्रांत लिहावयाची अनावर हौस असलेले शेकडों मूर्ख लेखक आहेत. त्यामुळं दिडक्या खर्च न करतां वर्तमानपत्रं, मासिकं, प्रकाशन वगैरे धंदे माझ्या सारख्यांना सुद्धा चालवतां येतात; पण तुमच्यासारखे साहाय्य करणारे आहेत, त्यांना आम्ही रोख रकमा देतों. तेव्हा यांतून अंग काढून घेऊं नका. आणखी पन्नास रुपये तूर्त घ्या."

"हा पन्नास आणि शंभराचा प्रश्न नाही, शामराव; धंद्यांत असे प्रसंग येतात, पण असला सैतान पूर्वी भेटला नव्हता."

"अहो त्याचा सैतानपणा लवकरच बाहेर काढूं, त्याची काळजी तुम्हांला नको. हें सत्कार्य आहे. या शिकलेल्या पोरींची जितकी बदनामी होईल तेवढी पुरुषांना सोईची आहे. यांचीं नाकं जर वेळींच ठेचलीं नाहीत, तर सर्वच स्त्रीराज्य होऊन सगळ्या पुरुषांना बल्लव बनावं लागेल. अशा प्रश्नाकडे दूरदृष्टीनं पाहावं लागतं."

"ती दृष्टी : नाही; आणि ती मला नको. पण आता मी यांतून अंग काढून घ्यायचं नाही म्हणजे काय? मी त्या बाळासाहेबाकडे कांही पुन: जाणार नाही. प्राण गेला तरी बेहत्तर! कारण त्याच्याकडे गेल्यावर तरी प्राण जायचाच!"

"त्याच्याकडे जाऊं नकाहो, पण असे हातपाय गाळूं नका! खोट्या कंड्या उठवून माणसांना गोत्यांत आणण्यांत जी बहार असते, तिचं मोल पैशानं मोजतां येण्यासारखं नाही, हें कांही मी तुम्हांला सांगण्यासारखं नाही. कारण असल्या कामांत तुम्ही आमचे गुरु आहांत याच्यापूर्वी देखील कित्येक पत्रं अत्यंत लोकप्रिय झालीं, तीं वाचकांना असलीं मजा पुरवीत होतीं म्हणून! आणि सध्याच्या भयंकर चढाओढीच्या काळांत तर पत्र खपायला निदान आमच्या सारख्यांना एवढंच साधन आहे."

"तुमचं साधन ठीक आहे हो शामराव, पण तें आम्हांला बाधलं नाही म्हणजे झालं! चाबकाचे तडाखे सारखे खाऊन या भानगडींत पडायची माझी बिलकूल इच्छा नाही."

"माझी कुठं इच्छा आहे तुम्हांला चाबकाचे तडाखे मिळावेत म्हणून? भलतंच कांही तरी बोलूं नका. पण ज्यानं हा तुमच्यावर अत्याचार केला, त्याची खोड तर मोडली पाहिजे. तेव्हा येत्या अंकांत तें पत्र छापून काढतों."

"विचार करून काय तें करा. पत्र प्रसिद्ध जर झालं तर माझ्या आणि संपादकाच्या पाठीचं धिरडं केल्याशिवाय राहणार नाही, अशी तंबी त्यानं मला दिली आहे."

"खरं की काय ?—" शामराव म्हणाला व क्षणभर विचार करीत करीत स्तब्ध बसला; मग तो म्हणतो, "जाऊं द्या, हो. असल्या तंबीला भीक घालणारा मी माणूस नाही."

"तुम्ही नसाल. पण अनुभवानं मी शहाणा झालों आहें. त्या चांडाळाचा चाबूक माझ्या ओळखीचा झाला आहे. तेव्हा तूर्त या अंकांत तरी कांही गडबड करूं नका. आपण सोनाजीरावाकडे सर्व एकदा बसूं, सगळी सांगोपांग चर्चा करूं, आणि नक्की कसं कसं काय काय करायचं हें ठरवूं."

"पण तुम्हीं यांतून अंग काढून नाही ना घेणार?"

"तुम्हीं सर्व त्यांत असाल तर मी एकटाच बाहेर कसा पडणार? पण माझं अंग त्याच्या चाबकाच्या आसपास मी जाऊं देणार नाही."

"फारच घाबरलेले दिसतां हो त्याच्या चाबकाला!"

"जावं त्याच्या वंशा तेव्हा कळे. तुम्हांला एक जरी फटका बसला असता तरी असं बोललां नसतां. तेव्हा सध्या कांही छापूं नका, एवढं तुम्हांला बजावतों."

"तुम्हीं एकंदरींत भित्रे आहांत."

"मी भित्रा! आणि कालचा पोर तूं, तुला अवसान!—"

"रागावूं नका, त्रिंबकराव, मीं चेष्टा केली."

"चेष्टा करूं नकोस शामराव. माझी चेष्टा करणं धोक्याचं आहे."

"म्हणूनच म्हणतों त्या बाळासाहेबाचा नक्षा उतरला पाहिजे. निदान तुमच्याशीं ज्या प्रकारं तो वागला त्याबद्दल तर त्याची चांगली केली पाहिजे. तेव्हा हें ठरलं. माझ्या एका मित्रासाठी त्या पोरीची उडवतों फटफजिती आणि तुमच्यासाठी या बाळासाहेबाला करून टाकतों सळो कां पळो! हो, मित्राचं कार्य करणं हें माझं ब्रीद आहे. चला तर खाली व्हियानेलीच्या दुकानांत जाऊन थोडे ताजेतवाने होऊं, —पण थांबा, माझी एवढी सिगारेट संपूं द्या."

हा संवाद ऐकून मोहन विश्वनाथाच्या कानांत कांही कुज-बुजला. ते दोघेही बाकावरून उठले व कडेच्या पायवाटेने खाली वळून त्रिंबकराव व शामराव जेथे बसले होते तेथे गेले. ते दोघे उठण्याच्या बेतांत होते इतक्यांत मोहन त्रिंबकरावापुढे जाऊन थांबला आणि म्हणाला,

"ओऽहो, इकडे कुठं तुम्ही?"

त्रिंबकरावाने त्याला एकदम ओळखलें नाही. तो म्हणाला, "तुमची ओळख आहेसं मला वाटत नाही."

"तशी ओळख नाहीच," मोहन बोलला. "पण आपली एकदा जरा चमत्कारिक प्रसंगीं गाठ पडली आहे."

त्रिंबकरावाने जरा निरखून त्याच्याकडे पाहिलें व त्याला त्याने ओळखलें. मग तो म्हणाला, "तुमच्याशीं बोलण्याची माझी इच्छा नाही. तुम्हांला मी ओळखत नाही."

"हें वड्याचं तेल वांग्यावर कां काढतां? जो तुमचा शत्रु झाला आहे, तो माझाही शत्रु आहे, हें तुमच्या लक्षांत यायला पाहिजे."

"म्हणजे काय? शत्रूच्या घरीं जाऊन मेजवानी झोडायची तऱ्हा मला माहीत नव्हती."

"वेळ पाहून माणसाला वागावं लागतं," मोहनने उत्तर

दिलें. "जिच्यावर माझं अत्यंत प्रेम, जी बहुतेक माझी झालीच होती, जिच्या सहवासांत मी कांही दिवस मनोराज्य करीत काढले, ती ज्याच्या-वर भाळली आणि मला ज्याच्यामुळं तिनं सोडून दिलं तो माणूस मला शत्रु असेल कां मित्र असेल?"

त्रिंबकराव डोकें खाजवूं लागला. शामराव त्याला म्हणाला, "हे कोण?"

"हे ते मोहनराव!" त्रिंबकराव म्हणाला.

"ते म्हणजे ते?" ` विचारलें.

"होय तेच." त्रिंबकरावांनी सांगितलें.

"मग जरा त्यांच्याशीं सरळपणाने बोला. मला तर त्यांच्या बोलण्यांत बरंच तथ्य दिसतं. बसा हो मोहनराव! आमचे त्रिंबकराव जरा रागावलेले आहेत, म्हणून तुसडेपणानें बोलले. तें तुम्ही मनावर घेऊं नका. तुम्ही त्या दिवशीं बाळासाहेबांच्याकडे होतां काय?"

"हो, मी होतों आणि सगळा प्रकार मीं डोळयांनी पाहिला. हे जर त्यांच्यावर फौजदारी करतील तर साक्ष द्यायला माझी तयारी आहे. बाळासाहेबानं माझं जें घेतलं आहे तें परत यायची आशा नाही. तेव्हा निदान त्याची नाचक्की झाली तरी मला समाधान आहे."

"अहो त्रिंबकराव, ऐकून घ्या हें." शामराव म्हणाला, "आणि हे कोण?"

"माझे मित्र आहेत, विसूभाऊ यांचं नांव. पण आपलं नांव कळलं नाही."

"मोहन, तुझ्या अज्ञानापुढं कमाल झाली." विश्वनाथ म्हणाला. "यांची ओळख का करून दिली पाहिजे? हे सुप्रसिद्ध संपादक आणि प्रकाशक शामराव. आज सगळ्या महाराष्ट्रांत यांची कीर्ति दुमदुमून राहिली आहे. यांचा फोटो सर्व मासिकांतून आला आहे. त्यांना तूं ओळखलं नाहीस?"

मोहन लाजला. मग तो म्हणाला, "माझी चूक झाली, विसू. मी त्यांचे फोटो तर किती वेळां पाहिलेले आहेत. आणि यांचं नांव तर रोज ऐकूं येतं."

विश्वनाथाच्या बोलण्याने शामराव अगदी खूष होऊन गेला व म्हणाला, "तुमच्या कॉलेजमधल्या खुसखुशीत बातम्या आमच्याकडे पाठवीत चला. आम्हीं त्यांना स्थळ देऊं आणि तुम्हांला भरपूर मोबदला देऊं. आम्हांला जितक्या विश्वसनीय बातम्या मिळतील तितक्या हव्यातच. आजकाल कॉलेजांतल्या गोष्टी म्हणजे लोकांना मोठा आवडता विषय झाला आहे."

"कां नाही होणार?" विश्वनाथाने विचारलें.

"मुलें आणि मुली एकत्र येऊं लागलीं की, त्याबद्दल गोष्टी ऐकण्याची सर्वांना उत्सुकता असणार. मला तुमचं पत्र फार आवडतं. पण कां हो एडिटरसाहेब, इतक्या अगदी अंतस्थ बातम्या तुम्हांला कशा कळतात?"

"तें तर आमचं व्यापारी गूढ आहे. सांगूं पुढं केव्हा तरी समजावून तुम्हांला. मग काय, मोहनराव, तुम्हांला कांही त्रिंबकरावां-बरोबर बोलायचं आहे की काय? तें माझ्यापुढंही बोलायला हरकत नाही."

त्रिंबकराव अजूनही डोकें खाजवीत होता. पण हळूहळू त्याची शंका मावळली व तो म्हणाला, "एकूण या बाळासाहेबांशीं तुमचा स्नेहसंबंध बिलकुल नाही?"

"स्नेहसंबंध? अहो वैर आहे वैर!" विश्वनाथ म्हणाला. "पण मोहननं तें त्याला समजूं मात्र दिलं नाही. तो याला स्नेही समजतो. तसा मूर्ख आहे बेटा तो!"

"हें पहा, आपण असं करूं," शामराव म्हणाला. "आपण सर्व क्लबाकडे आता टॅक्सी करून जाऊं. म्हणजे मोकळेपणाने तासभर बोलायला मिळेल. तुम्हांला कांही दुसरीकडे काम नाही ना?"

"आम्हांला तसं कांही काम नाही." असें विश्वनाथाने सांगितलें व ते चौघेही खाली चौपाटीवर आले आणि एक टॅक्सी बोलावून तिच्यांत बसले व टॅक्सी चालूं लागली.

---

प्रकरण एकोणिसावें

# चौकडीच्या गोटांत

सर्व मंडळी क्लबांत येऊन दाखल झाली, त्या वेळीं तेथे नानासाहेब, सोनाजीराव आणि वासूसाहेब हे हजर होतेच.

वासूसाहेबांनी एक पेपरमिंटची वडी काढून तोंडांत टाकली आणि ते म्हणाले, "अहो तानाजीराव, बरोबर पाहुणे मंडळी घेऊन आलांत, त्यांची ओळख तर करून द्या."

औपचारिक [illegible] करून देऊन पुढे तानाजीराव म्हणतात, "हे मोहनराव कोण हें मी जास्त सांगणं कामाचं नाही. हे मोहनराव म्हणजे ते मोहनराव."

"खरंच का?" [illegible] 'आ' करून तोंड वासलें. त्या गडबडींत त्यांच्या तोंडांतील विडी बाहेर पडली. "म्हणजे तेच कां हे?"

"आणि इकडे कुठं वाट चुकले हे?" सोनाजीरावांनी विचारलें.

"वाट चुकले नाहीत." शामरावाने उत्तर दिलें. "मुद्दाम या वाटेनं आले आहेत."

"यांचं बाळासाहेबांबरोबर अंत:करणांतून हाडवैर आहे." तानाजी म्हणाला.

"पण हें बाळासाहेबाला माहित आहे कां?" सोनाजीने विचारलें.

"तीच तर मौज आहे! बाळासाहेब यांना जीवश्चकंठश्च समजतात." तानाजीने सांगितलें. "पण यांना जी मुलगी मिळणा

होती ती आता बाळासाहेबाकडे चालली, तें यांना सहन होणार नाही, हें समजण्याइतकी सुद्धा अक्कल त्या मूर्खाला दिसत नाही.”

सोनाजीरावांनी चिरूट तोंडांतून काढला होता तो पुन: तेथे टेऊन दिला आणि कांही वेळ ते विचार करीत बसले. वासूसाहेबांनी नाकांत तपकीर कोंबून विचार करण्याला सुरवात केली. नानासाहेबांनी तंबाखूचा बार भरून गंभीर चेहरा केला. कांही वेळाने सोनाजीरावाने पुनः चिरूट बाहेर काढला आणि ते म्हणाले,

“मोहनराव, तुमच्याबद्दल बरीच हकीकत आमच्या कानावर आली आहे. ही पोरगी कांही आता तुम्हांला लाभत नाही. लाभत नाही म्हणजे काय, आम्हीं मनांत आणूं तर त्या बाळासाहेबाचे तीन तेरा नऊ अठरा करून तिला नाक घाशीत तुमच्यापुढे आणूं. उद्या आमच्या शामरावानं आपल्या पत्रांत धडाका सुरू केला की त्या पोरटीच्या चिंधड्या उडून जातील!”

“ [illegible] पत्र म्हणजे सामान्य नाही.” नाना म्हणाला. “मोठे नामांकित लेखक त्यांत लिहीत असतात.”

“त्यांपैकी आमचे नानासाहेब अगदी प्रमुख आहेत हो, मोहनराव.” [illegible] सांगितलें. “आमच्या नानांची लेखणी म्हणजे नुसती तरवार आहे. तिचा वार लागला की माणूस मेलाच! पुन: उठायची आशा नको.”

“का हो सोनाजीराव!” वासूसाहेबांनी विचारलें. “मागं नानानं पुनर्विवाहावर टीका कशी खरपूस केली होती? आणि तिसऱ्या दिवशींच त्या वधूला थंडी झाली आणि नवव्या दिवशीं ती नवज्वरानं मेली सुद्धा! बिचारीच्या कपाळाला पुनर्विवाहाचा डाग तेवढा लागला.”

“बिचारी कां म्हणतां तिला?” नानासाहेब तस्तांत मुखरस टाकीत म्हणाले. “अहो या सुधारकांचीं नाकं अशींच ठेचलीं पाहिजेत. यांची गय करून उपयोगी नाही. या युगांतील हे दैत्य!”

“अगदी बरोबर बोललांत.” शामराव म्हणाले. “मी माझ्या पत्रांत सुधारकांची गय म्हणून करीत नाही. आणि माझं पत्र पक्कं सनातनी आहे हो! सुधारणेचा वास देखील खपत नाही आम्हांला.”

"आता आपण मुख्य विषयाकडे वळूं!" सोनाजीराव म्हणाले. "मोहनराव, तुमचा आमच्याकडे येण्याचा हेतु काय?"

"हे त्रिंबकराव म्हणाले, चला आमच्याबरोबर, तेव्हा आलों, दुसरं काय!" मोहनने उत्तर दिलें.

"नाही. तें खरं. आणि आलां तें चांगलं केलंत. तुमच्यासारख्या तरुण मंडळीशीं आम्हांला संघटन करण्याची इच्छा आहे. तुम्ही कॉलेजांतील विद्यार्थी आमच्याकडे येऊन तिथं घडणाऱ्या खऱ्या गोष्टी आम्हांला कळवाव्यात यांत दोघांचं हित आहे. समाजांत नीतीचं प्राबल्य असावं यासाठी आमची सारी खटपट. त्यांत तुमच्यासारख्या सुधारकांनी फसवलेल्या माणसांना कांही साहाय्यही करायला मिळतं. आता या बाळासाहेबानं आमच्या तानाजीला कसं वागवलं, माहितच आहे तुम्हांला. त्याचं प्रायश्चित्त त्याला आम्ही दिल्याशिवाय राहणार नाही." सोनाजी थांबला.

"आणि तें प्रायश्चित्त देण्यांत शक्य तें साहाय्य तुम्हांला करावं अशी आमच्या मोहनची मनापासून इच्छा आहे." विसू आतापर्यंत स्तब्ध होता तो बोलला.

"बरोबर आहे." सोनाजीराव म्हणाले. "हो, यांचं प्रेम एका मुलीवर बसलं आणि पुढं ती मुलगी जर दुसरीकडेच वळली तर त्यांना तें कसं आवडावं? पण का हो, यांच्याबद्दल त्या मुलीची काय समजूत आहे?"

"ती पण यांना आपला सख्खा भाऊ समजते." विसू म्हणाला. "यांच्या पोटांत आपल्याबद्दल कांही राख आहे हें तिला मुळीच माहित नाही; नव्हे तिला जर तसं जाऊन सांगितलं तर तिचा त्या सांगण्यावर विश्वास सुद्धा बसणार नाही."

"हें बरें आहे." वासूसाहेब म्हणाले. "यांच्या अंतःकरणांत काय आहे याचा सुगावा बाळासाहेबालाही नाही आणि पोरीलाही नाही--काय नांव तिचं?"

"सुंदर", विसू म्हणाला. "पण नांव आणि करणी यांत केवढें अंतर!'

“तें कांही विचारूं नका.” नानासाहेब बोलले. “मी या विषयाचा फारच खोल अभ्यास केला आहे. आणि बायका इथून तिथून एका माळेच्या मणी, अशी माझी बालंबाल खात्री झाली आहे. यासंबंधीं माझे लेखही तुम्ही वाचले असतील.”

“मी वाचले आहेत” विसू म्हणाला.

“मला तुमचे लेख फार आवडतात. आमच्या क्लबांत जेवायला थोडा उशीर असला, की कोणी तरी तुमचा लेख काढतो आणि धडधड वाचून दाखवतो.”

नानासाहेबांनी क्षणमात्र रोखून विश्वनाथाकडे पाहिलें. हा आपली चेष्टा करतो की खरें बोलतो, याची त्यांना थोडी शंका आलीसें दिसलें. पण ती टिकली नाही. विश्वनाथाचा गंभीर व सालस चेहरा पाहून त्यांची खात्री झाली की, हा खरोखरच आपल्या लेखांचा चाहता आहे. मग ते म्हणाले,

“कॉलेजांतील विद्यार्थ्यांना माझे लेख आवडतात हें पाहून मला फार आनंद होतो. माझ्या निवडक लेखांचा संग्रह मी लौकरच प्रसिद्ध करणार आहें.”

“मग फारच उत्तम होईल.” विश्वनाथ म्हणाला. “तुमचे लेख विद्यार्थ्यांत फारच लोकप्रिय आहेत. अहो, मुलींची तुम्ही केवढी फजिती उडवतां, पण त्या देखील मिटक्या मारीत वाचतात!”

“खरं सांगतां की काय?” ` ` प्रश्न केला.

“खोटं कशाला मी सांगूं?” विश्वनाथ अगदी नम्रपणाने म्हणाला. “अहो फार काय, ही जी सुंदर—ही—ही”

“हां—ती—तीच—” तानाजी म्हणाला.

“ही सुद्धा नानासाहेबांच्या लेखांची तारीफ करते. आता तिलाच हे जोडे देतील तेव्हा करील तोंड आंबट कदाचित.”

“मी तसें नाही हो करणार.” नानासाहेब म्हणाले. “मी जोडे देतों ते नेहमीं शालजोडींतले देतों. आणि शालजोडींतले कळण्याइतकी कुठली अक्कल आली आहे या आजकालच्या पोरींना. तसें तिला कांही कळणार नाही हो!”

"तसा आमचा नान्याजी वस्ताद आहे बरं का!" वासूसाहेब म्हणाले. "त्याच्या लेखावर खूष असणाऱ्याला तो उघडउघड नाही कधी दुखवायचा!"

"म्हणजे मग हे त्या पोरीविरुद्ध कधी कांही लिहिणारच नाही म्हणावयाचे?" विसूने विचारलें.

"असं कधी झालं आहे काय?" नानासाहेबांनी प्रत्युत्तर दिलें. "मला जें लिहावयाचं आहे तेंच मी लिहीत असतों आणि मला जें करावयाचें आहे तेंच मी करीत असतों. निरनिराळ्या प्रकारचे लोक निरनिराळ्या वेळीं मला आपला समजतात. खरं म्हणाल तर मी सर्वांहून निराळा आहे. माझीं तत्त्वं काय आहेत याचा थांग कोणालाही नाही. पण मला सुधारक आणि दुर्धारक, शिरोळे शंकराचार्यांचे अभिमानी आणि कुर्तकोटी शंकराचार्यांचे अभिमानी, जातिभेदाचे पुरस्कर्ते आणि सबगोलंकाराचे द्वेष्टे, हिंदुसभावाले आणि सत्यशोधक, प्रार्थनासमाजिष्ट आणि आर्यसमाजिष्ट, बुद्धाचे अभिमानी आणि जैन धर्माचे अभिमानी सगळेच आपला समजतात. माझी खुबीच अशी आहे की, मला जें लिहावयाचं तेंच मी लिहितों. पण अशा कांही चलाखीनं लिहितों की, वाचणारा माझ्यावर खूष असतो. मग तो वाचणारा कोणीही असो—स्त्री असो, पुरुष असो."

"इत्यादि, इत्यादि" वासूसाहेब म्हणाले, "आमचे नानासाहेब म्हणजे आधुनिक काळांतील लॉर्ड बेकन आहे. बेकन न्यायाधिशाचं काम करी, तेव्हा तो दोहों पक्षकारांकडून पैसा खाई, पण तो असं सांगे की मी न्याय नेहमीं खराच असेल तोच देतों. पैसा कोणाचाही घेतला तरी माझी न्यायाची तराजू त्यामुळे ढळत नाही."

"हें वर्णन मला कसं लागू होतं रे वाश्या!" नानासाहेबाने विचारलें."

"मला वाश्या म्हटलेलं खपणार नाही. मी तुझ्यासारखा उचल्या विद्वान नाही. मी विद्वान आहे म्हणून विद्वान लोकांत माझी प्रसिद्धि आहे. मी आता जो 'संगीत आणि गणित' म्हणून निबंध लिहिला आहे

त्याबद्दल मला पॅरिसच्या ॲकॅडेमीकडून प्रशंसापत्र आलं आहे. तुझ्या-सारखी नकली विद्वत्ता माझ्याजवळ नाही."

"अरे जा रे जा!" नानासाहेब म्हणाला, "पॅरिसची ॲकॅडेमी म्हणे प्रशंसापत्रें देत आहे तुला! पाठवलेल्या पत्राची पोच आली असेल, दुसरं काय? आणि तुझ्याजवळ विद्वत्ता तर नाहीच. पण माझी म्हणतोस ती नकली विद्वत्ता सुद्धा नाही. माझी अस्सल असो की नकली असो, माझी विद्वत्ता हें चालू नाणं आहे. बेकनची उपमा तुलाच शोभते. तंतोतंत शोभते. ज्याच्या दिडक्या मिळतील त्याच्यासारखं लिहून देणं हा तुझा धंदा आहे, वासूसाहेब."

"असे काय तंडतां तुम्ही दोघे!" सोनाजीराव म्हणाले. "हा तुमचा रोजचा विनोद आहे, हें या त्रयस्थांना कळायचं नाही आणि हें तुमच्या विनोदाचा भलताच अर्थ करतील. मग आता मोहनराव, बोला, तुम्ही आम्हांला काय मदत करणार ती. हें बाळासाहेबांचं आणि त्या पोरीचं प्रकरण चवाठ्यावर आणलंच पाहिजे. कां हो शामराव?"

"आणलंच पाहिजे म्हणजे काय?" शामराव म्हणाले, "अगदी आणलंच पाहिजे. माझ्या पत्राचा तर बाणा आहे की, समाजांतील असतील नसतील त्या भानगडी चव्हाठ्यावर आणायच्या. आणि कांही नसेल तर राजरोस खोट्या कंड्या उठवावयाच्या. त्या कंड्या उठव-ल्यावर त्यांतून कांही निष्पन्न होतं अं, नाही असं नाही."

"तुम्ही त्याला खोटी कंडी म्हणूं नका, शामराव." वासूसाहेब आता शांत झाले होते ते म्हणाले, "एखाद्या गुन्ह्याची चौकशी करतांना गुन्हेगार कोण असतील याची प्रथम कल्पनाच करावी लागते. मग त्या काल्पनिक गुन्हेगारांना वहिमावर पकडून त्यांच्यावर निरनिराळे प्रयोग करून खरं बाहेर काढावं लागतं. तोच प्रकार तुमचा. या कंड्या नव्हेत, ही थिअरी आहे."

"अगदी बरोबर." सोनाजीराव म्हणाले. "आमच्या कृत्यांचा खरा सद्गुण दाखवण्याचं काम वासूसाहेबांसारख्या
व्हायचं नाही. 'थिअरी' किंवा 'कल्पना' काढणं म्हणजे कांही खोटी कंडी नाही. आता हीच गोष्ट घ्या. कॉलेजांत प्रौढ मुलं आणि

मुली एकत्र वावरतात. तेथले मुलगे म्हणजे सगळे कांही शुकाचार्य नाहीत, किंवा तिथल्या मुली म्हणजे कांही सगळ्या गार्गीमैत्रेयी नाहीत. एकत्र वावरतात तेव्हा कांही ना कांही भानगडी उपस्थित व्हावयाच्या, अशी आम्ही कल्पना बसविली; यांत कुठं चुकलं?"

"यांत कुठं चुकलं?" नानासाहेब व शामराव एकदम म्हणाले.

"मी जरा बोलूं का?" विसूनें विचारलें.

"बोला, बोला. अगदी खुल्या दिलानं बोला. आमच्याकडे अगदी उघडा दरबार आहे. अगदी भीडभाड न धरतां बोला." सोनाजीरावांनी सांगितलें.

"ज्या ज्या ठिकाणीं स्त्री-पुरुष एकत्र वावरतात तिथं तिथं भानगडी उपस्थित व्हायच्याच ही कल्पना गृहीत धरली तर मग आमच्या कॉलेजावरच का नुसती संक्रांत? सर्वत्रच भानगडी उपस्थित होतात असं म्हणावं लागेल. आणि दुसरं असंही म्हणावं लागेल की, प्रत्येक मनुष्य नुसता पाजीपणा करायला टपलेला आहे! संधि मिळायचा अवकाश की त्यानं गुण उधळलेच. आणि हें जर खरं धरलं तर गुण उधळण्याचं प्रमाण अल्पवयी तरुणांपेक्षा संसारांत निढावलेल्या प्रौढांत आणि वृद्धांत अधिक असणार. कारण त्यांना अनुभव अधिक आणि लोकांना नकळत आल्या संधीचा फायदा कसा घ्यावा याचं शास्त्र त्यांना अधिक माहीत. शिवाय वृद्धांनी केलेला पाजीपणा चव्हाट्यावर आला तर त्यांची हाकाटी वृद्ध करीत नाहीत. तरुणांनी हाकाटी केली तर त्याला ते महत्त्व देत नाहीत. कारण समाजाचीं सूत्रं वृद्धांच्या हातीं असतात. पण तरुणांबद्दल वृद्धांनी हाकाटी केली की तिला मोठं स्वरूप येतं. तेव्हा माझं म्हणणं असं की, कांही विशिष्ट लोकांबद्दल जेव्हा आपण 'थिअरी' काढतों तेव्हा ती तेवढ्याच लोकांबद्दल आहे एवढी तरी खात्री पाहिजे. ती सगळ्यांना लागू होण्यासारखी असेल तर तेवढ्या निवडक लोकांना ती लागू करणं म्हणजे अगदी चुकीचं आहे."

"तुमचं म्हणणं माझ्या नीटसं लक्षांत आलं नाही." सोनाजीराव म्हणाले.

"कांही उदाहरणं देतों, म्हणजे कदाचित् माझं म्हणणं अधिक स्पष्ट होईल." विसूने उत्तर दिलें, "लहान मुलांना प्रामाणिकपणा शिकविला पाहिजे अशी 'थिअरी' आहे म्हणून जॉर्ज वाशिंगटनच्या गोष्टीचे धडे मुलांना वाचावे लागतात, आणि शाळांतल्या भिंतीवर 'Honesty is the best Policy' न हि सत्यात् परो धर्मः वगैरे जाड अक्षरांचे तक्ते लावलेले असतात. आता खोटं बोलण्याची किंवा वागण्याची प्रवृत्ति मुलांत अधिक का वृद्धांत अधिक हें पाहायला नको का? सर्व व्यवहार जिथं लबाडीनं भरला आहे, अधिक लबाड कोण हीच जिथं अकलेची निशाणी ठरली आहे, द्रव्यार्जनार्थ कितीही खोटं बोललं तरी जिथं समाज निंदा करीत नाही, जिथं मोठमोठया हवेल्या अन्यायानं [illegible] धनाच्या पायावर उभ्या केलेल्या आहेत, तिथं 'न हि सत्यात्परो धर्मः' असे तक्ते लहान मुलांच्या शाळांत लावण्याऐवजीं वृद्धांचा व्यवहार ज्या ज्या ठिकाणीं चालतो त्या त्या ठिकाणीं लावणं आवश्यक नाही का? मुलांची कोवळी प्रवृत्ति खऱ्याकडेच असते पण वृद्धांच्या निर्ढावलेल्या वृत्तीचं दडपण पडूनच ती मरण्याचं भय असतं हें खरं का खोटं?"

"वाद तहकूब!" सोनाजीराव म्हणाले. "तुमच्या म्हणण्यांत तथ्य आहे आणि पुढे निवांतपणें बसून ही चर्चा आपण करूं. तुमच्यासारखी बुद्धिमान मंडळी आम्हाला भेटली ही आनंदाची गोष्ट आहे. आता मोहनराव, तुम्ही एक करा. बाह्यात्कारीं बाळासाहेबांसंबंधीं स्नेह दाखवा. तुमचं तिथं जाणं येणं असूं द्या. आणि त्यांच्याकडची बातमीन् बातमी काढून आम्हांला सांगा. एवढं काम आपल्याकडे लागलं.

"पण तुमच्याकडे आमचं येणं जाणं आहे हें त्याला कळलं तर मोहनवरचा त्यांचा विश्वास कमी होईल, नाही?" विसू बोलला.

"तिथं तर मोहनरावांनी आपली करामत दाखविली पाहिजे. त्याचा विश्वास उडतां तर उपयोगी नाही. आणि–थांबा," वासूसाहेब डोकें चोळीत म्हणाले, "कांही प्रश्न निघालाच की द्या त्याला ठेवून की, मी त्यांच्या बातम्या काढण्यासाठी त्यांच्यांत शिरलों आहें!"

"अगदी बेमालुम युक्ति बुवा!" सोनाजीरावाने बाबूसाहेबाच्या हातावर टाळी दिली आणि एक घटकाभर कुजबुज होऊन मोहन व विश्वनाथ बाहेर पडले.

---

## प्रकरण विसावें

# बाळासाहेबाच्या घरीं

बाळासाहेबाच्या घरीं बाळासाहेब, सुंदर, शारदा आणि मोहन हे दुपारीं जेवण झाल्यानंतर तासाभराने जे बोलत बसले ते आपण किती वेळ बोलत होतों याचें त्यांना भानही नव्हतें. समोर भिंतीवर दर पाव घंट्याला संगीत आवाज काढणारें मोठें थोरलें घड्याळ होतें, पण त्याचे दर पाव घंट्यागणिक होणारें मधुर गायन आणि तासा-तासांनी पडणारे खणखणीत टोके हे सुद्धा त्यांनी ऐकिले नाहीत. इतके ते आपल्या बोलण्यांत गर्क होते. आपल्याकडे प्रथम आलेलें पत्र आणि त्रिंबकरावाने त्यानंतर आणून दिलेलें पत्र हीं दोन्ही बाळासाहेबांनी सर्वांना दाखविलीं. त्यानंतर मोहनने कुटाळ क्लबची व शामराव एडिटरांची हकीकत सांगितली व सुंदरचा शत्रु हा त्या मंडळीशीं स्नेह करून तिची बेअब्रू करण्याच्या उद्योगांत आहे, हा निष्कर्ष या सर्व गोष्टीवरून निघावा हें साहजिक होतें. शामरावाच्या पत्राच्या नुकत्याच निघालेल्या अंकांत नांवें न घालतां बाळासाहेब व सुंदर यांच्यासंबंधीं कांही कथा कल्पनेने बसवून प्रसिद्ध झालीं होतीं व कांही अस्सल पत्रें आमच्याजवळ असून तीं लौकरच प्रसिद्ध करण्याचा आपला विचार असल्याचेंही त्यांत जाहीर केलें होतें. त्याशिवाय एका समाजसेवा करणाऱ्या संस्थेशीं बाळासाहेबांचा कांही थोडा संबंध होता त्या संस्थेवर व त्या संस्थेच्या साहाय्यकर्त्यांवर संपादकीय लेखक बरेच घसरले होते, आणि कोठल्या एका सभेंत बाळासाहेबाने भाषण केलें होतें, त्या भाषणाचेही वाभाडे काढले होते. तोही सर्व मजकूर मोहनने तेथेच वाचून दाखविला. शामरावांनी या सर्व मजकुराने भरलेला आपल्या

पत्राचा अंक मोहनजवळ मुद्दाम दिला होता व तो वाचून ठरलेल्या कार्यक्रमाप्रमाणें मोहनने आणि मोहनबरोबर विश्वनाथाने अघळपघळ शब्दांनी त्याची पाठही थोपटली होती. पत्रें वाचलीं; पत्रांतला मजकूर वाचला; शारदेने बऱ्याच गोष्टी बोलून दाखविल्या, मोहनने संवादांत पुष्कळसा भाग घेतला; या लोकांची खोड मोडली पाहिजे हें बाळासाहेबाने तीनचार वेळां तीनचार प्रकारें सांगितलें. हा वेळपर्यंत सुंदरने मधून मधून होकारात्मक किंवा नकारात्मक मान हालविणें, केव्हा केव्हा होय किंवा नाही म्हणणें आणि क्वचित् प्रसंगीं एकादें वाक्य बोलणें, यापलीकडे संवादांत भाग घेतला नव्हता आणि बाळासाहेब व मोहन यांनी वरचेवर विचारलें असतांना सुद्धा आपल्या दारुण शत्रूचें नांव सांगितलें नव्हतें.

संवादाच्या भरांत सध्याच्या शाळांत व कॉलेजांत जाणाऱ्या मुलामुलींनी कसें वागावें, तीं कशीं वागतात किंवा वागत नाहीत यासंबंधीं भवति न भवति अनुषंगाने म्हणून झाली; पण ती कांही थोडी थोडकी झाली असें नाही. या चर्चेत बराच किंवा बहुतेक भाग शारदा व मोहन यांनी घेतला होता. सुंदर बहुतकरून बोललीच नाही. बाळासाहेब बरेचसें असें एकदाच बोलला. तो म्हणाला, "तुम्ही सांगतां त्यांत पुष्कळ गोष्टी खऱ्या आहेत. त्यासंबंधीं दोन मतं होण्याचं कारण नाही. त्याबरोबरच कॉलेजमध्ये जाणाऱ्या मुलामुलींसंबंधीं सर्व लोकांनी कसं वागावं, लिहावं किंवा बोलावं याचीही कांही मर्यादा ठरायला नको का? कॉलेजांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांसंबंधीं—विशेषत: मुलें व मुली तिथं एकत्र येतात त्यासंबंधीं लिहितांना अशा एकत्र येण्यानं अनीतीचे प्रसंगच आले पाहिजेत अशी समजूत पुष्कळांनी करून घेतली आहे, तिच्यांत कांही तथ्य आहे काय, आणि तत्त्वत: व व्यवहारत: असं अनीतिमय वातावरण या मुलांमुलींच्या एकत्र येण्यानं उत्पन्न होणं हें अपरिहार्य आहे का? जे लोक असं वातावरण आहे व तसं असणं हें किंवा परिहार्य आहे असं जोरानं म्हणतात व गावभर सांगत किंवा वर्तमानपत्रभर लिहीत सुटतात, त्यांनी मुलींचीं शिक्षणं बंद करायची चळवळ सुरू केली पाहिजे किंवा सगळीं

कॉलेजंच बंद करण्याची चळवळ सुरू केली पाहिजे. विद्येचे नवे डोळे मिळाल्यानंतर स्त्रिया काय किंवा पुरुष काय, जुन्या लोकांच्या जुन्या डोळ्यांनीच पाहातील, अशी अपेक्षा करणं म्हणजे ज्याला मोटार मिळाली आहे तो पायांनी चालत जाईल अशी अपेक्षा करण्याइतकं हास्यास्पद नाही काय? शिवाय या कॉलेजांत जाणाऱ्या मुलांमुलींवर भरमसाटपणानं चिखल उडवण्याच्या अकार्यांत ते गुंतले आहेत व मुलगा व मुलगी जवळ आलीं की परस्पर आदर व स्नेह यांचा प्रकाश न पडतां अनीतिमय वर्तनाच्या ठिणग्याच पडल्या पाहिजेत व पडतात असं जे वर्णन करतात ते एक मोठी गोष्ट विसरतात. हीं मुलंमुली परक्यांचीं का आहेत? हीं आपलींच आहेत ना? आणि आपलीं मुलं परिस्थितीच्या साध्या धक्क्यानं सुद्धा पाय घसरून पडण्याइतकीं नादान आहेत असं म्हणणारे आईबाप कोणत्या लायकीचे समजले पाहिजेत? भवभूतीच्या उत्तर रामचरित्रांत सीतेला अग्निदिव्य करून शुद्ध व्हावं लागलं ही हकीकत ऐकतांच तिचा 'चापेन शापेन वा' या सामर्थ्याचा पिता राजर्षि जनक म्हणाला, 'जन्मापासून जी परिपूत आहे तिला शुद्ध करण्याला बाह्य ऐट मिरविणारा हा अग्नि कोण?' या ठिकाणीं पित्याचं खरं अंतःकरण दिसतं. ज्यांना खुद्द आपल्या मुलांविषयीं विश्वास नाही त्यांना स्वतःविषयीं विश्वास नाही. ते स्वतः दुष्ट, दुरात्मे, अमंगल विचारांनी भरलेले, आणि विषयाच्या चिखलांत लोळण्यासाठी ज्यांचीं सर्व इंद्रियें टपून बसलेलीं असतात, असले लोक आहेत. ते आपल्यावरून जग ओळखतात. असल्या लोकांच्या प्रलापांना सत्य मानणं जगांत केवळ पाप आहे, पुण्य नाहीच व असणंही शक्य नाही हा सिद्धांत मान्य करणं होय.... आणि हा सिद्धांत म्हणजे खरा नास्तिकपणा होय. हा सिद्धांत म्हणजे मनुष्य मुक्त होणं शक्य नाही, तो परमेश्वर होणं शक्य नाही, असं म्हणणं होय. आणि असं म्हणणं म्हणजेच नास्तिक्य." बाळासाहेब थांबला आणि सुंदरकडे पाहून म्हणाला, "विषयाला सोडून मी कांही तरी भरकटत सुटलों आहे असं वाटतं. त्याबद्दल मला माफ करा."

कांही वेळ सर्व स्तब्ध होते. आतापर्यंत सुंदर बहुतेक बोलली नव्हती.

ती मग म्हणाली, "बाळासाहेब, विषयाला सोडून तुम्ही कदाचित बोललां असाल; पण तुमचं बोलणं जें जें ऐकावं त्यावरून तुमच्या अंत:करणाच्या प्रवृत्तीबद्दल कौतुक व आदर ˜ · ˜ · वाटल्याशिवाय राहत नाही. तुम्हांला दुष्ट माणसं पुष्कळ भेटलीं आहेत. जीं दुष्ट नाहीतशीं वाटतात तीं दुष्ट असण्याचा संभव असतो हें उत्तम समजण्याइतके तुम्ही व्यवहारज्ञ आहांत. असं असूनसुद्धा मनुष्याबद्दल एवढा विश्वास, तुमच्या शब्दांत सांगायचं म्हणजे, एवढी आस्तिक्यबुद्धि, तुमच्यांत असावी हा तुमच्या स्वत:च्या निर्मळ आणि मधुर अंत:करणाचा गुण होय."

सुंदर हें इतक्या प्रसन्नपणाने बोलली की, तिच्या मुखावर सूक्ष्मपणें विलसलेलें हास्य स्पुटतर झालें आणि त्या मुखाचें कौतुकाने निरीक्षण करतां बाळासाहेबांची निमिषभर तंद्री लागली. मग तो भानावर येऊन म्हणाला, "तुमच्या या प्रसन्न मुखाकडे आणि तेजस्वी नेत्रांकडे ˜ · अंत:करणांत पाप उद्भवणं हें केवळ अशक्य आहे."

सुंदर आता मोकळेपणाने हसली. "माझ्या प्रसन्न मुखानं आणि तेजस्वी नेत्रानं भुरळ घातली, यांत त्याची तारीफ करण्यापेक्षा तुमच्या निर्मळ अंत:करणाचीच तारीफ करतें. बाळासाहेब, माझ्यासंबंधीं त्या पत्रांत काय मजकूर आहे तो आपण वाचला आहे. आणि मी ज्या प्रकारें वागतें त्यावर टीकाच ऐकायची असेल, तर ही माझी मैत्रिण किंवा हा मोहन यांना तुम्ही विचारा."

बाळासाहेबांचा ˜˜ · आता नाहीसा होऊन तो आपल्या नेहमींच्या स्थितींत आला होता. आता तो मोकळेपणाने हसला. "मला जेव्हा आणि जर आवश्यकता वाटेल तर मी त्यांना विचारीन; पण त्यामुळं तुमच्या मुखाची आणि नेत्रांची आणि त्या सौंदर्याची तारीफ करण्याची वृत्ति माझ्यांतून जाईल असं मात्र समजूं नका. आणि त्या सौंदर्याने माझ्या चिकित्सक व्यवहारी दृष्टीला जर भुरळ पडली असेल तर या अपूर्व सौंदर्याचं अधिष्ठान सद्‌गुण असल्यामुळंच ही रमणीय प्रसन्नता आपल्या मुखावर दिसते, हा जो सिद्धांत मी बांधला आहे तोही मी बदलणं शक्य नाही."

"गडे शारदे," सुंदर म्हणाली, "इतक्या विलक्षण स्तुतीनंतर कोणत्या मुलीचं डोकं ठिकाणावर राहील?"

"मग तुझं डोकं ठिकाणावर आहे?" मोहनने विचारलें. त्याच्या प्रश्नाचा गर्भितार्थ पूर्णपणें लक्षांत येऊन शारदा हसली; बाळा-साहेबांच्या मुखावर किंचित् स्मित पसरलें आणि सुंदरचा चेहरा लाज-ल्यामुळे की काय न कळे, आरक्त झाला. इतक्यांत घडाळ्यांत सहाचे ठोके पडले.

"चार पांच तास आपण बोलतों आहोंत, पण आपल्या शत्रु-संबंधीं सुंदराबाईंनी अजून कांहीही सांगितलें नाही. पण शारदाबाई तुम्हांला त्याची माहिती आहे. तुम्ही सांगा."

"सुंदरची हरकत नसेल तर मी सांगेन." शारदेने उत्तर दिलें.

"माझी अगदी भरपूर हरकत आहे." सुंदरने हसत हसत सांगितलें.

"तुझी हरकत मला चमत्कारिक दिसते." बाळासाहेब म्हणाले.

"मी नाही का तुम्हांला चमत्कारिक दिसत?" सुंदरने आपली दृष्टि बाळासाहेबांवर रोखून प्रश्न केला. ह्या प्रश्नामुळे बाळासाहेब किंचित् भांबावला. काय उत्तर द्यावें याचा तो विचार करूं लागला. तेवढया अवधींत शारदा आंत उठून गेली. मोहनही पाय मोकळे करण्यासाठी गच्चीवर गेला. आपण दोघे एकटे आहोंत हें त्यांच्या लक्षांत किंचित् वेळ लागला. मग बाळासाहेब म्हणाला, "सुंदर, मला त्याचं नांव सांगा की! मी त्याचा बंदोबस्त करतों. आणि मला कांही सांगायचं होतं—"

"तुम्हांला काय सांगायचं आहे तें मला माहीत आहे. पण तें सांगण्यापूर्वी विचार करा; पुष्कळ विचार करा."

"मी काय सांगणार हें तुला माहीत आहे, सुंदर?" बाळासाहेबाने उत्सुकतेने विचारलें. "पण माहीत आहे तसं मान्य आहे का?"

"मान्य आणि अमान्य करण्याची मुखत्यारी मजकडे नाही—"

"म्हणजे?—"

" म्हणजे, ती दुसऱ्या कोणाकडे आहे असं नाही. पण माझ्यावर आलेलं काहूर वितळून गेल्याशिवाय तुम्हांला मान्यता द्यावी हें मात्र मला मान्य नाही."

" मग तें काहूर घालविण्याच्या तर आम्हीं उद्योगांत आहोंत. आणि त्यांत तुझं मी साहाय्य मागतों आहें. तुला जी माहिती आहे, ती मला कळली, म्हणजे या प्रकरणाचा शेवट लागण्याला मुळीच वेळ लागणार नाही."

" माझ्यावर आलेल्या संकटांशीं होतां होईल तों मीच टक्कर मारणार. तुम्हीं जी खटपट चालविली आहे तिच्याबद्दल मला मुळीच कांही ˝ नाही. तुमचे आणि मोहनचे माझ्यावर खरोखरच उपकार आहेत. परवा मोहन मजकडे आला आणि त्यानं सर्व हकिकत मला सांगितली आणि नंतर माझ्याबद्दल तो जें बोलला तें ऐकून माझं अंत:करण भरून आलं. माझ्याबद्दल तुमचा, त्याचा आणि इतर मंडळीचा इतका सद्भाव असावा हें माझं भाग्य आहे. पण बाळासाहेब, ही लढाई माझी मीच जिंकली पाहिजे. तें कां, हें मी तुम्हांला पुढे केव्हा तरी सांगेन; पण ती जिंकण्याच्या खटाटोपांत माझ्याबद्दल तुमचं मत केव्हाही साशंक होणार नाही ना ?"

" सुंदर, मन किंवा अंत:करण उघडं करून दाखविण्याची कांही युक्ति असती तर मी तिचा तात्काळ अवलंब केला असता. शब्दांनी अंत:करणाचं दर्शन होतं, पण अंत:करण जेव्हा भावनेनं भरून जातं, उचंबळून येतं, तेव्हा गरीब शब्द दुबळे ठरतात. तुझ्याबद्दल शंकाही माझ्या मनांत केव्हाही नव्हती; पुढंही उत्पन्न होईल असं मला वाटत नाही."

" बाळासाहेब तुमच्या आश्वासनानं मला किती हुरूप आला. त्याचं नांव मी तुम्हांला सांगत नाही, याबद्दल माझ्यावर रागावूं नका आणि तुम्ही जें मला सांगणार होतां, विचारणार होतां, तें मी तुम्हांला विचारूं दिलं नाही म्हणून माझ्याबद्दल विपरीत समजूत करून घेऊं नका."

" या उत्तरानं माझं समाधान झालं. पण विचार करा म्हणून सांगितलंस त्याबद्दल मला स्पष्टपणें बोललं पाहिजे. मी विचार पुष्कळ

केला आहे. मला कसलीही भुरळ पडली नाही; भुरळ दारूची पडते; अमृताची पडत नाही."

"तुम्हीं मनांत आणाल तर कवि व्हाल!" सुंदर आश्चर्य-चकित मुद्रेने म्हणाली.

"स्फूर्ति प्राप्त झाल्यावर कोणीही कवि होतो. स्फूर्तीचें सान्निध्य हें कवित्वाचं जन्मस्थान आहे."

मोहन त्याच वेळीं आंत आला आणि त्याने तें वाक्य ऐकलें. तो म्हणाला, "काव्याची चर्चा चालली आहे, त्यावरून जें अनुमान निघतं तें काढण्यास हरकत नाही ना?"

"अनुमान काढणं हें मोठं धोक्याचं काम आहे." सुंदरने मोहनला बजावलें आणि त्याने तिच्याकडे पाहिलें; तेव्हा क्षणमात्र तो स्तब्ध राहिला. सौंदर्यावर मोहनने कविता रचिल्या होत्या. पण आता जें सौंदर्य दिसलें तें पाहून तो अगदी चकित झाला, आणि मग त्याच्याही डोक्यांत प्रकाश पडला. पण ओठावर आलेले शब्द त्याने मागे सारले आणि तो म्हणाला,

"बाळासाहेब, सुंदरने त्याचं नांव तुम्हाला सांगितलं का?"

"नाही. तें सांगण्याचा तिचा विचार नाही. ती म्हणते की, 'ही लढाई माझी मीच खेळणार. कां हें पुढं केव्हा तरी सांगेन.' तिला आग्रह करण्यांत आता अर्थ नाही."

"ठीक आहे जिथं तुम्ही तिला आग्रह करीत नाही तिथं मी तरी कशाला करावा? पण आपण सुरू केलेलं काम त्यामुळं थांबविण्याची जरूरी नाही ना!"

"मुळीच नाही." बाळासाहेबाने उत्तर दिलें. "तें मी तिला स्पष्टपणें सांगितलं व तिची त्याला हरकत नाही."

"आणि तिनं त्याला हरकत घेतली असती तर?" मोहनने वात्रटपणाने विचारलें.

" तर—"बाळासाहेबाने सुंदरकडे पाहिलें. ती मोहनकडे पाहून हसली. "तरी सुद्धा आपण सुरू केलेला उद्योग मी राजी झालों नसतों."

" पण मी हरकत घेतलीच नसती." सुंदर म्हणाली; " इतकंच नव्हे, तर लागेल तेव्हा तुम्हां दोघांचें आणि दुसऱ्या मित्रांचेंही साहाय्य मागण्याला मी मुळीच अनमान करणार नाही."

" इतकं शहाणपण असल्यावर आणखी काय पाहिजे ?" मोहन म्हणाला.

" मग तेवढं त्याचं नांव सांग ना ?"

" उं हुं." सुंदर आंत येऊं लागलेल्या शारदेकडे पाहून म्हणाली.

" कांही हरकत नाही." मोहन म्हणाला, " तूं सांग किंवा नको सांगूस, त्याचं नांव हुडकून काढून त्याचा बंदोबस्त केल्याशिवाय राहणार नाही."

" मोहन," शारदा म्हणाली; "तुझी काव्यमय भाषा मागं पडलेली दिसते आणि आता हडेलहप्पी शब्द तुझ्या बोलण्यांत येऊं लागले."

" शारदाताई," मोहन म्हणाला, " काव्य करायचं कार्य आमचे बाळासाहेब अंगीकारणार आहेत. आताच ते म्हणाले की स्फूर्तीचं सान्निध्य म्हणजे कवित्वाचं जन्मस्थान आहे."

" म्हणजे काय ? तूं म्हणतोस तरी काय मोहन ?" आश्चर्यचकित दृष्टीने शारदेने विचारलें.

" आपल्या मैत्रिणीकडे पाहा." मोहन म्हणाला. " मी हिच्यावर पुष्कळ कविता केल्या आहेत. पण या वेळीं हिच्या मुखावर जी प्रसन्नता आहे ती शब्दानं व्यक्त करायला कालिदासालासुद्धा जमणार नाही.

" सुंदर, हा मोहन काय म्हणतो ? " शारदेने आपल्या मैत्रिणीला विचारलें.

" तें मलाही समजलें नाही. पण माझ्याकडे पाहून कांही तरी बरळण्याची त्याची सवय कांही आजची नवी नाही."

"काय हो बाळासाहेब, हें काय गौडबंगाल आहे? हे काय बोलतात याचा अर्थच मला समजत नाही."

"काव्यांत वरवरचा अर्थ उपयोगी नाही. त्यांतील ध्वनि कळावा लागतो."

"आणि कळण्याइतकी आमची शारदाताई काव्यमर्मज्ञ आहे." मोहन म्हणाला.

"अस्सं!" शारदा म्हणाली; "एकूण—"

"एकूण तुला ध्वनि कळतो असं या कवीचं तुला सर्टिफिकेट आहे!" सुंदर बोलली आणि त्यावर ते चौघेही मनापासून हसले.

---

प्रकरण एकविसावें

# प्रेम

सुंदर विचारांत मग्न होती; किंबहुना विचारांचीं मुळें जमवून त्यांची साखळी करण्यांत ती गर्क झालेली होती. त्यादिवशीं बाळासाहेबांच्या येथे जो संवाद झाला, त्यांत मध्यंतरीं अल्प का होईना त्या दोघांना परस्परांच्या अंत:करणाची साक्ष पटली. तिचे परिणाम काय हा विचार तिच्या मनांत आला; आणि ज्या भावनेचें रूप त्या वेळीं प्रत्यक्ष दृष्टीला पडलें, ती एकदम उपस्थित झाली का अंत:करणांत सुप्त होती, ती प्रसंगानुरोधाने बाहेर आली, हें कोडें तिच्यापुढे पडलें होतें. पण या कोडयाचें उत्तर जरी तिला तात्काळ देतां आलें नाही, तरी त्या भावनेने तिचें सर्व अंत:करण आता भरून गेलें होतें यांत शंका नाही. प्रेमाच्या गोष्टी सुंदरने पुष्कळ वेळां वाचल्या होत्या. प्रेमाची चर्चा तिने पुष्कळ वेळां केली होती. मोहनप्रमाणें कांही थोडयांनी तिच्याजवळ प्रेमाची याचना केली होती. पण या सर्व प्रसंगीं तिचें अंत:करण अलिप्त होतें. ज्याप्रमाणें मोहनच्या प्रेमयाचनेची तिने हसून-खेळून, चेष्टा करून वासलात लाविली, त्याचप्रमाणें प्रेमाची जेव्हा

जेव्हा गोष्ट निघे, तेव्हा ती हसण्यावारी घालवी. विवाहाच्या मुळाशीं प्रेम असावें व हा विवाहाचा स्तुत्य प्रकार आपल्या बाबतींत घडून यावा, अशी तिची इच्छा होती; पण आतापर्यंत ज्या भावनेने अंतः-करण आणि शरीर भरून जातें, शरीराच्या रोमारोमांत नवीन आनंदा-च्या लहरी उत्पन्न होतात, अंतःकरण उल्हासाने वाहूं लागतें, त्या भावनेचा तिला प्रत्यक्ष अनुभव आला नव्हता. आणि ती भावना अशी आहे—आणि सर्व उत्कृष्ट आणि स्थायी भावना अशाच आहेत—की अनुभवाशिवाय तिचें खरें रहस्य उकलणार नाही. वाचून किंवा ऐकून किंवा चर्चा करून तिचें सामान्य स्वरूप कळेल. विजेचा झटका म्हणजे काय, या गोष्टीची पुस्तकांत चित्र दाखवून किंवा एकाद्याने वर्णन करून कदाचित् कांहीशी अंधुक कल्पना येईल; पण ती कल्पना आणि विजेच्या झटक्याचा प्रत्यक्ष अनुभव यांत महदंतर आहे. समुद्र न पाहिलेल्याला नदी व तलाव यांच्या उपमा, दृष्टांतांनी आलेली समुद्राची कल्पना आणि मग प्रत्यक्ष पाहिलेला समुद्र यांतही महदंतर असतें. तोच प्रकार प्रेमाचा, कोणत्याही दृढ आणि स्थायी भावनेचा आहे. आज तें सुंदरला कळलें आणि पटलें. कारण ज्या भावनेने ती उल्हसित झाली होती, रोमांचित झाली होती ती तिने पूर्वी अनुभवलेली नव्हती. तिची शाब्दिक कल्पना तिला होती, पण प्रत्यक्ष अनुभवाने त्या भावनेचें चित्र यथार्थपणें काढणें शब्दांना शक्य नाही हें तिला आता समजून चुकलें. मूर्ति अगदी पहिल्या दिवसापासून तिच्या पुढे सरकली. बाळासाहेबांची त्या विलक्षण रीतीने ओळख झाल्या दिवसापासून तिचे मित्र तिची चेष्टा करूं लागले होते ती चेष्टासुद्धा आजपर्यंत तिच्या अंतःकरणांत जाऊन भिडत नसे. पण आता ती चेष्टा लक्षांत घेऊन आपल्या अंतःकरणांतील गूढ जें आप-ल्यालासुद्धा समजलें नाही, तें आपल्या मित्रांना समजलें होतें की काय, असें तिला वाटूं लागलें. ज्या नवीन भावनेचा तिच्या अंतःकरणांत संचार झाला, तीमुळे जशी ती उल्हसित झाली, तशी त्रस्तही झाली. आपल्याला कांही तरी हवें आहे, तें मिळणारही आहे, पण तें आता आपल्याजवळ नाही, आणि तें आपल्याला वेदना होताहेत

अशा तऱ्हेची वृत्ति तिला जाणवूं लागली; आणि सुख व त्रास या परस्परविरुद्ध गोष्टी आपणांला एकाच वेळीं कशा घेरतात, याचें तिला आश्चर्यही वाटलें. त्या वेळीं कोणाजवळ तरी बोलावें असें तिला वाटूं लागलें व शारदा येईल तर किती उत्तम होईल हाही विचार तिच्या मनांत आला. आपली भावना आंतल्या आंत दाबणें तिला आता असह्य झालें.

एखादी इच्छा मनांत आणावी आणि इच्छित वस्तू लागलीच प्राप्त व्हावी, असें केव्हा केव्हा घडतें. अशा भाग्यशाली लोकांचें वर्णन कालिदासाने "संकल्पमात्रोदितसिद्धी" म्हणजे संकल्प केल्याबरोबर त्याची लागलीच सिद्धता त्यांच्या बाबतींत होते असें केलें आहे. आणि अशा मंडळींत त्या वेळेपुरती तरी सुंदरची गणना करण्यास हरकत नाही. शारदा येईल तर उत्तम होईल, हा विचार आला न आला तोंच ती आल्याचें तिला समजलें व ती आली असें सांगणाऱ्याच्या पाठोपाठच शारदा तेथे आली. तिने अगदी हास्यमुखाने आपल्या मैत्रिणीकडे पाहिलें, आणि तिच्या मनांतला भाव ओळखून सुंदरही हसली. आपलें इंगित, आपल्या अंतःकरणाच्या आंत लपविलेली गोष्ट शारदेला माहीत आहे म्हणून सुंदरला संतोषही झाला. शारदा येऊन आपल्या मैत्रिणीजवळ बसली आणि तिचा हात आपल्या हातांत घेऊन म्हणाली, "सुंदर, आज गुलाब कसे फुललेले दिसतात."

"कुठचे गुलाब?" सुंदरने अगदी संथपणें विचारलें.

"कुठचे गुलाब म्हणून काय विचारतेस? ठीक आहे. कुठचे कां असेनात, पण उमललेत एवढी गोष्ट तर खरी ना?"

"गुलाबच कां, सगळींच फुलं उमललीं आहेत. तुझा चेहरा कसा उमललेला दिसतो." सुंदरने उत्तर दिलें.

"फुलांच्या गोष्टी बोलतां बोलतां माझ्या चेहऱ्याकडे कां वळलीस?"

"म्हणजे तूं फुलांबद्दल कां बोलत होतीस?"

"नाही बरं, सुंदर. मी फुलांबद्दल बोलत नव्हतें. फुलांबद्दल बोलत असतें तर सगळींच फुलं फुललीं आहेत हें तूं कशाला सांगितलं असतंस ?"

"ठीक आहे. मला तूं शब्दांत पकडलंस. पण खरंच तुझा चेहरा इतका प्रसन्न कां दिसतो ?"

"आज तुझ्या चेहऱ्याकडे पाहून मला अगदी समाधान झालं. तुझ्या तोंडावरच्या प्रसन्नतेचं प्रतिबिंब माझ्या चेहऱ्यांत तुला दिसलं असेल."

"केवढे जाडे जाडे शब्द घालून बोलतेस तूं शारदे ! बोलणं कसं साधं असावं ?"

"केव्हापासून साध्या बोलण्याचा पुरस्कार तूं सुरू केलास ? अलीकडे बालबोधाचे अंक काढून वाचतेस वाटतें ?"

"हो वाचतें. तुला देऊं का कांही त्यांतले वाचायला ! किती मजेदार माहिती त्यांत तुला मिळेल !"

"मला जी माहिती पाहिजे होती ती मिळाली."

"कोणती माहिती तुला पाहिजे होती ?"

"माझी एक मैत्रीण आहे. सुंदर आहे मोठी. तिचं नांव पण सुंदर आहे. तिचं ठरणारसं वाटत होतं तें आता ठरणार अशी खात्री झाली."

"पण यांत तुला माहिती काय मिळाली ?"

"ती माझी मैत्रीण अगदी थांग लागूं देत नव्हती. आता आपोआप बाहेर आलं."

"पण तुझ्या त्या मैत्रिणीला तरी थांग होता कां अगोदर ?" सुंदरने गंभीरपणें विचारलें.

"म्हणजे तिलाही माहीत नव्हतं !"

"असं शक्य आहे."

"पण माझा या गोष्टीवर विश्वास नाही. जी गोष्ट आम्हांला दुरून दिसत होती तिचा तिला थांग नव्हता असं होईल तरी कसं ?"

"गाढ झोप लागलेल्या माणसाला दिवस उगवला तरी त्याची शुद्ध नसते. त्याच्याजवळचें बिछाने उचलून ठेवले, आणि कोणी करवाऱ्याला आला तरी त्याला दाद नसते."

"खरं आहे, पण आता डोळ्यांतली झोप गेली ना?"

"झोप गेली, पण झापड बसली आहे."

"म्हणजे, आता एका गोष्टीशिवाय दुसरं कांही दिसत नाही?" शारदेने विचारलें.

सुंदर हसली; अगदी मनापासून हसली आणि शारदाही हसूं लागली. मग सुंदर म्हणाली, "तुझं मत काय आहे?"

"माझं मत काय आहे? पण कशाबद्दल माझं मत तूं विचारते आहेस? हां, समजलं. माझं मत असं आहे कीं, तूं त्या दुष्ट माणसाचं नांव बाळासाहेबांना सांगावंस; म्हणजे त्याचा ते ताबडतोब बंदोबस्त करतील."

"तें मी तुला विचारलं?" सुंदर थोडीशी रागावून म्हणाली, "आणि माझ्या गोड विचारांत तूं हा मिठाचा खडा काय म्हणन टाकलास?"

"चुकलं गडे. पण तूं अशी संदिग्ध बोलत सुटलीस, तेव्हा मला तसं बोलावं लागलं. सांग ना. मग कशाबद्दल तूं माझं मत विचारलंस? जरा मला समजेल अशा स्पष्ट शब्दांनी सांग म्हणजे बरं."

"तुला सगळं माहीत आहे."

"पण मला कांही माहीत नाही!"

"काय, तुला माहीत नाही?"

"तुझं आणि बाळासाहेबांचं हें काय प्रकरण आहे, मला कांही माहीत नाही."

सुंदर आपल्या मैत्रिणीकडे तीव्र नजरेने पाहूं लागली. "पण आमचं कांही प्रकरण आहे, हें तरी कशावरून?"

"बाकी हें कांही बरं नव्हे." शारदा म्हणाली,

"काय बरं नव्हे?" सुंदरने विचारलें.

"बाळासाहेबांसारख्या तिऱ्हाइतानं तुझी इतकी पंचाईत करणं बरं नव्हे. जरा रीतीभातीला सोडून नाही कां होत हें?"

"म्हणजे! त्यांना रीतभात नाही, असं कां तुझं म्हणणं! तूंच त्यांची किती तरी स्तुति करीत होतीस. आणि आता त्यांना रीतभात नाही म्हणतेस? शर्थ झाली तुझी शारदे!"

"रीत कसली आणि भात कसली? आणि तुला अशी घरीं भेटायला बोलावणं तरी त्यांना शोभतं कां? लोक म्हणतील तरी काय?"

"लोक वाटेल ते म्हणोत!" सुंदरच्या नेत्रांत अश्रु आणि क्रोध दोन्हीही चमकूं लागले. "मला त्यांनी कांही एकटीला बोलावलं नाही. तुला बोलावलं होतं. आणि मोहन पण तिथं होता."

"म्हणून काय झालं?" शारदेने विचारलें.

"तुझ्याशीं वाद करण्यांत कांही अर्थ नाही. तूंच जर सरळ गोष्टीचा भलता अर्थ करूं लागलीस, तर लोक काय म्हणतील, याची [illegible] करायला नको. तूं असं बोललीस तर लोक वाटेल तें बोलतील."

"सुंदर, तूं माझ्यावर रागावलीस?" शारदा म्हणाली.

"रागावूं नको तर काय करूं?" सुंदरने विचारलें. "तुला असं बोलणं शोभत नाही. पुन: बाळासाहेबांसारख्याबद्दल असं बोलणं तर मुळींच शोभत नाही."

"मी आपली चेष्टा केली. तूं बाळासाहेबांची एवढी कैवारी आहेस हें मला काय माहीत? अगोदरच मला सांगितलं असतंस म्हणजे मी त्यांची निव्वळ स्तुतीच केली असती. आणि आहेच तसा तो उत्तम माणूस. खरोखर तुझा त्यांचा जोडा कसा उत्तम शोभेल."

"वात्रट आहेस तूं!" सुंदर शारदेकडे रागाने पहात होती, ती आता प्रसन्नतेने पाहूं लागली.

"आता कसे गुलाब उमलले?" शारदा हसत हसत आपल्या मैत्रीणीला, "एकूण तुझं आणि बाळासाहेबांचं नुसतं प्रकरण नाही, तर ग्रंथ होणार आहे. ही चालली आहे, ही प्रस्तावना म्हणायची!"

" दृष्टांत द्यायला तूं बरीच शिकली आहेस!" सुंदर म्हणाली.

" तुझ्या परिणाम!" शारदेने उत्तर दिलें.

" माझी अगदी पहिल्यापासून इच्छा होती की, तुला बाळा-साहेबांसारखा नवरा मिळावा."

" मग आता काय झालं!" सुंदरने विचारलें.

" काय झालं तें तूं मला धड सांगत नाहीस, तर मला कसं समजणार?"

" ठीक आहे. तुला समजेल असं सांगतें. बाळासाहेबांनी आपली पत्नी होण्याबद्दल विचारलं आहे."

" आणि तूं काय सांगितलंस?"

" मीं सांगितलं की, हा जो ससेमिरा माझ्या पाठीमागं लागला आहे, तो निकालांत काढल्याशिवाय मी होय म्हणणं म्हणजे आपली जाबाबदारी दुसऱ्यावर ढकलण्यासारखंच आहे."

" पण त्यांची तूं बायको झालीस, म्हणजे तुझी सगळीच जबाबदारी त्यांच्यावर."

" तें जरी खरं असलं, तरी आहे या गोष्टीचा निकाल लागल्या-खेरीज मी होय म्हणणं म्हणजे त्यांना संकटांत घालण्यासारखं आहे."

" मग, तूं होय म्हणाली नाहीस तर?"

" वेडी कुठली! मला नाही म्हणणं शक्य कां होतं? कारण—"

" कारण काय?"

" अशी प्रत्येक गोष्ट अगदी उघडी केल्याशिवाय तुला कशी समजत नाही ग? कारण उघड आहे. कारण मला जरी आज उमगलं-असलं तरी माझ्या अंत:करणाला तेव्हाच समजलं होतं. ज्या संध्या-काळीं त्यांच्या बंगल्यांत त्या स्थितींत मी गेलें त्या वेळीं त्यांचा गोड स्वभाव आणि सभ्यपणाची वागणूक यांनी मला तिथं परकेपणा कसा तो वाटला नाही. आणि त्यापुढं त्यांनी आपणां सर्वांना ज्या प्रकारें वागविलं त्यावरून त्यांचं अंत:करण किती उदार आहे हें सिद्ध होतं.

माझ्याबद्दल भलभलतीं पत्रं येऊन सुद्धा त्यांच्या मनाची थोडी सुद्धा चलबिचल झाली नाही."

"त्याचं कारण त्यांचं तुझ्यावर प्रेम बसलं होतं."

"पण अविचारानं प्रेम बसण्याइतके कांही ते लेच्यापेच्या वृत्तीचे नाहीत."

"पण तुझ्यावर प्रेम बसलं यांत अविचार कसला झाला? आपलं रूप जरी आपल्याला दिसलं नाही तरी दुसऱ्यांना दिसतंच. आता गडे सुंदर, सर्व कांही त्यांना सांगून टाक आणि या प्रकरणाचा निकाल त्यांच्या सहाय्याने लाव. त्यांना आता सर्व कळावं असा तुझ्या-संबंधीं अधिकार आला आहे. आणि त्यांचं साहाय्य तुला आता सत्तेनं मिळेल."

"तें सर्व खरं आहे;" सुंदर म्हणाली, "जरूर पडल्यास त्यांचं साहाय्य मी घेईनच; पण मला एकदां एक प्रयत्न करायचा आहे. तो जर निष्फळ झाला तर त्यांचं साहाय्य घ्यावंच लागेल. आणि जर सफल झाला तर आपोआपच सर्व गोष्टींचा निकाल लागेल. मी केलं आहे तर मी भरलं पाहिजे."

शारदा कांही बोलली नाही. कांही वेळ ती विचार करीत होती. सुंदर करणार तरी काय, याचा तिला उमज पडेना. मग ती म्हणाली, "पण, बाळासाहेब आणि मोहन यांचा तर त्याचा पत्ता लावून त्याला शिक्षा करण्याचा प्रयत्न चाललेलाच आहे."

"तो चालू द्या. पण मी अगदी निरुपाय होईपर्यंत कोणाच्याही सहाय्याशिवाय हें कार्य होतं का पाहणार; नाही तर ते आहेतच."

"होय, ते आहेतच. शारदा हसली आणि पुनः त्या पूर्वीच्या गोष्टीकडे वळल्या.

## प्रकरण बाविसावें

# शत्रूशीं गाठ

शामराव आणि त्याचे जिवश्चकंठश्च मित्र बोलत बसले होते. दोघांच्याही तोंडांत सिगारेट पेटलेल्या होत्या. शामराव इझीचेअरवर पडलेले होते. आणि त्यांचा मित्र टेबलाजवळच्या खुर्चीवर बसलेला होता. दोघेही मोठया आनंदांत दिसत होते.

"परवांचा बार फार नामी उडाला." शामराव म्हणाला. नाटकांतला उपनायकच खलनायकाची भूमिका करायला तयार झाला आहे. मोहनच आमच्या पक्षाला येऊन मिळाला. तो, बाळासाहेब आणि सुंदर यांच्याशीं वरपांगीं स्नेह दाखवतो. पण आंतून अगदी त्यांचा द्वेष करतो. आणि बरोबर आहे, करण सुंदर आता कांही त्याला मिळणें शक्य नाही. तेव्हा कोणत्याही उपायानं त्यांची फजिती व्हावी एवढीच त्याची इच्छा असली तर त्यांत नवल नाही."

शामरावाच्या मित्रानें तोंडांतील सिगारेट काढून फेकून दिली. दुसरी तोंडांत धरली व ती संथपणें पेटविली. थोडासा धूर बाहेर काढल्यावर ती पेटलेली सिगारेट हातांत घेऊन तो म्हणाला; "शाम, मोहन मला चांगला माहीत आहे. आणि म्हणून त्याचें प्रेम किंवा त्याचा द्वेष इतक्या निकरावर येईलसं मला वाटत नाही. सुंदरकडे पाहून अगदी चीत झालेलीं जीं माणसें आहेत त्यांपैकी तो एक आहे–त्यांपैकी तो प्रमुख होता असंही म्हटलंस तरी चालेल. पण सुंदरच्या विरुद्ध कांहीही करायला तो तयार होईल ही गोष्ट मला नाही खरी वाटत !"

"तुला खरी वाटत नसेल; पण आमची अगदी बालंबाल खात्री होऊन चुकली आहे. आम्ही त्याला क्लबांत नेला तिथं सर्व मंडळी होती. सोनाजीराव आणि वासूसाहेब हे सुद्धा होते. त्यांच्या नजरेखाली त्याला चांगला घातला. आमचं घटका दोन घटका बोलणं झालं आणि हा माणूस आमचा, असा तो निघून गेल्यावर सोनाजीरावांनी निर्णय दिला."

" सोनाजीरावांनीच निर्णय दिला असेल तर बोलणं नाही. पण मी मोहनला ओळखतों आणि म्हणून त्याच्या स्वभावाला ही चाललेली गोष्ट जुळून दिसत नाही एवढं मला स्पष्टपणं सांगितलं पाहिजे."

" अरे, माणसाचा स्वभाव प्रसंगानं बदलतो. ` ^ स्वभावाचं अंतरंग अगदी पूर्णपणें आपल्याला कळलेलं आहे असं कोणीही म्हणण्याचें कारण नाही. शिवाय माणसांच्या बाहेर दिसणाऱ्या स्वभावानं शेकडों माणसं वर्षानुवर्षें फसतात. आमच्या बापूसाहेबांचीच गोष्ट घे. हा लेकाचा वाशा कसला हलकट आहे हें आम्हांला माहित आहे. आम्हीच त्याच्या विद्वत्तेचं फाजिल स्तोम आमच्या मतलबासाठी माजवलं आहे, हें जरी खरं तरी तो थोडाबहुत विद्वान आहे हें खरं. निदान आमच्या सारखे जे इंग्रजी तिसरी इयत्ता नापास झाल्यावर संपादक किंवा प्रकाशक, कवि किंवा ग्रंथकार बनले आहेत, त्यांच्या मानानं तो विद्येचा पर्वत आहे असंही म्हटलं तरी चालेल. त्याच्यासंबंधीं लोक काय बोलतात ? त्याची खरी वागणूक चवाठ्यावर आली तर तिला कोणी खरी सुद्धा समजणार नाही. सोनाजीराव किंवा मी—आमच्या तो तो अगदी मुठींत आहे असं म्हटलं तर कोणाला खरंही वाटणार नाही."

" मला सुद्धा खरं वाटत नाही. "

" हेंच त्याचं प्रमाण. तुलासुद्धा खरं वाटत नाही. त्याला लोक मोठा जुन्या वळणाचा समजतात, पण आमच्या मंडळींत तो बसला म्हणजे तो कसलीं वळणं गिरवीत असतो, हें प्रत्यक्ष पाहिल्यावाचून समजणार नाही. तेव्हा सांगण्याचं तात्पर्य काय की, मोहनबद्दल तुझी झालेली समजूत चुकीची असणं अगदी शक्य आहे."

" ठीक आहे. हा वाद जास्ती करण्याचं तुलाही कारण नाही आणि मलाही कारण नाही; जशी मोहनबद्दल मला शंका आहे, त्याचप्रमाणे तूं आणि सोनाजीराव यांबद्दल मला पूर्ण खातरजमा आहे. तुमच्या हातून चूक होईल, ही गोष्ट शक्यच नाही. बरं, तें आर्टिकल केव्हा येणार ? "

शामराव आपल्या मित्राकडे पाहून हसूं लागला. आणि कांही वेळाने म्हणाला, " तान्याच्या खास विनंतीवरून तें आर्टिकल प्रसिद्ध

करण्याचं तूर्त तहकूब केलं आहे."

"तान्यानं त्या दिवशीं फटके खाल्ले त्यानं तो अगदी गडबड-लेला दिसतो. पण या अशा कामांत गडबडून कसं चालणार ?"

"कसं चालणार आणि काय चालणार ? पण त्यानं अगदी गयावया करून सांगितलं तेव्हा म्हटलं ठीक आहे. आपण थांबू आठ पंधरा दिवस. शिवाय या आर्टिकलमधल्या बहुतेक गोष्टी खोटया आहेत हें तुलाही माहीत आहेच."

"हो. मलाही आहे आणि तुलाही माहीत आहे. पण खऱ्या गोष्टींचा आणि वर्तमानपत्रांतल्या आर्टिकलचा संबंध काय ? निदान तुला तरी हें कळलं पाहिजे. तूं या धंद्यांत प्रत्यक्ष आहेस. खऱ्या गोष्टी लिहून तुझ्या पत्राची का झाली असती ख्याती ? आणि कोणी खऱ्या गोष्टी लिहिल्या तरी त्या वाचतो कोण ? अरे शाम्या, वाचकांना सुद्धा माहीत असतं की, या लिहिलेल्या गोष्टी खोटया असतात, आणि म्हणूनच ते मिटक्या मारून वाचतात. असो. पण बुवा तें आर्टिकल आलं पाहिजे. तें आल्याशिवाय मजा नाही होणार."

"मजा कोणाची होणार ?" शामरावाने विचारलें. "तान्याची मजा जशी झाली तशी माझी मजा होणार आणि ती तूं किंवा तुझ्या-सारखे पाहणार !"

"तुझी कशी मजा होणार !"

"त्या बाळासाहेबानं तान्याला सांगितलं की जर कांही भलता-सलता मजकूर प्रसिद्ध झाला तर तुझी आणि त्या एडिटरच्या पाठीचीं धिरडीं लोळवीन."

"हट् शाम्या ! आणि या दबकावणीला का तूं भ्यालास ?"

"त्रिंबकरावाला जाऊन विचार, म्हणजे ही नुसती दबकावणी आहे का प्रत्यक्ष घडून येणारी गोष्ट आहे हें तुला समजेल."

"एकूण तूं भ्यालास ! तूं एवढा भित्रा आहेस हें मला माहीत असतं तर—"

"तर काय लेका ? तर काय केलं असतंस ?"

"तुझ्यापेक्षा जरा दमदार एडिटर पाहिला असता हें काम साधायला !"

"अस्सं काय? काम तुझं साधायचं आणि चाबकाचे फटके आम्ही खायचे! खासा न्याय! तूं रे कां जात नाहीस बाळासाहेबाकडे! खरं पाहिलं तर एक वेळ ती तुझ्यावर अगदी भाळून गेलेली होती. तिचीं पत्रं तुझ्याजवळ आहेत. तूंच कां नेऊन दाखवीत नाहीस त्या म्हसोबाला?"

तो हसला. मित्र हसला. एके काळीं त्याच्या हसण्याने चेहऱ्याला शोभा येत असे. आता त्या हसण्याने त्याचा चेहरा दुष्ट दिसूं लागला. तो म्हणाला, "शामराव, कोणाला बोलतो आहेस तूं हें?"

"तुला! तुला बोलतों आहें! हजारपांचशें रुपये धंद्यासाठी दिलेस म्हणजे तूं कांही माझा मालक होत नाहीस, का मी तुझा नोकर होत नाही. तूंच जा त्या बाळासाहेबाकडे! तूं मला थापा देत होतास, की बाळासाहेबाचीं कुलंगडीं बाहेर काढतों म्हणून? काय काय कुलं· गडीं तुला त्याचीं समजलीं आहेत?"

"मला कांही समजलीं नाहीत. आणि त्याचीं कांही कुलंगडीं आहेत असं दिसत नाही. लेकाचा सिगारेट सुद्धा पीत नाही; मग बाकी कांही प्यायची गोष्टच नको! असल्या तुळशीपत्रासारख्या माणसाचीं कुलंगडीं तरी काय मिळणार? पण हें सुंदरीचं प्रकरण हेंच मोठं कुलं-गडं नाही का बाळासाहेबाचं?"

"यांत कुलंगडं काय? उद्या तो तिच्याशीं लग्न लावतो म्हणेल, म्हणजे तुझं हें कुलंगडं निकालांत आलं."

"अरे, तो लग्न कसलं लावतो त्या पोरटीबरोबर, माझीं एकदा पत्रं वाचायला मिळाल्यावर! म्हणून म्हणतों, तें आर्टिकल एकदा प्रसिद्ध कर म्हणजे त्याच्या डोक्यांत संशयाचं बीजारोपण होईल आणि संशय बळावला की तो त्या पोरीला दहा हात दूर ठेवील."

"पण तुझीं पत्रं त्याला मिळणार कशीं? तूंच कां नेऊन देत नाहीस त्याला?

"मी दिलीं असतीं पण थोडी अडचण आहे त्या मार्गांत. म्हणून तर तुला सांगतों आहे की तूं छापून काढ."

"फार चांगलं सांगतो आहेस. पाहुण्याच्या हातून साप मारायची ही युक्ति बरी आहे तुझी! पण कायरे, त्या सुंदरची तुझी खरोखरच दोस्ती होती, कां ही तुझी सगळीच लफंगेगिरी आहे?"

"तुला कसं वाटतं?"

"मला काय वाटायचं आहे! तूं लफंगा आहेस हें मला वाटायचं कारण नाही; कारण मला तें प्रत्यक्ष माहीत आहे. खोटींनाटीं पत्रं बनावट करायची ही कलाही तुझ्या ओळखीची आहे. आता फक्त चालू बाबतींत तुझी लफंगेगिरी कितपत पसरली आहे एवढं पाहायचं."

"मग, मी काय सांगतों तें ऐक. चालू बाबतींत मला दुष्ट म्हणून पाहिजे तर म्हण, पण मला लफंगा म्हणूं नकोस; सुंदरचीं जीं पत्रं माझ्याकडे आहेत तीं खरोखरच सुंदरनं लिहिलीं आहेत. आता त्या पत्रांचे पांचांचे पंचवीस करण्यासाठी मी आणखी कांही पत्रं तशाच धर्तीचीं लिहून ठेवलीं आहेत. पुनः ती छापलीं, तर निनांवींच छापायचीं आहेत. कांही झालं तरी कांही पत्रं अस्सल आहेत."

"ठीक आहे. तूं सांगतोस तेव्हा तसंही असेल. पण सध्या छपाई खातं बंद हो!"

"आहारे शाहाण्या! ही तर या प्रकरणासंबंधीं लेखांचा भडिमार करायला उत्तम संधि आहे. आणि हें पाहा, शामू, माझा त्या पोरटीने चारचौघांत इतका अपमान केला आहे की त्याचं उट्टं काढल्याशिवाय मला समाधान होणार नाही."

"मग तिला चारचौघांत गाठून तिची तूं फजिती कां उडवीत नाहीस."

"तीच तर पंचाईत आहे रे! जायला मला जमत नाही. जिथं चारचौघे सभ्य लोक जमतात, तिथं मला जातां येत नाही. आणि जिथं तुझ्यासारख्यांची चौकडी जमते तिथं ती येण्याचा संभव नाही."

"आणि तिला आम्ही धरून आणली तर ?"

"तुमच्यासारख्यापुढं तिची फजिती करणं–चार चौघांत म्हणजे सभ्य लोकांत फजिती होत नाही."

"एकूण आम्ही असभ्य—?"

"ए, ए, शामराव ! भलतंच बोलूं नकोस. तुला तूं स्वतः तरी सभ्य समजतोस कां ? खरं बोल हां, नेहमीसारखा बोलूं नकोस."

"काय रे, शहाण्याच्या कांद्या ! तुझं नांव, पत्ता बाळासाहेबाला जाऊन मी सांगितला तर काय होईल ! "

"काय होईल ! तुला चाबकाचे फटके खावे लागतील ! "

"पण तुला काय होईल ? "

"मला काय होईल याची पंचाईत तुला नको. मला काय होईल त्याचा विचार मी सोडून दिला आहे. मला गोत्यांत आणून तुझं पत्र चालेल का ? "

"उंः ! माझं पत्र बंद पडण्याचं कारण नाही. तुझ्या जिवावर का माझं पत्र चाललं आहे ? पण तुझा भांडायचा का आज विचार आहे ? "

"माझा भांडायचा विचार नाही. पण माझं सांगणं तूं ऐकत नाहीस."

"तूं कांही माझा मालक नव्हेस,"

"मी तुझा मित्र आहें. मित्रानं मित्राला साहाय्य केलं पाहिजे. त्या बाळासाहेबाची मला पर्वा नाही. सुंदर—सुंदर "

"काय रे, ती पोरगी तर चांगली शहाणी आहे म्हणतात. ती तुझ्यावर थोडे दिवस तरी कशी रे भाळली—तूं म्हणतोस तें, म्हणून मी आपला विचारतों."

"बाबा, भाळण्याचें शास्त्र अगदी निराळें आहे. ती भाळली यांत तिचा शहाणपणा आहे. आणि तो शहाणपणा तिच्या ठिकाणीं आहे, म्हणूनच तर मला तिची चिरड आली आहे."

"पण जेव्हा ती भाळली होती तेव्हाचा कांही पुरावा तुझ्याजवळ नाही का?"

"तिचीं पत्रं!"

"पण पत्रांशिवाय आणखी कांही—"

"आणखी कांही नाही. पत्रांत विचार व्यक्त करण्यापलीकडे दुसरं कांही नाही. आणि म्हणून त्या पत्रांतून जितकी प्राप्ति करून घेतां येईल तितकी करून घेतली पाहिजे."

"पण काय रे, तूंही तिच्यावर भाळला नव्हतास का?" शामरावाने विचारलें.

"होय, मी भाळलों होतों; पण तिच्या रूपावर भाळलों होतों. अद्यापीही तिच्या रूपाची अभिलाषा मला आहे. पण रूपाच्या पलीकडे मी स्त्रियांच्या बाबतींत कधीच पाहत नसतों आणि खरंच सांगायचं तर कोणीच पाहत नसतो."

"आत्मवत्सर्वभूतानि यः पश्यति स पश्यति!" शामराव म्हणाला.

"कांहीही म्हणा. जें खरं तें स्पष्टपणें मी बोललों आणि तिच्या रूपावर मी भाळलों यांत नवल नाही. कोणालाही मोहनी घालण्यासारखं तिचं रूप आहे. शिवाय तीही माझ्यावर भाळली होती. तेव्हा माझी आकांक्षा वाढली तर त्यांत नवल नाही. माझं तिचं लग्नही जमलं असतं."

"मग बिघडलं कुठं?"

"बिघडलं कुठं! सर्वच बिघडलं! एक दिवस मी सिगारेट ओढीत होतों; तिनं हसत हसत सिगारेट काढून टाकण्याबद्दल मला सांगितलं. मी म्हटलं, "ही सिगारेट बिचारी अगदी गरीब वस्तु! तिच्यावर तुझा राग कां?" पुढं एक दिवस मी नाटकाला गेलों होतों. तीही म्हणे त्या दिवशीं आली होती. आणि त्या दिवशीं माझ्याजवळ—तुला आता जास्त कांही सांगत नाही पण माझ्याजवळ—कोणी भलतीच बाई होती आणि आम्ही दोघांनी जरा जास्ती घेतली होती, असं सुंदरला कोणीं सांगितलं आणि तें खरं असावं अशी म्हणे, माझ्याकडे

पाहून तिची खात्री झाली. त्यावरून तिची मर्जी उलटली. एकामागून एक दुसऱ्या गोष्टी घडल्या. आणि पुढं माझी परीक्षा नापास झाली. मी भलत्या संगतीला लागलों.—"

"अरे थांब! थांब! भलत्या संगतीला म्हणजे आमच्या संगतीला ना? त्याला भलती संगत म्हणतोस का? असो. ही पोरगी अगदी खुळी दिसते. पुरुषाच्या अंगीं असणारे सर्व सद्गुण तुझ्या अंगीं आहेत हें पाहून तिला समाधान व्हावं. वेडी कुठली—"

"वेडी असो, शहाणी असो! तिचा माझा स्नेह असता तर मी असा तुमच्यासारख्या हलकटांच्या संगतीला लागलों नसतों."

"एकूण आम्ही हलकट आणि तूं जड! अरे बोलतांना कांही विचार कर. समज, सुंदर या ठिकाणीं आली तर तूं काय रे करशील?"

"मी काय करीन? अगोदर तुझे डोळे गच्च बांधून टाकीन! तुझ्यासारख्या कावळयाच्या दृष्टीला ती पडतां उपयोगी नाही. पण ती इथं येणं शक्य नाही!"

दारावर कोणी कडी वाजविली. शामराव आणि त्याचा मित्र हे एकमेकांकडे पाहूं लागले. मग शामराव इझीचेअरवरून उठला आणि त्याने दाराची कडी काढली आणि दार उघडल्याबरोबर त्याचा मित्र विजेचा झटका बसल्याप्रमाणे चट्दिशीं उठून उभा राहिला. तो दारापर्यंत गेला व त्याने शामरावास एकीकडे सारलें आणि आश्चर्यचकित मुद्रेने तो म्हणाला, "सुंदर?" "होय! मीच!" सुंदरने उत्तर दिलें. कारण आंत आलेली व्यक्ती सुंदर होती. तिने आंत आल्यावर दार लोटून घेतलें. शामरावाने लागलीच अदबीनें इझीचेअर पुढे केली व तो म्हणाला, "आपण बसा." सुंदर बसली. दोघेही उभे होते.

---

प्रकरण तेविसावें

# झुंजाची सुरवात

ते दोघेही इतके आश्चर्यचकित झाले की कांही वेळ काय बोलावें हें एकालाही सुचेना. सुंदरने त्या वेळीं त्या ठिकाणीं येणें ही गोष्ट नुसती अनपेक्षित नव्हती तर अनिष्टही होती. शिवाय जरी ते दोघे पुरुष होते आणि वेळीं प्रसंगीं वाटेल तें करण्याला मागे पुढे पहावयाचे नाहीत असे पुरुष होते तरी तिच्या धीटपणाने सुरवातीला कांही वेळ का होईना ते भ्याले हें खोटें नाही. शामराव चांगला निगरगट्ट बदमाष होता पण लोकांत वागतांना सभ्यपणाचा आविर्भाव आणण्याचा त्याला सराव होता, त्यामुळे साहजिकच त्याने सुंदरला बसण्यासाठी खुर्ची ताबडतोब पुढे केली; पण ज्या मुलीवर आपण काहूर उठविण्याचें ठरविलें व ज्या गोष्टीला आपण थोडीबहुत सुरवातही केली तिने याप्रमाणे बेलाशक आपल्या खोलींत यावें यामुळे तो प्रथम तरी जरा गडबडला यांत शंका नाही. सुंदरला पाहातांच त्याने तोंडांतून सिगरेट काढून टाकली असें म्हणण्याच्या ऐवजीं ती त्याच्या तोंडांतून गळून पडली असें म्हणणें अधिक बरोबर होईल. त्याचा मित्र तर सुंदरकडे कांही वेळ पाहत उभा होता. याप्रमाणे थोडा वेळ गेला; आश्चर्याची पहिली भरती ओसरली. शामराव टेबलाजवळच्या खुर्चीवर जाऊन बसला. त्याचा मित्र टेबलाला टेकून उभा राहिला. मग तो सुंदरला विचारतो, " हा अलभ्य लाभ कोणत्या कारणामुळे आम्हांला होत आहे ? पण आपण मला भेटायला आलांत, कां एडिटरसाहेबांना ? "

सुंदरने त्याच्याकडे एकदा तुच्छतादर्शक मुद्रेने पाहिलें. मग ती शामरावाकडे वळून म्हणाली, " शामराव एडिटर ते आपणच का ? "

" आता माझ्या मित्राने आपल्याला सांगितलें त्यावरून आपल्या लक्षांत आलेंच असेल, " शामरावाने उत्तर दिलें. " आपण अगदी

अनपेक्षितपणे आलांत त्यामुळे आल्याबरोबर योग्य शब्दांनी आपलें स्वागत करण्यास मी विसरलों त्याची माफी असावी. आपल्यासाठी चहा मागवूं का ? ”

सुंदर हसून म्हणाली, “ मला चहा नको. मी तुम्हांला भेट-ण्यासाठी आलें होतें ही गोष्ट खरी. पण येथे हे आपले मित्र म्हणून म्हणतां त्यांचीही भेट होणार आहे ही नव्हती मला कल्पना.”

“ मग मी येथे असल्यामुळे अडचण नाही ना होत तुमची ? ” त्याने विचारलें.

“ मुळीच नाही;” सुंदरने उत्तर दिलें. “तुम्ही असल्यामुळे नवीन अडचण कांही होणार नाही. आणि तुम्ही भेटलांत हेंही ठीक झालें. यांना तरी मी तुमच्याबद्दल विचाणार होतेंच. आता तुम्हांलाच काय विचारायचें तें विचारीन.”

“ पण त्याचें उत्तर मिळेलच अशी खातरी नसावी.”

“ ही सूचनाही करण्याची जरूरी नाही. विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें मिळत नाहीत आणि प्रश्न विचारले नसले तरी उत्तरें येतात. कोणत्या तरी मार्गाने दुसऱ्याला पीडा करणें हा दुष्टांचा स्वभाव आहे. त्याला इलाज नाही.”

“ असें काय ? ” त्याने विचारलें; “ सुंदर, तूं येथे एकटी आली आहेस हें तुझ्या लक्षांत आहेसें दिसत नाही.”

“ तें माझ्या लक्षांतून जाण्याला कांहीही कारण मला या ठिकाणीं तरी दिसत नाही.”

“ या ठिकाणीं, असें कां म्हणतां ? ” शामरावाने विचारलें. “ तुम्ही माझ्याकडे आलां आहांत आणि येथे कोणालाही कसलाही धोका नाही.”

“ तुम्ही म्हणतां हें खरें असावें म्हणजे ठीक होईल.” सुंदर म्हणाली. “ अर्थात्, मी ज्या वेळीं येथे येण्याचें ठरविलें त्या वेळीं हें ठिकाण आणि येथे येणारीं माणसें कोणत्या तऱ्हेचीं असतील हें लक्षांत घेऊनच ठरविलें,”

"हें फार चांगलें केलेंस, सुंदर." शामरावाचा मित्र म्हणाला. "तशी तूं शहाणी आहेस. पण येथे येण्यांत तुझा शहाणपणा मला दिसत नाही. येथे मी भेटेन ही अर्थात् तुझी अपेक्षा नव्हती."

"पण तुमची अनपेक्षित भेट झाली यांत कांहीच बिघडलें नाही. एकादा रानांत शिरल्यावर हिंस्र पशू किती भेटतील याचा नियम नाही हें रानांत शिरणारा जाणून असतो."

"सुंदर, तूं रानांत शिरलेली नाहीस, तूं आडरानांत शिरलेली आहेस. हा शामराव माझा अगदी जिग्गरदोस्त आहे. त्याच्या बाह्य संभाविपणावर तूं जाऊं नकोस. तूं आडरानांत शिरलेली आहेस हें विसरूं नकोस."

"तुमचे ते जिग्गरदोस्त आहेत हें सांगितल्यानंतर ते संभावित नाहीत हें सांगण्याची जरूरी नव्हती."

"काय मी संभावित नाही?" शामरावाने विचारलें. "या गृहस्थाची तुमची काय भानगड आहे तें मला माहित नाही. पण हा मजसंबंधीं जें जें सांगेल तें खरें मानूं नका. मी सभ्य आहें; संभावित आहें. आज एका मोठया वर्तमानपत्राचा संपादक आहें. माझ्या नांवावर दोनतीन ग्रंथही प्रसिद्ध झालेले आहेत."

"याच्या नांवावर प्रसिद्ध झालेले आहेत, बरें का सुंदर!" शामरावाचा मित्र म्हणाला. "पण अर्थात् ते याने लिहिलेले नाहीत."

"बस्स, फाजीलपणा बंद कर." शामराव त्याच्या अंगावर ओरडून म्हणाला. "तुम्ही माझ्याकडे आलां आहांत. तुमचें काय काम आहे तें सांगा, सुंदराबाई!"

"ताईवरून बाईवर आला, बरें, हा सुंदर! जरा काळजीपूर्वक वाग."

"माझ्याबद्दल तुम्हांला बरीच काळजी दिसते—स-स–" सुंदर थोडीशी लाल झालेली दिसली. तिचे शब्द अडखळले.

"माझें नांव घेतांना तूं अडखळलीस, सुंदर. पण माझें नांव काढतांना प्रथम तुला कांहीही भीति वाटली नाही?"

" तुमच्या नांवाची एवढी परवा मला नाही." सुंदरने उत्तर दिलें. "पण मी अडखळलें याचें कारण शरच्चंद्र हें नांव तुम्हांला कोणी कसें दिलें याचा चमत्कार वाटला हें होतें."

" तर मला कोणतें नांव तुझ्या मताप्रमाणें शोभतें ? शकार?"

" शकार मूर्ख होता. त्यामुळे त्याच्यांत दुष्टपणा या गुणाचा क्रम दुसरा होता. तुम्ही मूर्ख नाही आणि दुष्टपणा हा तुमचा सर्वांत मोठा गुण दिसतो."

" मला शहाणपणाचें तरी शिफारसपत्र देतेस याबद्दल तुझे आभार मानतों. माझ्या दुष्टपणाबद्दल एवढी तुझी खातरजमा आहे ही गोष्ट फार चांगली आहे; कारण मी जें जें करीन त्यामुळे तुला निदान आश्चर्य वाटायला नको."

" मला आतापर्यंत कोठे आश्चर्य वाटलें ? आश्चर्य वाटण्याचा काळ होता, पण तो फारच थोडा वेळ टिकला. ठीक आहे. मी येथे आलें आहे ती या एडिटर साहेबांना कांही विचारण्याकरितां. कायहो मिस्टर एडिटर, तुमच्या अंकांत नांव घातल्याशिवाय कांही मजकूर आलेला आहे तो माझ्यासंबंधाने आहे असें दाखविण्याचा तो लिहिणाऱ्यांचा उघड उघड हेतु आहे हें स्पष्ट दिसतें. आणि असला मजकूर तुम्ही जाणून बुजून प्रसिद्ध केलांत."

" सुंदराबाई, तुमची गैरसमजूत झालेली आहे." शामराव म्हणाला.

" नाही, सुंदर, गैरसमजूत मुळीच नाही. तुझी समजूत अगदी बरोबर आहे." शरच्चंद्र शामरावाकडे पाहून हसत हसत म्हणाला. " तो मजकूर तुझ्याचबद्दल होता. तसा आणखी पुष्कळ मजकूर यावयाचा आहे. तुझीं मला आलेलीं पत्रें पण प्रसिद्ध व्हावयाचीं आहेत. अर्थात् हें सर्व थांबेल—जर—"

" हें सर्व थांबलें असतें," शामराव म्हणाला, " जर तुमच्या त्या बाळासाहेबाने त्रिंबकरावांच्या हवालीं बिनधोक दोन हजार रुपये केले असते. पण त्या ऐवजीं त्याने त्याला चाबकाखाली बडवलें."

सुंदर हसली आणि तिचें हास्य पाहून शरच्चंद्र पिसाळल्या-सारखा झाला. त्याचा चेहरा तापलेला दिसूं लागला. सुंदर म्हणाली,

" त्रिंबकराव का कोण सांगकाम्या आहे. त्याच्या मागे मोठे हुषार अक्कलवान् मुत्सद्दी आहेत हें जर बाळासाहेबांना माहीत असतें तर त्यांनी कदाचित आपल्या चाबकाचा पहिला धडाका दुसऱ्यासाठी राखून ठेवला असता."

" सुंदर, तुझ्या त्या बाळासाहेबाचें कौतुक ऐकण्यासाठी आम्ही येथे आलों नाही." शरच्चंद्र जरा ओरडून बोलला.

" म्हणजे, मी बोलावणें पाठविलें म्हणून आपण येथे आलांत की काय ?" सुंदरने तीव्र दृष्टीने विचारलें.

" शामराव, " शरच्चंद्र म्हणाला, " या पोरटीची खोड मोडण्याची ही चांगली संधि आहे. त्या समोरच्या खोलींत आपण हिला कोंडून घालूं. तूं जा असाच बाळासाहेबाकडे. आणि सांग त्याला की सुंदर आपल्या अव्वल प्रियकराकडे स्वखुषीने गेली आहे. पाहिजे तर चक्षुर्वै सत्यं करून घेण्यासाठी मजबरोबर चला. "

सुंदर खुर्चीवरून हलली सुद्धा नाही. ती म्हणाली, " शरद्, मघांशीं मी तुम्हाला शकार म्हणण्याचें नाकारलें. पण तुमची अक्कल एकंदरींत शकाराच्याच जातीची दिसते."

" माझ्या अकलेची जात तुला काढण्याची जरूरी नाही. तुझ्या या सुंदर चेहऱ्याकडे पाहून लोकांनी तोंड फिरवावें एवढी व्यवस्था करण्यापुरती अक्कल माझ्याजवळ आहे. आज तूं बरी सांपडली आहेस. आता त्या बाळासाहेबाला विसर. येथून गेल्यावर त्याची तुझी गाठ पडली तरी तो तुझ्याकडे ढुंकूनही पहाणार नाही एवढा बंदोबस्त मी करतों. "

" शरच्चंद्र, तूं काय बडबडतो आहेस ? " शामरावाने विचारलें. " तूं काय सिनेमांतला नट आहेस ? शुद्धीवर आहेस का ? येथे मी आहें हें तूं विसरलास. या बाई मला भेटायला आलेल्या आहेत. माझें ऑफीस म्हणजे तुझ्यासारख्यांना वाटेल तो धुडगूस घालण्यासाठी जागा नव्हे. ही माझी संपादकीय पवित्र जागा आहे. आगरकर आणि टिळक ज्या जागेवर बसले तसली ही जागा आहे. सुंदराबाई, मी पुनः सांगतों तुम्हांला, तुमची गैरसमजूत झालेली आहे. या शरच्चंद्राकडे

लक्ष देऊं नका. येथे तुम्हांला कसलेंही भय नाही. खोटया नाटया कंडया उठवून अंक खपविणारा संपादक मी नव्हे."

"आमचा शाम खऱ्याच गोष्टी प्रसिद्ध करतो." आता स्वस्थितीवर आलेला शरच्चंद्र म्हणाला. "सुंदर, तुझ्यासंबंधीं प्रसिद्ध झालेला मजकूर केवळ खोटा नाही. तो खऱ्यासारखा दिसतो हें तुलाही कबूल आहेच. आणि यापुढे तुझीं पत्रें प्रसिद्ध होतील तेव्हा—"

"तेव्हा काय होईल?" सुंदरने विचारलें.

"सुंदराबाई," शामराव म्हणाला; "तीं किंवा तसलीं पत्रें प्रसिद्ध करण्याचा माझा मुळीच हेतु नाही. तुम्ही बेफिकीर असा."

"तुम्ही बेफिकीर असा!" शरच्चंद्र वेडावत बोलला. "सुंदर, या आपत्तींतून निघण्याचा एकच मार्ग आहे. तू माझी हो. माझ्याशीं लग्न कर. यापुढे हेंही म्हणणार नाही."

"आता तरी म्हणालांत याबद्दल तुम्हांला मी धन्यवाद देतें." सुंदर मग शामरावाकडे वळून म्हणाली, "हा मजकूर तुम्हांला कोणी पुरवला आणि हीं पत्रें म्हणतां तीं कोणी दिलीं?"

"हें संपादकीय गौप्य आहे." शामराव म्हणाला.

"ही संपादकीय थाप आहे." शरच्चंद्राने सांगितलें. "सुंदर, हा प्रश्न त्याला कशाला विचारतेस? तो अगोदर तुझ्या चेहेऱ्याकडे पाहून चीत झालेला आहे. शिवाय असें कांही अंगाला आलें की थापा ठोकीत सुटणें हा त्याचा अगदी स्वभाव झालेला आहे. तूं मला विचार. आणि विचारण्यापूर्वीच मी होऊन तुला सांगतों. तो मजकूर शामरावाला मी पुरवला. तीं पत्रें त्याच्याकडे मी देणार आहें. बोल, आता काय बोलायचें असेल तें."

"एडिटरसाहेब," सुंदर म्हणाली, "हा मजकूर छापतांना तो खरा आहे की नाही हें पाहण्याची तसदी आपण घेतली होती का? तरुण स्त्रियांच्याबद्दल असला मजकूर छापल्यामुळे काय भयंकर परिणाम होतील याचा तुम्ही विचार केला काय?"

शरच्चंद्र म्हणाला, "ते भयंकर परिणाम तुझ्या बाबतींत व्हावेत म्हणूनच तो मजकूर प्रसिद्ध केला; म्हणूनच तीं पत्रें प्रसिद्ध

व्हावयाचीं आहेत. "

" एडिटरसाहेब, तीं पत्रें मला द्या." सुंदर म्हणाली.

" बाईसाहेब," शरच्चंद्र म्हणाला, " तीं अस्सल पत्रें दुसऱ्याच्या हातांत देण्याइतका मी शकार नाहीं. प्रसिद्ध करण्याची वेळ आली की एकेका पत्राची नक्कल यांच्याकडे जाईल. पण सुंदर, माझी खात्री आहे, तीं प्रसिद्ध होण्याची वेळ तूं आणणार नाहीस."

" ती वेळ आणणें न आणणें ही गोष्ट माझ्या हातची नाही. या व्यूहाला सुरवात तुम्ही केलीत. त्यांतून बाहेर पडण्याचा रस्ता तुमचा तुम्ही काढला पाहिजे."

" शाबास ! सुंदर !" शरच्चंद्र हसून म्हणाला. " या व्यूहांतून बाहेर पडण्याला रस्ता माझा मीच काढला पाहिजे काय ? पण उद्दाम पोरटे, या व्यूहांत तूं सापडलेली आहेस, मी सापडलेला नाही."

" पुष्कळ वेळां दुसऱ्यासाठी खणलेल्या खळग्यांत आपल्यावरच पडण्याचा प्रसंग येतो. सुंदरने उत्तर दिलें.

" तें इसापनीतींतलें तत्त्वज्ञान मला सांगूं नकोस. पुष्कळ वेळां तसा प्रसंग येत असेल. पण तो या वेळीं आणि माझ्या बाबतींत येईल अशी शंका सुद्धा आणूं नकोस मनांत."

" मला त्याबद्दल शंका मुळीच नाही. माझी खात्री आहे, शरच्चंद्र."

" खात्री आहे काय ? सुंदर, तुझ्याबद्दलचा माझा क्रोध अधिकाधिक भडकत चालला आहे. समज मी येथे तुला धरली—"

" हां ! हां ! शरच्चंद्र," शामराव ओरडला; " कांही तरी भलतेंच बोलूं नकोस. हें माझें ऑफीस आहे. सुंदराताई, तुम्ही निर्धास्त असा."

" मी निर्धास्त आहेच." सुंदर हसून म्हणाली.

" ही गोष्ट हसण्यावारी नेण्यासारखी नाही, सुंदर." शरच्चंद्र बोलला. " अगोदर या शामरावाकडे तुझ्यासारख्या सुंदर चेहऱ्याच्या पोरीला निर्धास्तपणा मुळीच नाही. शिवाय शामराव हा माझा माणूस

आहे. मी जें करण्याचें मनांत आणीन त्यांत तो मला नेहेमी साहाय्य करणार. ”

“ ही अगदी खोटी गोष्ट आहे; ” शामराव म्हणाला.

“ तेव्हा बोल, सुंदर ! ” विचारलें. “ मी जर तुला येथे धरली तर तूं काय करशील ? ”

“ तुम्ही येथे या एडिटरसाहेबांना धरलें तर ते काय करतील ? त्यांनी तुम्हांला धरलें तर तुम्ही काय कराल ? तेंच मी करीन.”

“ आम्ही पुरुष आहोंत; ” शरच्चंद्र म्हणाला.

“ तुम्ही पुरुष असतां तर असले छोरटे धंदे करण्याची, निरपराध लोकांवर विशेषतः मुलींवर आणि बायाबापड्यांवर निनांवी हल्ले चढवण्याची तुम्हांला शरम वाटली असती. खानेसुमारीच्या नोंदणीसाठी तुम्ही पुरुष असाल पण तुमच्या वर्तनावरून तुम्ही पुरुष नसून पशु आहांत हें अगदी उघड आहे. ”

“ हें उघड नाही.” शामराव म्हणाला.

“ बरोबर आहे. ” सुंदरने उत्तर दिलें. “ आपल्या बाह्य संभावितपणाखाली आपलें पशुत्व झाकण्याचा तुम्ही प्रयत्न करतां. पण संभावितपणा हें तुमचें निव्वळ सोंग असल्यामुळे त्याचें आवरण गळून पडून तुमचें खरें स्वरूप बाहेर दिसण्याला मुळीच वेळ लागत नाही.”

“ ठीक आहे. आम्ही पशु आहोंत.” शरच्चंद्र म्हणाला. “आणि जर मी तुला येथे धरली आणि पशुसारखा वागलों—”

“ हें जर तर कशाला, शरच्चंद्र ? पशु हा पशूसारखाच वागणार एवढें मला समजतें. ” सुंदरने उत्तर दिलें.

“ पण पशूच्या वाटेला जाणें बरोबर नव्हे हें मात्र समजत नाही, सुंदर, तुला.”

“ पण येथे पशु माझ्या वाटेला आलेला आहे.”

“ ठीक आहे तूं म्हणतेस तें बरोबर आहे. पशु तुझ्या वाटेला आला आहे. तूं काय करणार आता ? ”

“ पशु वाटेला येऊन आंगावर आला तर काय करतात ?”

" काय करतात ? तुझ्यासारख्या शेंबड्या पोरी काय करतात ? आरडतात, ओरडतात, रडतात, घाबरतात, पायां पडतात, शरण जातात, नाक घासतात. गडकऱ्यांच्या नाटकांतल्या लतिकेप्रमाणे त्या पशूला परमेश्वरस्वरूप समजून त्याच्या पायाची बटीक होण्याला तयार होतात. म्हणे काय करतात ! सुंदर तुझा भ्रम सोडून दे."

" तुम्ही ही त्या गडकऱ्यांच्या नायिकांवरून आर्यस्त्रियांबद्दल बांधलेली कल्पना सोडून द्या. सीता कधी रावणाच्या पायां पडली नाही. द्रौपदी दु:शासनाला कांही शरण गेली नाही. आर्यस्त्रियांचें ब्रीद तुमच्यासारख्या दुष्टांना, हलकटांना समजणें शक्य नाही. स्त्रियांबद्दल तुमच्या ज्या कल्पना त्यांतच तुमचे नाटककार आणि कादंबरीकार गुरफटलेले आहेत. पण शरच्चंद्र, तें युग कधी काळीं होतें असें समजलें तरी आता नाही. आता स्त्रियांची स्थिति पूर्वीची राहिली नाही. युरप खंडांत—"

" पुरे बडबड तुझी. युरप खंडाच्या आणि सीताद्रौपदीच्या गोष्टी बोलतेस कशाला ? हें युरप नाही, हें हिंदुस्थान आहे. तूं सीता नाहीस, द्रौपदी नाहीस; चेहऱ्याच्या दिमाखावर अक्कलशून्य पोरांना आपल्याभोवतीं नाचायला लावणारी नटवी पोर आहेस. आणि सीतेला-सुद्धा रामाने टाकून दिली हें तूं विसरूं नकोस बरें, सुंदर ! "

" तुमच्यासारखे हलकट पुरुष अद्यापि जरी असले तरी त्या काळच्या रामाच्या वर्तनाची आजच्या परिस्थितींत आवृत्ति काढणाऱ्यांना आता कोणी चांगले म्हणण्याचे दिवस उरले नाहीत. ठीक आहे. मी जाण्यापूर्वी तुम्हांला एक गोष्ट, एडिटरसाहेब, सांगून ठेवतें ती नीट लक्षांत ठेवा. माझ्यासंबंधीं किंवा माझ्यासंबंधीं दिसणारा जर कांही मजकूर तुमच्या पत्रांत आला तर परिणाम नीट होणार नाही."

" सुंदर, तुझ्यासारखीच्या धमकीला भीक घालणाणा एडिटर आमचा शामराव नाही. पण तूं मलाही कांही विचारणार होतीस ? "

" मला आता वेळ नाही. " सुंदर खुर्चीवरून उठूं लागली.

"तुला वेळ नसेल पण मला आताच वेळ आहे. " शरच्चंद्र

टेबलाला टेकून होता तो सुंदरच्या खुर्चीपुढे तिच्या अगदी जवळ जाऊन उभा राहिला.

" तूं चाललीस कोठे ? येथून तुला जाऊं देईन असें वाटतें ? बैस खाली."

सुंदर उठली. तिने तीव्र मुद्रेने शरच्चंद्राकडे पाहिलें. मगती शामरावाकडे वळून म्हणाली, " एडिटरसाहेब, माझें काम झालें. जें तुम्हांला सांगायचें होतें तें सांगितलें. आता मी येतें. माझ्यापुढे ही कसली अडगळ आहे ती दूर करा आणि दरवाजा उघडून मला जाऊं द्या."

" मला अडगळ म्हणतेस काय ? " शरच्चंद्र संतापाने लाल झाला. " आज तुझी गाठ पडेल हें माझ्या स्वप्नांतही नव्हतें. आता तूं आपण होऊन येथे चालून आलेली आहेस. तेव्हा जें मी पुढे केव्हा तरी करणारच होतों तें आताच–शुभं च शीघ्रम्—" असें म्हणून शरच्चंद्राने तिचा डावा हात आपल्या उजव्या हाताने हिसडण्यासाठी धरला. त्याबरोबर सुंदरने आपला उजवा हात उचलून त्याच्या श्रीमुखांत इतक्या जोराने भडकाविली की त्याला तिरीमिरी आल्यासारखें झालें. त्याचा हात सुटला पण त्याची दृष्टि सुंदरवर क्रोधाने खिळली होती ती ढळली नाही. सुंदरपुढून तो हलला नाही. गालावरची झिणझिणी किंचित् कमी होतांच तो म्हणाला, " सुंदर, याचें प्रायश्चित्त तुला मिळेल."

"एडिटरसाहेब, मी चाललें." सुंदर दरवाज्याकडे जाऊं लागली.

शरच्चंद्र जाऊन दरवाजाला पाठ लावून उभा राहिला. तो म्हणाला, " तूं कशी बाहेर जातेस हें पाहतों."

" एडिटर, दार खुलें करा." सुंदर म्हणाली.

शामराव तिच्याकडून शरच्चंद्राकडे व त्याच्याकडून तिच्याकडे पाहूं लागला. तेव्हा ती म्हणाली, "पाहतां काय ? दार उघडा ! "

शामराव दाराकडे गेला. शरच्चंद्र अगदी घट्टपणाने उभा होता. दोघांची जुंपणार की काय असें वाटायला लागलें. पण इतक्यांत दारावर कोणी जोरजोराने ठोठावूं लागलें.

---

प्रकरण चोविसावें

# बाळासाहेब

दारावरचें ठोठावणें सारखें सुरू होतें. शामराव शरच्चंद्राकडे पाहूं लागला. शरच्चंद्र दाराला पाठ लावून उभा होता; तो हलल्याशिवाय दार उघडणें शक्य नव्हतें. कोणी तरी येऊन दार सारखें ठोठावत होतें. सुंदर निश्चल होती व शून्य दृष्टीने शामराव व शरच्चंद्र यांजकडे पाहत होती.

"शाम्या," शरच्चंद्र म्हणाला, "पलीकडच्या खोलींतून बाहेर जा आणि कोण आलें आहे पहा आणि कोणीही असलें तरी सांग की आता कोणाचीही गाठ पडणार नाही. तुझ्याकडेच कोणी आला असला तर त्याला चट्दिशीं वाटेला लाव."

"हे ज्या दाराने बाहेर पडतील त्या दाराने मला नाही का जातां येणार?" सुंदरने विचारलें.

"मी येथे उभा आहे. तूं जाऊं लागलीस तर तुला थांबविणें हें मला अगदी सोपें आहे. शिवाय तुला जातां आलें तरी या शाम्या बरोबर तुला एकटीला जाण्यांत धोका आहे."

"तुमच्याबरोबर एकटीने राहण्यांत मात्र कसलाही धोका नाही!"

"त्या धोक्यांत तूं आज कांही प्रथम पडलेली नाहीस."

"अस्सें!" सुंदर हसली.

"सुंदर, हसूं नकोस. तुला कायमची रडत बसविण्याचें मी नक्की ठरविलें आहे. आणि या सगळया दुनियेंत तुझ्या बाजूला एकही माणूस उभा राहणार नाही हें पक्कें लक्षांत ठेव."

दारावर ठोठावणें चालूच होतें. शामराव जागचा हलला नव्हता. तो म्हणाला, "शरद, एकीकडे हो. कोण आलें आहे पाहूं दे."

शरद् थोडा वेळ विचार करीत होता. त्याने सुंदरवरची दृष्टि काढल्याशिवाय मान थोडीशी वळविली व दाराची कडी काढली व दार किंचित उघडून तो म्हणाला, "कोण आहे ? कोण पाहिजे ?"

"मी आहे शरद; दार उघड."

सोनाजीरावाचा आवाज ऐकल्यानंतर दार उघडण्याखेरीज शरदला गत्यंतर नव्हतें. तो आंत येतांच दार पुनः बंद झालें. आंतील सर्व प्रकार पाहून सोन्याजी क्षणभर विस्मित झाले. ते शरदकडे बघून म्हणाले, "हें कोण ?"

"तें शरदचें एका काळचें पात्र आहे." शामरावाने उत्तर दिलें. त्याला आता उघड जोर चढला होता.

"म्हणजे तें प्रकरण काय ?"

"तेंच." शरदने उत्तर दिलें. "सुंदर, हे सोनाजीराव. हे कधी कॉलेजांत गेलेले नाहीत त्यामुळे तुझ्यासारख्या सुशिक्षित पोरीबद्दल त्यांना फार कौतुक वाटतें. कॉलेजांत जाणाऱ्या सर्व पोरी सहवासोत्तर विवाह करीत नसल्या तरी विवाहपूर्व सहवास आचरणांत आणल्याशिवाय राहत नाहीत असें त्यांचें ठाम मत झालेलें आहे."

सुंदरने नवीन आलेल्या गृहस्थाकडे निरखून पाहिलें. हास्य व कौतुक यांनी भरलेल्या दृष्टीने सोनाजीराव तिच्याकडे पहात होता. तो म्हणाला,

"माझें मत अर्थात् शरदसारख्या कॉलेजांत
दिलेल्या माहितीवरून बनलेलें आहे."

सुंदर हसूं लागली. "मग तुम्ही आणखी कां माहिती गोळा केली नाहीत ? एकतर्फी माहिती ऐकून मत बनविणें जरा चुकीचें होईल नाही ?"

"माझी तरी चूक झालेली दिसत नाही." सोनाजी म्हणाला. "तुम्ही येथे शरदला भेटायला आलांत यावरून माझें मत खरें दिसतें."

"मी शरदला भेटायला आलेलें नव्हतें. मी या तुमच्या एडिटरला भेटण्यासाठी आणि ताकीद देण्यासाठी आलें होतें."

" एकूण एकच. " खुर्चीवर बसून सोनाजीने सिगरेट पेटविली.

" शाम्या, लेका, तुझ्याकडे पोरी येऊं लागल्या अं ! एडिटर होण्यांत खरोखरच फायदे आहेत असें दिसतें तर ! "

" कसचें ! कसचें ! " शामराव म्हणाला. " आमच्या पत्रांत आलेला कांही मजकूर आपल्यासंबंधीं आहे अशी या सुंदराबाईची गैर-समजूत झालेली आहे, म्हणून त्या आल्या होत्या. "

" तो सगळा मजकूर खरा आहे व तुलाच अनुलक्षून आहे हें मी सुंदरला सांगितलें. सोनाजीराव, तुम्ही जर भलत्याच वेळीं आलां नसतां तर तिच्या गैरसमजुतीचा मी पुरा निकाल लावणार होतों. "

" बरें आहे. मी येतें आता. दार उघडा. " सुंदरने सांगितलें, सोनाजीराव हसले. त्यांनी एक सिगरेट फेकून दिली व दुसरी पेटविली. मग ते म्हणाले, "जाण्याची घाई कां करतां? आम्हांला तरी तुमची भेट कशी होणार ? तुमचा आणि शरदचा काय वांधा आहे तो मला सांगा. तुमचा तंटा मी मिटवून टाकतों. शरद वाईट माणूस नाही. "

" शरद काय आहे आणि काय नाही याची मला पुरी माहिती आहे." सुंदरने स्पष्ट उत्तर दिलें.

" तें बरोबरच आहे. " सोनाजीराव म्हणाले. " त्याचा आणि तुमचा संबंध काय आहे हें आताच शामरावाने सांगितलें. "

" अस्सें ! एकून तुम्ही या कुटाळकंपूंतले आहांत म्हणावयाचें ? " सुंदरने विचारलें.

" आधी आपण भानगडी करायच्या आणि त्या दुसऱ्यांना कळल्या आणि त्यांची चर्चा होऊं लागली म्हणजे त्यांना कुटाळ म्हणावयाचें. हा का न्याय झाला ? काय नांव तुमचें—सुंदराबाई ? "

" मी जातें. " सुंदर म्हणाली.

" तुम्ही जावें अशी शरदची इच्छा दिसत नाही. " सोनाजी बोलला.

" त्यांच्या इच्छेचा येथे काय संबंध ? "

" त्याचा तुमचा जो संबंध तोच."

शरद हसूं लागला व म्हणाला, "सुंदर, सोनाजीराव आमच्यातले आहेत. आमचे पुढारी आहेत. त्यांनी सर्व गोष्टी कशा बरोबर ताडल्या. म्हणून ते पुढारी आहेत. ते सभ्य दिसतात त्यावर जाऊं नकोस. ते आमच्यासारख्यांचे पुढारी यावरून समज काय तें. हें पहा, तुम्ही जरा पुढे व्हा. सुंदरला माझ्याशीं कांही एकांतांत बोलावयाचें आहे."

"मला एकांतांत कांहीही बोलावयाचें नाही." सुंदर संतापाने लाल झाली.

"मग आमच्यासमोर बोला. आमची हरकत नाही." सोनाजी म्हणाले.

"आम्ही ऐकण्याला तयार आहोंत. कांही तुमच्यांत तंटाभांडण असेल तर मिटवण्याची पण आम्ही खटपट करूं."

"मला यांच्याशीं कांही बोलावयाचें नाही आणि तुमच्याशीं पण बोलावयाचें नाही. मी या तुमच्या एडिटरना ताकीद देण्यासाठी आलें होतें. माझें काम झालें. मला गेलें पाहिजे."

"तुला गेलें पाहिजे काय?" शरच्चंद्र ओरडून म्हणाला. "ते बाळासाहेब वाट पहात असतील नाही? म्हणे माझें काम आहे! पण आचरट पोरटे, माझें काम झालेलें नाही आणि तें होईपर्यंत तुला येथून जातां येणार नाही."

"सोनाजीराव ना तुम्ही?" सुंदरने विचारलें. "तुम्ही वयस्क दिसतां. हा पोरकटपणा थांबवा. मला जाऊं द्या. याचा परिणाम ठीक होणार नाही हें तुम्हांला कळण्यासारखें आहे."

"तेंच तेंच पुन: पुन: बोलण्यांत काय फायदा!" शरच्चंद्राने विचारलें. "याचा परिणाम ठीक होणार नाही हें उघड आहे. तूं येथून बाहेर पडशील ती काळवंडलेल्या चेहऱ्याने बाहेर पडशील. तुझ्यासारख्या शिकलेल्या तरुण पोरीची रेवडी उडविण्याला समाज टपून बसलेला आहे. शामराव तर दीडदमडीचा एडिटर आहे. पण मोठमोठे संभावित एडिटरसुद्धा तुझें चरित्र ऐकून स्त्रीशिक्षणावर

निषेधात्माक लेख लिहितील. हवालदील झालेले नाटकवाले, पैसा मिळत नाही म्हणून कासावीस झालेले नाटककार, पोट जाळण्यासाठी कसल्या तरी गोष्टी खरडणारे कादंबरीकार यांना तुझें चरित्र म्हणजे सोन्याची खाण सापडल्यासारखें वाटेल. सुंदर, तूं मोठी हुषार आहेस पण आता माझ्या तावडींतून निसटणें मात्र तुला शक्य नाही."

"सोनाजीराव, तुम्ही यांचे पुढारी आहांत. यांना वेळींच थांबवा."

"वेळींच थांबविणारे पुढारी आमचे सोनाजीराव नाहीत. शिवाय जरी ते वयस्क दिसतात–आहेतच वयस्क–तरी आंत ते अगदी हिरवेचार आहेत. माझ्याशीं तंटा करण्याला ते भितात. नाही तर—" शरच्चंद्र थांबला.

"नाहीतर काय, शरद?" सोनाजीरावाने विचारलें. "बस्स, सुंदराबाई, तुमच्या केसालाही धक्का लागणार नाही. तुम्ही जा खुशाल."

सुंदर उठली. तिने अगदी स्पष्ट आवाजांत सोनाजीरावाकडे पाहून "थ्यांक्स" म्हटलें आणि ती दाराजवळ गेली व शरदला म्हणाली, "मी चाललें. वाट सोडा."

"वाट सोडा!" शरद म्हणाला. "बिलकुल सोडणार नाही. या सोन्याने तुझी नुसती गम्मत केली, सुंदर!"

"मी गंमत केली नाही. त्या मुलीला जाऊं द्या."

"जाऊं देत नाही." शरद रोखून त्याच्याकडे पाहूं लागला. सोनाजी शरदजवळ गेला व त्याने त्याला दारापासून दूर लोटण्याचा प्रयत्न केला. शरद आता बेफाम झाला होता. सोनाजीरावाने रिकामी लुडबूड करून हातीं आयती आलेली शिकार अशी सोडावी हें त्याला बिलकुल पसंत पडलें नाही यांत नवल नाही. तो म्हणाला, "सोन्या, या भानगडींत तूं पडूं नकोस. बऱ्या बोलाने दूर हो. नाहीतर तुला दूर करण्याखेरीज मला गत्यंतर नाही."

शामराव इतका वेळ स्तब्ध होता. तो आता म्हणाला, "शरद, जाऊं दे रे. ही पोरगी जाते कोठे? तूं [illegible] ऐक. तूं सुद्धा

आपल्या मंडळीची शिस्त मोडतां कामा नये."

"शिस्त!" शरदने विचारलें. "गैरशिस्त गोष्टी हा सोन्या बोलतो आणि तूं मला शिस्त मोडूं नकोस म्हणून सांगतोस? मला तुम्हां दोघांचीही परवा नाही. सुंदर—"

इतक्यांत दारावर पुन: ठोठावणें सुरू झालें. सुंदरखेरीज सर्व मंडळी चपापली. शामराव व सोनाजी एकमेकांकडे पाहूं लागले. दारावर धक्के बसूं लागले व दार उघडलें नाही तर आपोआप उघडणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. सर्व गोष्टी इतक्या थोडया अवकाशांत झाल्या की त्यांचें वर्णन करण्याला जितका वेळ लागतो तितकाही त्या होण्याला लागला नाही. शामराव व सोनाजी जवळच्या खोलींत शिरले व त्यांनी दार लावून घेतलें. त्याबरोबर चवताळलेल्या जनावरासारखा शरद् सुंदरकडे धावला व तिचे हात पकडूं लागला. तिनें त्याच्या हाताचा कडकडून चावा घेतला व ती मोठयाने ओरडली. इतक्यांत दरवाजाची कडी निसटली व दार लोटून बाळासाहेब आंत आले. त्या वेळीं सुंदर चावल्यामुळे शरद पिसाळल्यासारखा झाला होता व तिला मारण्यासाठी त्याने हात उगारला होता. बाळासाहेबाने आपल्या काठीने त्या हातावर जबरदस्त तडाखा दिला तेव्हा शरदने मागे वळून पाहिलें. त्याला त्या चाव्याच्या आणि काठीच्या तडाख्याच्या वेदना होत होत्या. त्याची चर्या कावरीबावरी झाली होती. पण त्याने बाळासाहेबाला ताबडतोब ओळखलें व अंगांतलें सर्व अवसान एकवटून तो म्हणाला, "बाळासाहेब, पाहिजे असेल तर ही माझी उष्टी पत्रावळ घेऊन चला." बाळासाहेब काय उत्तर देतात याची सुंदर उत्सुकतेने वाट पाहत होती. पण ते कांही बोलले नाहीत. शरदचे शब्द कानावर पडतांच त्यांनी काठी पुन: उगारली आणि तिचे आडवे तिडवे तडाखे किती झाले याचा हिशेब केवळ शरदच्या अंगाला माहीत. बाळासाहेबाची मुद्रा या वेळीं भयाण दिसत होती. क्रोधाने त्याचें देहभान गेलें होतें. मार खाऊन शरद खाली पडला. प्रतिकार करण्यालासुद्धा बाळासाहेबाने त्याला संधि दिली नाही. मग ते म्हणाले, "सुंदर, तूं येथे कशासाठी आली होतीस?"

"त्या खोलींत दोन गृहस्थ आहेत. त्यांतील एडिटर आहेत त्यांना विचारा." बाळासाहेबांनी त्या खोलीच्या दारावर एक तडाखा दिला व 'बाहेर या' म्हणून ओरडून सांगितलें. सोनाजी व शामराव यांची पांचावर धारण बसली होती. मोठयाने बोलण्याचीही त्याना चोरी झाली बाहेर येण्दाला ते भीत होते. शरदला बसलेल्या तडाख्यांचा आवाज त्यांच्या कानांत घुमत होता. ते बाहेर येत नाहीत असे पाहून बाळासाहेब म्हणाले, "सुंदर, येथे कशाला आली होतीस?"

"यांच्या पत्रांत मजबद्दल जो मजकूर आला आहे त्याबद्दल या एडीटरला ताकीद देण्यासाठी." सुंदरने संथपणाने उत्तर दिलें.

"हा कोण? हाच तुझा शत्रु काय?" शरदकडे वळून बाळासाहेबांनी विचारलें व सुंदरने संमतिदर्शक मान हलविली. बाळासाहेबांनी खोलीच्या दारावर लाथ मारली व तो म्हणाला, "बऱ्या बोलाने बाहेर या नाहीतर तुमच्या या खोलीला कुलूप ठोकून नंतर पोलीसला बोलावतों.

सोनाजीराव शहाणा होता. दार उघडून तो बाहेर आला. याच्या पाठीमागून शामराव छपत छपत बाहेर पडला. बाळासाहेबाने विचारलें, "तुमच्यांतला एडिटर कोण?"

शामरावाच्या अंगांत कापरें भरलें. त्याला बाळासाहेब म्हणाला, "एकूण तुम्ही शामराव एडिटर. ही मुलगी तुम्हाला ताकीद द्यायला आली होती ही गोष्ट खरी आहे काय?"

"अगदी खरी आहे." शामरावाने उत्तर दिलें.

"तुम्ही हिच्यासंबंधीं खोटानाटा मजकूर काय म्हणून छापला?"

"मी – मी—मी—"

"काय म्हणून छापला?" बाळासाहेब ओरडला.

"या शरच्चंद्राने सांगितल्यावरून छापला."

बाळासाहेबाने काठी उगारली आणि सांगितलें, "या मुलीपुढे साष्टांग नमस्कार घालून हिची माफी माग. जलदी—"

शामराव लटपटला पण सोनाजीराव पुढे झाला व म्हणाला, "येथे येऊन मारामारी करतां काय? हा शामराव घाबरला आहे.

ही पोरगी या शरच्चंद्राकडे आली होती. कशासाठी आली हें तिलाच विचारा."

बाळासाहेबाने तिरस्काराने त्याच्याकडे पाहिलें आणि शामरावाला विचारलें, "हा गृहस्थ म्हणतो तें खरं का तुम्ही म्हणतां तें खरं? ही मुलगी येथे कशासाठी आली होती?"

"ती मला ताकीद देण्यासाठी आली होती. सोनाजीराव खोटें सांगतात."

"हे खोटें सांगतात?" बाळासाहेबाने विचारलें.

"बिलकुल खोटें."

"ठीक आहे. या हरामखोराला मी कसे तडाखे दिले ते पाहिले तुम्ही?"

"होय. पाहिले." शामरावाने उत्तर दिलें.

"मी सांगतों तें न कराल तर तुम्हांला तडाखे बसतील याबद्दल शंका नाही ना तुम्हांला? ठीक. प्रथम या मुलीच्या पायां पडून हिची क्षमा मागा नंतर या खोटें बोलणाऱ्या हलकट माणसाच्या पांच वेळां थोबाडींत जोराने लगावा."

सोनाजी गोरामोरा झाला. शामराव गडबडला. नमस्काराचा विधि आटोपून तो उभा राहिला. त्याला बाळासाहेब म्हणाला,

"जलदी. मी पांच अंक मोजतों. त्याच्या आंत तुम्ही सुरवात न कराल तर ही माझी काठी—"

शामरावाने वाट पाहिली नाही. सोनाजीच्या श्रीमुखांत त्याने तडातड पांच भडकावल्या. सोनाजी प्रथम स्तंभित झाला. पण मग त्याने शामरावाला धरला व त्याची झोंबाझोंबी सुरू झाली. शरद् उठण्याचा प्रयत्न करीत होता. बाळासाहेब म्हणाला,

"सुंदर, आपण जाऊंया. येथलें काम संपलें."

प्रकरण पंचविसावें

# कुटाळकंपूची मसलत

बाळासाहेब व सुंदर बाहेर पडल्यावर कांही वेळ सोनाजी व शामराव यांची झटापट चालली होती. बाळासाहेब तेथे उभा होता त्या अवधींत [illegible] श्रीमुखांत भडकावण्याशिवाय शामरावाला गत्यंतर नव्हतें. शामरावाला कोणत्या परिस्थितींत आपल्यावर हात उगारावा लागला याची जाणीव सोनाजीला वास्तविक व्हावयास पाहिजे होती. पण सोनाजी वयातीत असला, पुढारी असला तरी माणूसच होता. आपल्या शत्रूच्या दरडावणीने गाळण होऊन जवळ जवळ आपल्याला नोकरासारख्या असलेल्या माणसाने तोंडांत लगावाव्यात ही गोष्ट अपरिहार्य असली तरी कोणालाही आवडण्यासारखी नव्हती. त्यांतल्या त्यांत हा सर्व प्रकार त्या पोरटीच्या देखत झाला ही गोष्ट तर सोनाजीला शल्यासारखी झोंबली. आपण तीन माणसें उभीं असतांना एकट्या बाळासाहेबाने यावें, शरच्चंद्रासारख्या तरण्या बांडाला काठीने फोडून काढावें, शामरावासारख्या बढाईखोर एडिटरचें सगळें अवसान बाहेर काढून त्याच्या करवीं त्याच्याच वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध पुढाऱ्यावर अत्याचार करवावा आणि शामरावाने शेपटी पायांमध्ये घालून तो करावा आणि हें सर्व त्या सुंदरने पहावें—यापेक्षा फजिती व्हायची ती काय राहिली असें सोनाजीला वाटलें यांत नवल नाही. सगळ्या त्वेषाचा वचपा त्याने शामरावावर काढला व शामरावाने सुद्धा मागे पुढे न पाहतां आलेल्या रकमेची सव्याज फेड केली.

शामराव आणि सोनाजी यांची याप्रमाणें लढाई चालली असतांना शरच्चंद्र उठण्याचा प्रयत्न करीत होता. त्याला आंगभर मार बसला होता व कांही ठिकाणीं तर सपाटून लागलें होतें. माराच्या पहिल्या धडाक्यांत तो सर्व गोष्टी विसरून गेला होता; पण जसजशी शुद्धि येऊं लागली तसतशी घडलेल्या गोष्टींची त्याला आठवण येऊं लागली.

सुंदर आपल्या अगदी हातांत आली होती, तिची वाटेल ती शोभा करण्याची संधि आपल्याला अनायासाने मिळाली होती, आपण तिच्यावर झडप घालणार होतों इतक्यांत तोंडांतला घास जसा आंत न जातां बाहेर पडावा त्याप्रमाणें तिची सुटका झाली. सुटका झाली इतकेंच नव्हे तर ती सुटका होऊन वर आपल्याला आंगभर मार बसला. तानाजीने केलेल्या बाळासाहेबांच्या चाबकाच्या फटकाऱ्यांच्या वर्णनाला आपण हसलों होतों व त्याला भित्रा म्हटलें होतें; पण बाळासाहेबाच्या काठीचे जे तडाखे त्याने खाल्ले त्यावरून त्याच्या चाबकाचे फटकारेही जबर असले पाहिजेत ही त्याची खातरी झाली आणि त्याचा सुंदरवरचा क्रोध आणखी भडकला. अर्थात् दांत ओठ खाण्याखेरीज तो क्रोध व्यक्त करण्याला तूर्त दुसरें साधन नव्हतें. वळून आजूबाजूला पहाण्याचा त्याने प्रयत्न केला; पण वळण्याच्या प्रयत्नांत अंगाला अशा कांही कळा येऊं लागल्या की क्षणभर तो पहिल्यासारखा पडला. आता तो सावध झाला होता आणि अगदी आपल्याजवळ ठोसाठोसी, मारामारी चालली आहे असें त्याला ऐकूं येऊं लागलें, तेव्हा अद्यापि बाळासाहेबच आणखी आपल्या सहकाऱ्यांना मारतो आहे की काय अशी त्याला शंका आली. ती खरी का खोटी हें पहावें म्हणून मोठया प्रयासाने तो थोडासा वळला आणि पाहतो तों शामराव व सोनाजी यांची झोंबाझोंबी चालली आहे हें दृश्य त्याच्या दृष्टीस पडलें. तें दृश्य पाहून त्या तशा स्थितींतही शरच्चंद्र चकित झाला. पण त्यांना त्याची दादच नव्हती. एकमेकांना ठोसे देण्यांत ते गर्क झाले होते. शेवटीं कांही वेळाने ते दूर झाले आणि थांबले. बहुधा दमल्यामुळेच ते थांबले असावेत. नंतर दोघांचीही दृष्टि शरद्‌कडे गेली. बोलण्याची त्याची इच्छा होती पण त्याला बोलवेना. शेवटीं मोठया प्रयासाने "पाणी" असे शब्द त्याच्या तोंडांतून बाहेर पडले. ते ऐकून सोनाजी शामरावाला म्हणतो, "शाम्या, लेका, गाढवा, तो तुझा बाप पाणी पाणी करून मरतो आहे त्याला पाणी तरी प्यायला दे."

"तो माझा बाप तर तुझाही बाप आहे." शामरावाने तरतरून उत्तर दिलें. "तूं त्याला पाणी आणून प्यायला दिलेंस तर लेका सोन्या

तुझे हात मोडतील का ? "

" शाम्या जीभ संभाळून बोल. " सोनाजी ओरडला.

" पाणी, पाणी ! " शरच्चंद्र जरा मोठ्याने विवळूं लागला.

सोनाजीकडे रागाने पहात खुजा होता तेथे शामराव गेला व त्यांतून एक पाण्याचा पेला भरुन तो शरच्चंद्राजवळ गेला. तो पेला हातात घेऊन पाणी पिणें शरच्चंद्राला शक्य नव्हतें. तें शामरावाच्या लक्षांत आलें आणि मग त्याने त्याला बेताने पाणी पाजविलें. पाणी प्याल्यावर शरच्चंद्राला किंचित् तकवा आला व शामरावाला तो म्हणाला,

" तो हरामखोर गेला का ? "

" कोण ? हा सोन्या गधडा तर येथेच उभा आहे आहे. चांगला बडवून काढला आहे हरामखोराला ! " शामराव बोलला.

" सोन्या नव्हे रे ! " शरद म्हणाला. " तो–तो निसटला आणि तुम्ही मारामारी करीत बसलां आहांत. "

सोनाजी त्याच्या जवळ आला आणि म्हणाला, " तो निसटला पण जाण्यापूर्वी त्याने या भित्रट शाम्याला माझ्या तोंडांत देण्याचा हुकूम केला व तो या भागूबाईने त्या कारटीच्या देखत अमलांत आणला. "

" तूं भागूबाई नव्हतास तर तूंच का त्याच्या अंगावर गेला नाहीस ? तुझे हात कोणी धरले होते ? " शामरावाने विचारलें.

" बडबड बंद कर. " सोनाजी दरडावून म्हणाला. " फाजील बोलशील तर बत्तिशी काढून हातात देईन; लक्ष्यांत ठेव. "

" जारे माकडा ! तुझ्या तोंडांत बत्तिशीच नाही—म्हणजे आहे ती विकत घेतलेली कवळी—तेव्हा दुसऱ्याच्या बत्तिशा काढायला तुझें काय जातें ? पण लक्षात ठेव, माझ्याशीं गाठ आहे. "

शरच्चंद्र एकाकडून दुसऱ्याकडे पाहूं लागला. पुन: त्याने पाणी मागितलें. तें त्यांनी आणून दिलें. सोनाजीने शरदच्या मानेला व पाठीला आसरा देऊन त्याला बसतें केलें व तो पाणी प्याला. मग

सोनाजी म्हणाला, "शामराव, थोडी कॉफी मागव." थोड्याच वेळांत शामरावाच्या सांगण्याप्रमाणे कॉफीचे तीन पेले आले व कॉफी प्याल्यावर तिघांनाही थोडीशी तरतरी आली. शरद म्हणाला, "आता झालें तें विसरा. पुढ काय करावयाचें तें सर्वांनी मिळून ठरविलें पाहिजे."

"तें ठरविण्यापूर्वी डाक्टरला बोलावून तुझ्या अंगाला कांही ठिकाणी मलमपट्ट्या बांधल्या पाहिजेत." सोनाजीराव म्हणाले.

"डाक्टर बोलावलांत तर तुम्हांही दोघांना त्याची मदत होईल." शरद म्हणाला. "कायरे शामराव, मंडळी इकडे केव्हांशी येतात ?"

"आता त्यांची येण्याची वेळ झाली आहे. तूं जरा आंतल्या खोलींत जाऊन पड—आम्ही तुला तेथे नेतों आणि जरा विश्रांति घे. मंडळी आता आली म्हणजे त्यांचा सल्ला घेऊं आणि पुढे काय करा-यचें तें ठरवूं." असें शामरावाने सांगितलें व त्याने आणि सोनाजीने शरदला अगदी बेताने पलीकडच्या खोलींत नेऊन बिछान्यावर निजविलें.

कांही वेळाने वासूसाहेब, नानाजी, तानाजी वगैरे मंडळी आली व झालेली सर्व हकीकत त्यांनी ऐकिली. शामराव व सोनाजी यांच्या परस्पर युद्धाचें वर्णन जेव्हा त्यांनी त्या दोघांकडून ऐकलें तेव्हा तानाजी मोठमोठ्याने हसूं लागला. वासूसाहेब मात्र हसत नव्हता. त्याचा गंभीर चेहरा घाबरल्यासारखा दिसत होता. तो म्हणाला, "मी आता जातों."

"कां ?" सोनाजीनें विचारलें.

"तो चांडाळ पुनः येथे आला तर काय करील याचा नियम नाही."

"त्याचा काय मगदूर लागला आहे ?" सोनाजी म्हणाला. "आता तो आमच्या हातांत एकटा तर सापडूं द्या."

"मग मघाशीं तुम्ही तिघे होतां तेव्हा काय दिवे लागले ?" तानाजीनें विचारलें. "तो येथे येणार असेल तर मीही चाललों."

"अरे शहाण्या, पण तो शरद आंत पडला आहे त्याला भेट-शील तर खरा." सोनाजी म्हणाला.

" शरदमुळे तर आपण सर्व गोत्यांत आलों. का वासूसाहेब ? " तानाजीने विचारलें. पण लागलीच तो उठून आंत गेला. वासूसाहेबही त्याच्या पाठोपाठ गेला. शरदचा किंचित् डोळा लागला होता. तेव्हा ते तसेच पाऊलसुद्धा न वाजवितां परत आले.

" अगदी फोडून काढला आहे शरदला; " तपकिरीची चिमट नाकांत कोंदीत वासूसाहेब बोलले.

" हासत कर्म करावें भोगावें रडत तेंच परिणामीं " तानाजी पुटपुटला.

" तान्या फाजीलपणा बंद कर " सोनाजी म्हणाला " एक-मेकांचें उणें दुणें काढण्याची ही वेळ नव्हे. समजा तो हरामखोर चार माणसें घेऊन इतक्यांत येथे आला—"

वासूसाहेबाने पगडी डोक्याला चढविली व तो दाराकडे चालला. सोनाजीने त्याच्या कोटाला धरून त्याला मागे ओढलें व सांगितलें, " वाश्या, चाललास कोठे ? बैस मुकाट्याने "

" पण मला ही भानगड नको. " वासूसाहेब म्हणाला.

" नको म्हणून कसें चालेल ? आपण सर्वजण यांत आहोंत आणि आता या प्रकरणाचा शेवट लागेपर्यंत यांतून कोणालाही फुटतां येणार नाही. " सोनाजीने बजाविलें.

" पण बाबा या प्रकरणाचा शेवट लागण्यापूर्वी आमचाच शेवट लागण्याची वेळ येईल. " वासूसाहेब काकुळतीने म्हणाला.

" आली तर आली. तुझ्यासारखा भित्रट मेला नाही तर उलथला म्हणून दुनिया कांही ओस पडत नाही " सोनाजी म्हणाला.

नानाजी या वेळपर्यंत अगदी चूप होता. वासूसाहेब व तानाजी यांच्या बरोबर तो आला पण मध्ये न बोलतां अगदी स्वस्थ बसला होता. आता तो म्हणाला, " आता ही वर्दळ पुरे. "

सोनाजी हसला. " नान्याने शहाणपणाची गोष्ट सांगितली यांत कांही शंका नाही. वासूसाहेब, वेळ अशी आली आहे की आपलीं डोकीं अगदी भणभणून गेलीं आहेत."

"डोकीं भणभणलीं म्हणून डोकीं नसल्याप्रमाणें वागणें जरूर आहे की काय?" वासूसाहेबानें विचारलें.

"नाही. जरूर नाही एवढेंच नव्हे तर तसें वागून आता निभाव लागणारच नाही. वासूसाहेब, माझ्या तोंडून कमी ज्यास्ती शब्द गेला असल्यास माफ करा." लाघवीपणाने सोनाजी म्हणाला.

वासूसाहेबाचा ऊर भरून आला. त्याचा राग त्या भरलेल्या उरांत कोठल्या कोठे गडप झाला. तो खाली बसला; पगडी एकीकडे ठेवून तो म्हणाला, "आता पुढे काय करावयाचें?"

"प्रश्न तोच आहे." नानाजी म्हणाला. "शरदला विशेष जखमा झालेल्या आहेत काय?"

"त्याला मार सप्पाटून बसलेला आहे." शामराव म्हणाला. "कांही दिवस त्याला बिछान्यांत पडून राहावें लागेल. मला वाटतें तो चांगला बरा होईपर्यंत आपण स्वस्थ असावें."

"पण तो चांडाळ स्तब्ध बसेल का?" वासूसाहेबांनी सचिंत मुद्रा करून विचारलें.

"समजा तो स्वस्थ नाही बसणार." नानाजी गंभीरपणाने म्हणाला. "माझी तर अशी सल्ला आहे की आपण तसें स्वस्थ बसूं नये. माझी लेखणी खंबीर आहे. कोठेही—कांही तरी--"

"नान्याच्या लेखणीला तूर्त माझ्या पत्रांत जागा मिळणार नाही." शामरावाने निक्षून सांगितलें.

"कांही हरकत नाही." नानाजीनें उत्तर दिलें. "जगांत तुझेंच कांही एकटें पत्र नाही. गावांतल्या कुटाळक्या छापून गंमत उडविणारीं पत्रें व मासिकें आता पुष्कळ झालीं आहेत. आणि माझ्या लेखावर तर संपादकांच्या उड्या पडतात--"

"पण सही घालून देणार का छापायला?" शामरावाने विचारलें.

नानाजी शामरावाकडे तीव्र दृष्टीने पाहून म्हणाला,

"शामराव हा प्रश्न तूं विचारूं नकोस. आम्ही खरी सही घालून लिहीत नसतो म्हणून तर लोकांचीं इतकीं बिंगें आम्हांला बाहेर आणतां

येतात आणि आमचें कांहीसुद्धा कोणाला कळत नाही."

"पण तूं महापाजी आहेस हें साऱ्या जगाला माहीत आहे." बासूसाहेब म्हणाले.

"पण तुमच्या इतका पाजी मला कोणी समजत नाही, बासूसाहेब!" नानाजीने उत्तर दिलें.

"मला पाजी कोणीही समजत नाही." बासूसाहेबांनी तपकिरीची मोठी चिमट नाकांत कोंदली. "तुमच्यासारख्या हलकटांच्या संगतींत मी आहे याबद्दल मात्र माझे कांही मित्र नाखूष आहेत. आणि मीही त्यांना दोष देत नाही. तुमची संगत कांही चांगली नव्हे."

"यंव! बाश्या!" नानाजी म्हणाला. "जरा तुझा सभ्य चेहरा पाहूं दे रे. कांदेलसूण ओवाळून तरी दृष्ट काढली पाहिजे. तुला जरी आम्ही विद्वान् बनविला आहे—आणि आमच्या मानाने तसा तूं आहेस थोडासा विद्वान्—तरी आपल्याला लोक सभ्य समजतात असा का भ्रम तुला झालेला आहे? कोणत्याही चांगल्या लोकांत तुला कवडीची किंमत नाही म्हणून तर एके काळीं तुला ज्यांच्याकडे प्रतिष्टेने जातां येत असे त्या सर्वांना टाळून तूं आमच्याकडे तासचे तास घालवितोस."

"सगळा वाद बंद." सोनाजी म्हणाला. "आपण आज वरचेवर वर्दळीला येत आहोंत हें लक्षण बरें नाही. नानाजी, तूं चांगलें लिही कांही तरी सणसणीत. आपण सांगू शामरावाला तें छापायला."

"ऊं हूं!" शामराव म्हणाला. "तूर्त आमचे दरवाजे मिस्टर नानाजीला बंद!"

"कांही हरकत नाही, शाम्या. तुझ्या पत्राला महत्त्व आलें माझ्या लेखांनी. सर्व राजकीय पक्षांबद्दल खऱ्याखोट्या बातम्या तुला कोणी दिल्या? कांही शिष्ट लोकाशीं स्नेह करून पुढे त्यांची टर उडविण्याची संधि तुला कोणी आणून दिली? पण या गोष्टी मी सांगण्याची जरूरी नाही. , मी तर या प्रकरणावर एक असें आर्टीकल खरडतों की तें वाचल्याबरोबर त्या बाळासाहेबाने त्या पोरटीच्या सावलीलाही उभें राहूं नये. आणि शरदचें मित्रकार्य करायचें तर हेंच केलें पाहिजे."

" तूर्त शरदचें मित्रकार्य म्हणजे त्याला डॉक्टरला दाखवून त्याच्या जखमा बांधल्या पाहिजेत." तानाजीनें सुचविलें.

" शाम्या, तुझ्यासारखा भागूबाईजवळ होता म्हणून त्याला मार खाण्याचा प्रसंग आला." नानाजी म्हणाला.

" तुमचे हे नरशार्दूल सोनोपंतही जवळच होते की!" शामरावानें चिरडीला येऊन उत्तर दिलें.

" सोनाजीरावावर मळी तूंच तुटून पडलास. लाज नाही वाटली तुला?" नानाजीनें विचारलें.

" बाबा, लाज वाटण्याची वेळ नव्हती. पाहिजे तर तानाजीला विचार."

" शामचें म्हणणें बरोबर आहे." त्रिंबकनें सांगितलें. " सुचलेल्या हुकुमाप्रमाणें सोनाजीच्या थोबाडींत तो न लगावता तर शरदची जी अवस्था झाली आहे तीच त्याची झाली असती."

" माझी काय अवस्था झाली?" शरदनें आंतून विचारलें.

" अरे जागा झाला वाटतें." नानाजी म्हणाला व आंत जाऊन शरदजवळ बसला व त्याच्याकडे पहात म्हणाला, " या प्रकाराचा वचपा निदान मी तरी काढल्याशिवाय राहणार नाही. शरद—"

" म्हणजे आम्ही काय स्वस्थ बसणार आहोंत की काय?" सोनाजीनें विचारलें. मग सर्व मंडळी एकामागून एक आंत जाऊन बसली. वासूसाहेब म्हणाला, " शरद, झाला प्रकार फार वाईट झाला. असा प्रसंग शत्रूवरही येऊं नये. पण तो तुझ्या शत्रूवर मात्र आणल्याशिवाय आम्ही राहाणार नाही."

" का? वासोजी, बरेंच अवसान चढलें आहे?" नानाजीनें विचारलें. " मघा तर स्वारी पळण्याच्या विचारांत होती—"

" बुवा, ही आपापसांतील भांडणें बंद करा. जर आमच्यांत एकी नसेल तर कसें होणार?" शरदनें विचारलें. " हा प्रसंग शत्रूवर येण्यापूर्वी माझ्यावर आला. मला त्याची परवा नाही. पण नानाजीची

युक्ति मला फार पसंत आहे. आणि हें पहा, शाम्या, त्याचें आर्टीकल तुझ्याच पत्रांत आलें पाहिजे."

"तूंच छापलें पाहिजेस." वासूसाहेब म्हणाला आणि विजयी मुद्रेने नानाजीकडे पाहूं लागला. तो आणखी कांही बोलणार होता इतक्यांत दारावर कोणी ठोठावल्याचा आवाज ऐकूं आला; त्याबरोबर त्याचा नूर उतरला आणि तो म्हणाला,

"मी आता जातों. मला काम आहे."

शरद हसला; मोठ्याने हसला आणि म्हणाला, "घोडयाला शिंग नाही म्हणून हसणें आणि तुम्हांला धारिष्ट नाही म्हणून हसणें या गोष्टी सारख्याच खाहेत. पण तुझ्यासुद्धा भित्रटपणाला कांही सीमा असावी. कोण आहे पहा बरें!"

"मी नाही जाणार." वासूसाहेबांची गाळण उडाली होती.

"मी पाहून येतों." असें म्हणून नानाजी उठला.

---

## प्रकरण सव्विसावें

# ठरलें

बगीच्यांतील बाकावर बाळासाहेब पाहत बसला होता; आणि त्याच्या पाहण्याचा विषय असा होता की तो तसाच पाहत तासचे तास बसला असता. सुंदरचे वास्तविक लाल पण थोडेसे फिकट झालेले ओठ; तिचे वास्तविक काळे पण आता आरक्त झालेले डोळे; गुलाबी रंगाच्या गुलाबाप्रमाणे खरोखर असणारे पण आता जरा अधिक लाली चढलेले तिचे गाल; सुकुमार परंतु शरच्चंद्राच्या गालफडांच्या माहितीप्रमाणें कठोर असलेले तिचे हात—हें दृश्य त्याच्यासमोर होतें. बगीच्यांत फुललेल्या मोगरीचा आणि निशिगंधाचा वास सर्वत्र दरवळला होता. मंद मंद वाऱ्याची लकेर मधून मधून येऊन शरीराला सुख देत होती.

तो तीव्र नजरेने सुंदरकडे पाहत होता पण ती त्याच्याकडे पाहत नव्हती. तिच्या ओठांकडे पाहिलें की ती आता बोलणार असें वाटत होतें; पण बराच वेळ ती बोलली नाही. मग त्याने तिचा उजवा हात आपल्या हातांत घेतला आणि तो म्हणाला,

"सुंदर!" तंद्रींतून जागा झालेला माणूस करतो त्याप्रमाणें तिने अगदी लहानसा उसासा टाकला व एकदा बाळासाहेबाकडे पहाण्याचा प्रयत्न केला. ती म्हणाली, "आता माझ्याबद्दल आपल्याला काय वाटतें? मी त्या ठिकाणीं कशाला गेलें होतें हें मला अद्यापि आपण कां विचारलें नाही?"

"तुला कांही विचारायला मला संधि मिळत नाही, त्याला मी काय करूं?" बाळने उत्तर दिलें. तुझें हें सौंदर्य कोणालाही विस्मित करील असें आहे. पण तुझ्या शरीराच्या सौंदर्यावरून तुझ्या अंत:करणाच्या सौंदर्याकडे जेव्हा आज माझी दृष्टि गेली तेव्हा मी नुसता विस्मित झालों नाही तर माझी बोलण्याची शक्तीही नाहीशी झाली.

"म्हणजे? माझ्यावर रागावलांत का तुम्ही? पण तुम्हीं का रागावूं नये? ज्या परिस्थितींत मला तुम्ही आज पाहिलेंत तसें पाहून कोणाचेंही मत माझ्याबद्दल प्रतिकूल झालें असतें." तिच्या डोळयांतील आरक्तपणा गेला आणि आकाशांत ढग यावेत त्याप्रमाणें तेथे क्षणैक कृष्ण छटा उत्पन्न होऊन दवाच्या बिंदूप्रमाणें अश्रूंचे थेंब तिच्या गालावर पडले. बाळ क्षणभर बुचकळयांत पडला. तो म्हणाला, "सुंदर, मी तुजवर रागावलों नाही. ते अश्रु आवर." त्याने ते अश्रु आपल्या रुमालाने पुसले आणि तो पुढे म्हणाला, "सुंदर, लांडग्यांनी वेढलेल्या हरिणीसारखी तुझी स्थिति झालेली होती. त्या वेळीं तुझ्या अंगाला कंप सुटला नाही; तुझ्या डोळयांत पाणी आलें नाही; तुझ्या हृदयाला धक्का बसला नाही. आता संकट टळलें; आता कशाला भितेस? आता हास. कारण जरी या तुझ्या गालावर पडलेल्या अश्रूंचें मोल मी अरबस्तानांतून आणलेल्या सुंदर मोत्यांपेक्षा अधिक समजतों तरी जेव्हा याच गालांवर स्मितहास्य चमकतें तेव्हा तुझी दृष्ट काढण्याला सारी दुनिया कमी आहे असें मला वाटतें. आता भीतीचें कारण नाही."

"लांडग्यांना मी कधी भीत नव्हतें—तुम्ही वेळेवर आलांत ही गोष्ट फार चांगली झाली. त्यामुळे माझा पुष्कळ त्रास वाचला पण आता मजबद्दल तुम्हांला काय वाटतें याबद्दल मात्र मी साशंक आहे."

"तुझ्याबद्दल मला काय वाटतें ?" बाळने विचारलें. "तें शब्दाने सांगतां आलें असतें तर मी तुला सांगितलें असतें. पण भावनेचा जेव्हा अतिरेक होतो तेव्हा ती प्रकट करण्यास शब्दांचें सामर्थ्य पुरें पडत नाही. सुंदर, आज जें मी पाहिलें त्यामुळे माझ्या अंत:करणांत तुजबद्दल असलेला आदर शतपट वाढला. आणि—आता बोलतोंच—प्रेम सहस्रपटीने वाढलें आहे. मला आश्चर्य वाटतें तें हें की त्या तसल्या मूर्ख माणसावर अल्पकाळ तरी तू कशी भाळली होतीस ?"

सुंदरेने बाळचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले आणि ती म्हणाली, "बाळ, आपलें अंत:करण इतक्या शुद्धपणाने मोकळें करून दाखविलेंस तोच कित्ता मी गिरवला तर रागावू नकोस. बहुवचन आपोआप नाहीसें झालें म्हणून दचकूं नकोस. तुझा सुस्वभाव, तुझा दिलदारपणा, कितीतरी गोष्टी उघड उघड असतांना माझ्यावरचा तुझा दृढ विश्वास, तला अन्यायाची येणारी चीड, तुझी सरळ वृत्ति—बाळ, बाळ, तुझ्या प्रेमाने मी बेहोष झालें आहे. तुझे आताचे शब्द अमृतप्रमाणें माझ्या कानांत पडले. पण बाळ, मी तुझ्या लायकीची नाही होय, त्या शरदचा मला एकदा नाद होता—पाहिलें तर मीच त्याला नादावलें होतें असें म्हण. माझें त्याच्यावर प्रेम होतें अशी त्याची समजूत मी करून दिली होती. शरीराच्या साजाकडे पाहून डोळयाना पडणारी भूल; इंद्रियांच्या वासना उद्दीप्त होऊन विचारशक्तीला येणारी दुर्बलता; सगळा जन्म केवळ चैनीसाठी आहे आणि हें सगळें जग आपल्या सुखासाठी आहे असें वाटल्यामुळे नुसती मजा करावी. परिणामांचा विचार करण्याचें कारण नाही अशा प्रकारची दृष्टीला आलेली बधिरता—या आणि असल्या प्रकाराला प्रेम म्हणण्याचा मोह पडतो असा काळ बहुतेक प्रत्येकाला येतो नाही ! या काळांत स्वार्थ—आणि स्वार्थ—स्वार्थाहून निराळा विचार नसतो. मी अशा काळात असतांना माझी आणि शरदची ओळख झाली. विचार

न करणें आणि शरीराच्या अभिलाषाला उंच उंच नांवें देऊन आपली फसगत करून घेणें असले प्रकार याच काळांत होतात. सुदैवाने माझी विचार करण्याची सवय नाहीशी झालेली नव्हती. पाणी किती खोल आहे याचा विचार न करतां उडी मारण्याच्या तयारीने मी गेलें होतें. आंगांतले जड कपडे काढून ठेविले होते --पण मी वेळेवर सावध झालें तथापि उडी घालणार होतें याची निशाणी मागे राहिल्याशिवाय राहिली नाही."

बाळ हसला, "सुंदर, इतक्या खुल्या दिलाने बोलून आज तूं मला फार सुखी केलें आहेस. हें तूं सांगण्यापूर्वी तर्काने मी सर्व समजलों होतों. तुझीं कांही पत्रें त्या शरच्चंद्राजवळ आहेत हें मला माहीत आहे. त्या पत्रात तूं कांही जरी लिहिलें असलेंस तरी माझी तुझ्याबद्दलची वृत्ति पालटण्याचा संभव यत्किंचितही नव्हता. पण आता तू जें मला मोकळ्या मनाने सांगितलेंस त्यामुळे शंकेचा आभास जरी असला तरी तो उरणें शक्य नाही तुझें म्हणणें खरें आहे, सुंदर. नवा काळ, नव्या कल्पना, नवे तर्क, नवे सिद्धांत यांच्या सान्निध्यांत आपण आहोत. त्या नव्यातही शुद्ध आणि अशुद्ध यांची भेसळ झालेली असते ती भेसळ लक्षपूर्वक पाहून त्यांतील शुद्धाचा स्वीकार करणें यालाच खरोखर नवीन मताचा स्वीकार करणें म्हणता येईल. हा निवाडा करणें सोपें काम नाही. तो करीत असतांना माणसाच्या हातून पुष्कळ वेळा चुका होतील. पण सत्याच्या शोधार्थ झालेल्या चुका आणि युद्धाच्या गर्दीत झालेल्या जखमा या दूषणीय नसून भूषणीय असतात पण जखम होणें म्हणजे स्वतःच्या शरीरसुखाची हानि करणें हा जसा युद्धांतील प्रकार तसेंच या नैतिक युद्धांतील जखमा म्हणजे शरीराच्या वासनेच्या तृप्तीसाठी अशुद्धांत बुडविणें नसून सत्य शोधून काढण्यासाठी त्याच्या संयमाची-स्वतःच्या क्षणिक सुखाची हानि सोसण्याची-सवय लावणें होय. तूं श्रेय काय याचा विचार करीत होतीस म्हणून प्रेमाच्या पाशांत अडकून सुद्धां भक्ष्यस्थानीं पडली नाहीस. म्हणून तर मला तुझें कौतुक वाटतें—पण हें असलें बोलणें आता पुरें नाही का?"

"आपल्या कौतुकाचें बोलणें कोणाला पुरेसें वाटतें का?"

सुंदर खरोखर हसली. “ मग आता पुढे काय करायचें ? ”

“ पुढे काय करायचें ? कादंबरी संपत आली म्हणजे काय होतें ? तुझी जर हरकत नसेल तर तेंच आपण शक्य तितक्या लौकर करूं. पण आपण हातीं घेतलेल्या कामाचा निकाल अद्यापि लागलेला नाही. त्या मंडळींना पुरा धडा [illegible] मी राहणार नाही आणि पुरा धडा शिकविल्याशिवाय ते थांबतील ही गोष्ट शक्य नाही. पण आपलें ठरलें ना ? ”

सुंदरचे डोळे आश्चर्यानें भरले. तिच्या मुखावर कौतुकाची छटा पसरली. तिने विचारलें, “काय ठरावयाचें होतें ? कांही नवीन नाही ना ? ”

बाळासाहेबानें तीव्र नजरेनें तिच्याकडे पाहिलें. “ नवीन कांही नाही. जें सुरवातीला आपण निरनिराळें ठरविलें होतें तेंच आता दोघांनी मिळून ठरवायचें आहे एवढीच गोष्ट.”

“ निरनिराळें ठरविलें तें एकच ठरविलें होतें ना ? ” सुंदरने अगदी साळसूदपणानें विचारलें.

“ असें मला तरी वाटतें. तुझ्या मनांत काय हें कोणाला ठाऊक ! ”

“ खरेंच माझ्या मनांत काय आहे हें कोणाला ठाऊक ? दुसऱ्याच्या मनांतलें समजणें हें कांही अगदी सोपें नाही.”

“ नाही, तें तसें कठीणही नाही म्हणा. दोन अंत:करणें एक झालीं की त्यांना एकमेकांचें सर्व कांही कळतें.”

“ पण तीं जर एक झालीं तर त्यांत एकमेक असा दोनपणा शिल्लक राहतो का ? ” हसत हसत सुंदरने विचारलें.

बाळासाहेबानें उत्तर दिलें, “ तूं शर्यत जिंकलीस खरी.”

इतक्यांत दचकल्यासारखें करून सुंदर म्हणाली, “ आम्हांला असें कोणी पाहिलें तर ते काय म्हणतील ? ”

“ ते म्हणतील की अलीकडचीं पोरें अगदी भकत चाललीं. फार झालें तर एखाद्या वर्तमानपत्रांत त्यावर लेख लिहितील. त्या वर्तमानपत्रांचीं तरी पोटें चाललीं पाहिजेत ना ! ”

रागाचा आविर्भाव आणून सुंदर म्हणाली, " होय. त्यांनाही आपलीं पोटें जाळलीं पाहिजेत."

" तें समजतें तर एवढी रागावतेस कां त्यांच्यावर ? "

" मी नुसती रागावलें. तुम्हीं तर चाबकाचा प्रयोग केलात."

" तूं काय कमी आहेस ? तूं चाबकाची सुद्धा वाट पाहिली नाहीस, हाताचाच प्रयोग केलास."

" तुम्ही तेथे असतां तर मी तुमच्यावरच सर्व सोपविलें असतें."

" मी असतोंच तर तुझ्या सोपविण्याची किंवा परवानगीची वाट पाहिली नसती. कांहीं असो--ठरलें हें उत्तम झालें."

" पण ठरविण्याचा अधिकार आपला नाही. तो मान घरच्या वडिलांचा असतो. तो राखण्याइतकी मी जुन्या वळणाची आहे."

" मलाही जुनें वळण हवें. पण माझ्या घरीं विचारशील तर कोणी नाही–नाही तर 'आणा दाखवायला' म्हणून हुकूम सुटला असता. बाकी माझा मलाही तसा हुकूम सोडतां येईल."

" माझ्या घरीं सर्व माणसें आहेत तेव्हा या ना एकदा मला 'पाह्यला !' तुम्ही मला तसें कुठे पाहिलेलें आहे ?"

" नाही. मी तुला तशी पाहिलेली नाही—"

" तशी म्हणजे कशी ?" दुरून आवाज आला. सुंदर हळूच म्हणाली, " आपण फार मोठ्यानं बोलत होतों वाटतं !"

" मग तसेंच बोललें पाहिजे. बोलणें हें ऐकण्यासाठी असतें. तेव्हा मोठ्यानेच बोलावें. कुजबुजणें हें लबाड लोकांचें काम आहे. हा पहा मोहन आला."

खरोखरच मोहन आला. जवळ येऊन तो म्हणाला, " एखाद्या काव्यमय प्रसंगावर मी प्रसंग तर आणला नाही ना ?"

" आणलास खरा." बाळ म्हणाला. " पण आलीया भोगासी असावें सादर. करतां काय ? ये बैस येथे."

"तुम्ही लग्न ठरलेल्या जोडप्यासारखे दिसतां." मोहन म्हणाला,

" अगदीच वेडा रे तूं. ज्यांचें लग्न ठरलें आहे, ते असे मोकळ्या मनानें कधी बोलत बसतील का ? " बाळनें विचारलें.

" बाबा, हें नवमताचें युग आहे. "

" तरीही जमत नाही. नवमतवादाची कांही शहाण्या लोकांनी व्याख्या केलेली आहे व तीच खरी व्याख्या असा त्यांचा हट्ट आहे— त्याप्रमाणें नवमताच्या युगांत लग्नें ठरत नसतात तर लग्नें मोडत असतात; आणि लग्नें लग्नें मोडणाऱ्यांचें कौतुक अधिक होतें. त्याचें कारणही उघड आहे. चांगल्या गोष्टी समजण्याची अक्कल नसली म्हणजे वाईट गोष्टींना नव्या गोष्टी म्हणायचें आणि त्या नव्या म्हणून चांगल्या असें ठरवायचें अशी युक्ति करावी लागते—"

" चांगला वाद करण्यासारखा प्रश्न आहे; " मोहन म्हणाला. "पण मी त्यासाठी आलों नाही. मला तुला कांही सांगायचें आहे आणि तें हें की तुझ्यावर मारामारीची फिर्याद होणार आहे. "

" खरें की काय ? " सुंदरने सचिंतपणें विचारलें.

" फार उत्तम गोष्ट;" बाळ म्हणाला. " तूं या वेळीं वकिलीची परीक्षा पास होतास तर मी तुलाच माझें वकीलपत्र दिलें असतें."

" बाळ, ही चेष्टेची गोष्ट नव्हे. " मोहन म्हणाला.

" मी ती चेष्टेची समजत नाही." बाळनें उत्तर दिलें. "मारामारीची फिर्याद कोणी करणार असेल तर त्याचे हात आपणाला धरतां येत नाहीत. फिर्याद करतील तेव्हा पाहूं. माझी तयारी आहे. "

" अरे पण त्यांत सुंदरचें नांव गोवण्याचा त्यांचा विचार आहे."

" त्यालाही माझी हरकत नाही. माझें आणि सुंदरचें नांव आमचा शत्रूंनी एकत्र गोवावें यापेक्षा मंगलमय गोष्ट कोणती ? "

" ही थट्टेची वेळ नव्हे, बाळ," मोहन गंभीरपणें म्हणाला, " ते एक नामांकित वकील आपल्यातर्फे उभा करणार आहेत. "

" अरे मोहन, वकील कितीही उत्तम झाला तरी तो कांही खऱ्याचें खोटें करूं शकत नाही. "

" बाबा, कित्येक वकील तर त्याबद्दलच प्रसिद्ध आहेत."

" पण दुसरे कित्येक आहेत ते खोटेपणा बाहेर काढून खऱ्याचें शुद्ध स्वरूप मोहन, फिर्याद होत नाही. फिर्यादींत अधिक धोका त्यांना आहे. तुझें त्यांच्याकडे अजून सूत आहे तेव्हा तूं त्यांना फिर्याद करण्यालाच प्रोत्साहन दे. "

" म्हणजे मीच का खुळा ठरलों ? "

तिघेही उठले व चालूं लागले. सुंदर घरीं जावयास निघाली व तिला पोचविण्याचें काम कोणी करावें असें चाललें होतें. इतक्यांत तीच म्हणाली, " मोहनने तें काम पूर्वी केलें आहे. तेव्हा, बाळ, तूं येण्याची जरूरी नाही. शिवाय त्याच्याशीं मला कांही बोलायचें आहे."

" म्हणजे तें मी ऐकण्यासारखें नाही का ? " बाळने विचारलें.

" ऐकण्यारखें नाही असें नाही. पण मी मागाहून सांगेन. "

" ठीक, तुझी मर्जी. " असें म्हणून बाळने फाटकाचें दार उघडलें व ते गेल्यावर तो परत येऊन बाकावर बसला व घडलेल्या गोष्टींबद्दल विचार करण्यांत गर्क झाला.

---

## प्रकरण सत्ताविसावें

# शरच्चंद्राचें आत्मनिरीक्षण

खरोखरी दारावर त्या वेळीं कोणीतरी फेरीवाला आलेला होता, तेव्हा कोणीही भिण्याचें किंवा दचकण्याचें कारण नव्हतें. ती मंडळी आणखी कांही वेळ बोलत बसली. नंतर शरदला बिऱ्हाडीं म्हणजे आपल्या खोलींत पोचविण्याची व्यवस्था झाली आणि त्याची सोबत व शुश्रूषा करण्यासाठी त्यांनी पाळ्या ठरवून घेतल्या. त्या यातायातींतून पूर्वस्थितीला येण्याला शरच्चंद्राला पांचसहा दिवस लागले. डॉक्टरला बोलावून त्याच्या औषधपाण्याची नीट व्यवस्था झाली. कोठें जखमा झाल्या होत्या त्या व्यवस्थितपणें बांधल्या. पांचसहा दिवस बिछान्यांत पडून राहण्याचा प्रसंग आल्यामुळे आणि तो टाळतां येणें शक्य नस-

त्यामुळे मधून मधून जेव्हा वेदना कमी होत किंवा विचारांच्या परिभ्रमणामुळे त्यांचा विसर पडे तेव्हा त्याची दृष्टि स्वतःच्या चरित्राकडे वळूं लागली. आपण काय केलें, का केलें, परिणाम आतापर्यंत काय झाला, पुढे आणखी काय होण्याचा संभव आहे, असे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. दृष्टि कधी कधी अशी अंतर्मुख होते, आणि ती तशी झाल्याखेरीज अंतःशुद्धीची शक्यता नसते पुष्कळ दिवस, कित्येक वर्षे, अशुद्ध विचार, दुष्ट वासना, गढूळ भावना यांनी अंतःकरण भरून गेलेलें असलें म्हणजे वृत्ति अंतर्मुख करणेंही कठीण होऊन बसतें. मग कांही जेव्हा एखादा प्रसंग ओढवतो, कांही तरी अरिष्ट कोसळतें, आपले सर्व हिशेब फसून आपल्याच गळ्यांत एखादी भानगड येते, आणि दुसऱ्यांचें सहाय्य मिळणें शक्य नाही असें जेव्हा वाटूं लागतें तेव्हा विचाराला सुरवात होते आणि त्यांचा प्रवाह आंत आपल्याकडे वळतो. शरच्चंद्राने असा विचार पूर्वी फारसा केलेला नव्हता. जेव्हा जेव्हा तशी वेळ आली तेव्हा कांही तरी सबब काढून, कांहीतरी नवीन गोष्टीला सुरवात करून त्याने ‍ ‍ ‍ विचार करण्याचें टाळलें होतें. पण आता इलाजच नव्हता; स्वस्थ पडून राहिल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. त्याच्या शरीराचे व्यापार ज्या मानाने खुंटले त्याच मानाने मनाचे व्यापार जोरांत सुरू झाले; आणि अशा प्रकारें हें त्याचें अंतर्मुख आत्मपरिक्षण त्या चार पांच दिवस मधून मधून चाललें होतें.

अर्थात् त्यांत जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं त्याला सुंदरची मूर्ति दिसत होती. तिची फजीती उडविण्याचा—फजीती हा शब्द फारच मवाळ असें त्याला वाटलें—तिचा विनाश करण्याचा, तिला जगांतून उठविण्याचा आपण चंग बांधला. तूर्त तरी परिणाम हा झाला की तिच्या देखत आपलीच फटफजीती उडाली, आपणाला आंगभर मार बसला, आपलीं हाडें त्या चांडाळाने खिळखिळीं करून टाकलीं. आणि तो चांडाळ तिचा–तिचा–त्या कारटीचा दोस्त, तिच्यावर प्रेम करणारा, तिचा पति होणार, हा विचार त्याला अगदी दुःसह झाला; आणि कांही काळ शारीरिक वेदनांचा जरी त्या विचारभ्रमणांत त्याला विसर पडला

तरी मानसिक वेदनाही त्याला पीडादायक होऊं लागल्या. काय पण हातांत सापडली होती! त्याच्या देखत तिला धरून जर तिच्या त्या रसरशीत ओठाचें चुंबन घेतलें असतें तर त्याने तिच्याकडे पुन: ढुंकून तरी पाहिलें असतें काय? पण घडलेल्या प्रसंगामुळे जर त्याचें मन कलुषित झालेलें दिसलें नाही तर असल्या अतिप्रसंगामुळेही तें कलुषित होण्याचा संभव नव्हता, ही गोष्ट त्या वेळीं तरी शरदला सुचली नाही. त्याच्या देखत अतिप्रसंग करणें अर्थात् त्याला मोठी तरवार मारल्या-सारखें वाटलें असतें हें खरें; तथापि ऐन वेळीं ती हातांतून निसटली, शरीरांत पेट घेतलेल्या वासनांची तृप्ति होण्याची वेळ आली होती इतक्यांत सर्वच फसलें, हाच विचार प्रथम तरी अंतर्यामीं त्याला दुख-वीत होता यांत शंका नाही. त्याने सुंदरकडे दुसऱ्या दृष्टीने कधी पाहिलेंच नव्हतें—आणि तसेंच म्हटलें तर कोणत्याही मुलीकडे त्याने दुसऱ्या दृष्टीने पाहिलें नव्हतें. किंबहुना मुलींच्याकडे पाहण्याची—स्त्रियांकडे पाहण्याची—दुसरी दृष्टि आहे हेंही त्याच्या लक्षांत कित्येक दिवस नव्हतें; एवढेंच नव्हे तर दुसरी दृष्टि आहे असें म्हणणारे मूर्ख किंवा लुच्चे आहेत असें तो किती तरी वेळां म्हणत असे. विचाराचें उगमस्थान एकदा दूषित झालें म्हणजे विचारांचा प्रवाह सर्वत्र बिघडून जातो तसेंच त्याचें झालें होतें. अभिलाषा स्वैर सोडणें, वासनेवर ताबा न चालविणें, उच्च भावनांना नेभळट म्हणणें, शारीरिक आकर्षणाला बौद्धिक किंवा आंतर आकर्षण समजणें, हातचें सुख दवडून पुढे मिळ-णाऱ्या सुखासाठी वाट पहाणें म्हणजे मूर्खपणा करणें असें वाटणें—मनाला अशा प्रकारची शिकवण एकदा लागल्यावर दुराचरणालाच सदाचरण असें आपण म्हणूं लागतों आणि याप्रमाणें आपल्या दुरा-चरणाचें निराकरण करण्याचा प्रयत्न करतों. शरदचें असेंच झालें होतें.

वास्तविक तीनचार वर्षांपूर्वी तो इतर मुलांसारखाच नव्हता काय? त्याची सध्याची परिस्थिति हळू हळू निरनिराळीं कारणें उप-स्थित होऊन उत्पन्न झाली नव्हती काय? पण तीन चार वर्षांपूर्वी त्यांच्यांत जसा विचार फारसा नव्हता तसा विकारही नव्हता. पुढे अशाच गोष्टी घडत गेल्या की विकाराचा पगडा अधिकाधिक बसूं

लागला आणि विचाराचा अंमल सुरू सुद्धा झाला नाही. प्रकृति चांगली, घरची परिस्थिति प्रतिकूल नाही, पूर्ण स्वतंत्रता, मुंबईसारख्या शहरांत कोणी विचारता पुसता नाही, तेव्हा मजा करावी, हौस पुरवून घ्यावी, अशी कल्पना प्रथम रूढ झाली. पुढे पुष्कळ ठिकाणीं ऐकलें होतें की मुंबईसारख्या मोठ्या शहरांत चैनीचीं साधनें फार, चैन करण्याला संधि पुष्कळ, चैन करण्यासाठी जोडीदार पाहिजेत म्हणून हपापलेल्यांची संख्या मोठी, अशा प्रकारचे विचार मनांत रुजले. मोठाल्या शहरांत जीवनकलहाच्या धक्काबुक्कींत श्रीमंतांखेरीज इतरांना चैनीची, व्यसनासक्त होण्याची मुष्कील आहे, हें कळण्याला निरीक्षण लागतें तें शरदजवळ नव्हतें. पुढे इकडे तिकडे कानांवर येई की कॉलेजांतून म्हणजे सारा अंधार, शिकणाऱ्या मुली म्हणजे—बोलूं नये तें बरें,—आणि हेंही त्याच्या हृदयांत भिनलें. कांही समविचारी मित्रांची गाठ पडली. तशांत एक प्राध्यापक भेटले. ते सांगत की नीतिअनीतीच्या कल्पना केवळ सापेक्ष—प्रत्यक्ष नीति अशी नाहीच—सुख ज्याने होतें ती खरोखर नीति—आणि शारीरिक वासना म्हणजे निसर्गाच्या आज्ञा आणि निसर्गाच्या आज्ञा पाळणें म्हणजे शहाणपणा—अनैसर्गिक वागण्याचे परिणाम शारीरिक, विशेषत: मानसिक विकृतींत होतात, असा शास्त्रज्ञांचें, विशेषत डॉक्टर फ्राईडचें ठाम मत—आणि याही गोष्टी शरदच्या मनावर बिंबल्या. "तुम्हांस वेडें व्हावयाचें आहे काय ? नाही ना ? मग वासनांना दाबूं नका. त्यांना संतुष्ट करतां येईल तितकें संतुष्ट करा." असा उपदेश कोणाला बरा वाटत नाही ? शिवाय कोणी साहित्यिक भेटले, कोणी नाटकांतल्या नटींची तारीफ करीत होता, तर कोणी वेश्यांच्या जीवनांत सुधारणा करून त्यांना माणुसकी प्राप्त करून देण्याच्या गोष्टी बोलत होता; कोणी मनुष्यप्राणी हा स्वभावत: बहुपत्नीक व बहुपतिक असल्याचें सांगत होता; आणि सगळेच जर्मनी आणि अमेरिका, फ्रान्स आणि इटली आणि रशिया—विशेषेंकरून रशिया येथील ग्रंथकारांचीं नांवें घेत होते——त्यांतील कांही नांवें तर उच्चार करण्याला इतकीं अवघड होतीं की त्यांचा बरोबर उच्चार कोणता याचीच वर्तमानपत्रांतून चर्चा चाले. अशा एक ना पन्नास गोष्टी. वेश्यांचें कौतुक; नटीचें कौतुक;

नटींचें तर त्याहून कौतुक; त्याहून सुद्धा नवऱ्याला सोडणाऱ्या बायकांचें कौतुक; दुसऱ्यांच्या बायकांवर प्रेम करणाऱ्यांचें कौतुक; सारांश काय सुखासमाधानाने संसार हाकणाऱ्या, संसाराचीं सुखें आणि दुःखें हसतमुखाने सोसणाऱ्या, परस्परांबद्दल जागरूक आणि कृतज्ञ असणाऱ्या नवराबायकांना वगळून बाकी प्रत्येकाचें कौतुक--अशा साहित्यिक निर्मित कौतुकयुगाच्या तडाख्यांत सापडून ज्यांच्या विचाराचा पाया डळमळतो अशांतच शरदची गणना केली पाहिजे. निदान ऐकलेल्या आणि पाहिलेल्या अशा सर्व गोष्टी त्याला आठवल्या आणि या सर्व घोटाळ्यांत आपली स्थिति काय झाली याची तो आठवण करूं लागला.

वाईट गोष्टी करण्याने सुख होतें, निदान होतेंसें वाटतें, डोळ्यांवर त्यासंबंधीं क्षणिक झापड आलेली असते, हें खरें आहे--आणि त्यामुळे वाईट गोष्टी करणें म्हणजे पुरुषार्थ आहे, मर्दपणा आहे, असें वाटूं लागतें. वाईट गोष्टी प्रत्यक्ष करणाऱ्यांची संख्या जरी फार मोठी नसली तरी त्या करण्याची इच्छा असणाऱ्यांची संख्या फार मोठी असते आणि अशा प्रकारें मर्दपणाची ही मर्दानी व्याख्या करण्याकडे पुष्कळांचा कल असतो व थोर म्हणजे वयाने थोर असलेल्या माणसांच्या या विचारांचें लोण तरुण पिढीकडे जाण्याला वेळ लागत नाही. ही झाली सामान्य लोकांची गोष्ट. पण कांही तरी कारणामुळे ज्यांची शहाण्यांत गणना होते ते दुसरी एक गंमत करतात. स्वतःला गैरशिस्त म्हणणारे सज्जन थोडे; स्वतःची चुकी कबूल न करणारेच मर्द फार. तेव्हा आपण जें करतों तेंच उत्तम, तेंच श्लाघ्य, तेंच सदाचरण, असा वाद ही मंडळी सुरू करतात. स्वतःला एकपत्नीव्रत जमत नाहीसें दिसलें की पुरुषांची वृत्ति बहुपत्नीक असते असा शोध हे पंडित लावतात. दुसऱ्याची स्त्री आपणाला मिळावी असें म्हणण्याच्या ऐवजीं स्त्रिया अतिकामा असतात अशी हे उपपत्ति सांगूं लागतात. दुसऱ्याची बायको आपल्याला पाहिजे असली की आपलें अंतःकरण विकृत झालेलें आहे, विकाराने, कामुकपणाने भरून गेलें आहे असें सरळपणें कबूल न करतां हे प्रेमाची महती गाऊं लागतात. अशा प्रकारें, ज्यांना विचार करण्याची सवय झालेली नाही, खोटें निवडून एकीकडे काढून

टाकून खरें पारखण्याची व ग्रहण करण्याची कला ज्यांना हस्तगत झालेली नाही, अशा अल्पवयस्कांची व अज्ञान्यांची स्थिति मोठी चमत्कारिक आणि साशंक होते. अशा विचारांच्या फेऱ्यांत आपण कसकसे सापडत गेलों व त्यांचा आपल्या आचरणावर कसकसा परिणाम झाला याचा शरद विचार करूं लागला. त्यांत त्याला सर्व गोष्टींचे धागे जमवितां येईनात. कदाचित् त्याच्या त्या प्रकृतीच्या स्थितींत विचारांत एवढी सुसूत्रता येणेंही कठीण होतें. पण कांही झालें तरी चार दिवस वरचेवर वरचेवर विचार करून एक प्रश्न त्याच्यापुढे उभा राहिला तो हा. आपण सुंदरीबरोबर ज्या प्रकारें वागत आलों तो बरोबर आहे काय? सुंदरीने आपला असा काय अपराध केलेला आहे की आपण तिच्यावर नसता अमानुष सूड उगविण्याचा चग बांधावा ? आपल्या आचरणांत बिघाड झाल्यावर सुंदरीने आपली संगति सोडली हा तिचा अपराध का चांगुलपणा ? आणि आपल्याला आवडेल तें करतो तो चांगला आणि आपल्याला आवडत नाही तें करतो तो वाईट ही व्याख्या खरी की चांगल्या वाईटाला कांही स्वतंत्र व्याख्या आहे ? अशा विचाराला सुरवात झाली तेव्हा आपलें वागणें बरोबर नव्हतें, चुकलें तें चुकलें म्हटल्याबद्दल सुंदरची चिरड आली आहे, एवढें त्याच्या मनाला पटलें.

अशा तऱ्हेने पांचसहा दिवस गेल्यावर शरद बहुतेक बरा झाला. एक दिवस नानाजी त्याच्याकडे येऊन बसला होता. इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर नानाजी म्हणाला, "शरद, तें आर्टीकल मी लिहिलें आहे."

"तें आर्टीकल ?" शरदने विचारलें.

"तें म्हणजे त्या कारटीबद्दल; आणि असें लिहिलें आहे झणझणीत की तें वाचल्यावर ती बेशुद्धच पडली पाहिजे."

"ती बेशुद्ध पडेल का त्या त्याच्या चाबकाच्या माराखाली तूं बेशुद्ध पडशील ?"

"अरे मला ती भीति नाही. एवढेंच नाही तर तें मी लिहिलें आहे हें कोणालाही कळणें शक्य नाही."

"तूं तें शाम्याच्या पत्रांत का छापणार?"

" शामरावाने कबूल केलें आहे छापण्याचें."

" आणि परवा त्याच्या हुकुमावरून शाम्याने सोनाजीला जशा थपडा मारल्या तसा त्याच्यावर पुन: प्रसंग आला तर तो तुझें नांव बाळासाहेबाला सांगणार नाही कशावरून ? कांही केला आहेस का याचा विचार ? "

" कायरे शरद, आज तुझ्या डोक्यांत विचार फार चाललेला दिसतो ? एवढा विचारी केव्हापासून झालास ? वास्तविक तुझा आणि विचाराचा छत्तीसाचा आकडा. तूंही भ्यालास की काय त्या बैलोबाला ?"

" नानाजी, तूं भित्रा नाहीस. नांव घालून तें आर्टिकल प्रसिद्ध कर पाहूं. "

" तुला माहीत आहे की मी लेखावर कधी माझें नांव घालीत नाही. "

" म्हणजे आडून गोळया घालतोस ? "

" तूं मात्र त्या सुंदरीवर गोळया घातल्यास त्या अगदी समोरा-समोर नाही ? " नानाजीने विचारलें.

" मी एखादी बदमाषी केली की तो कांही सभ्यपणा ठरत नाही."

" अरे, मीपण त्याला सभ्यपणा समजत नाही. माझें म्हणणें इतकेंच आहे की, मी काय तूं काय आपण सगळे एका माळेचे मणि !"

" खरें आहे तुझें म्हणणें. " असें म्हणून शरदने तें सर्व आर्टि-कल वाचलें. मग तो म्हणाला, "यांत पुष्कळच खोटया गोष्टी आहेत."

" पुष्कळ कां, सगळयाच गोष्टी खोटया आहेत ! कारण तूंच त्या सांगितलेल्या होत्यास आणि तूं खोटया गोष्टी नेहमीच सांगतोस. "

" अस्सं ! " क्षणभर शरद स्वस्थ बसला. नानाजी बोलला हें त्याला आवडलें नाही हें स्पष्ट दिसत होतें; नानाजीच्या तीक्ष्ण नजरेंतून तें गेलें नाहीच. पण नानाजी बोलला तें कांही खोटें नव्हतें. शरदने आपण होऊन सुंदरबद्दल खोटयानाटया गोष्टी नानाजीला व इतर मंडळींना सांगितलेल्या होत्या; तेव्हा त्या खोटया आहेत असें आपण

म्हणण्यांत अर्थ नाही एवढें त्याच्या लक्षांत आलें. पण त्याला नानाजीचा राग आला हें खरें.

" शरद, आज तुझी तब्बेत बरी दिसत नाही." नानाजी म्हणाला. " आजारामुळे तुझें डोकें थोडेंसें हलकें झाल्यासारखें दिसतें. खोटया गोष्टीचा कंटाळा तुला केव्हापासून येऊं लागला ? पांचसहा दिवसांपूर्वीच—त्या त्याच दिवशीं आर्टिकल लिहिण्याबद्दल तुझा मला केवढा आग्रह चालला होता."

" खरें आहे तुझें म्हणणें." शरदने उत्तर दिलें.

" मग तुला हा लेख पसंत आहे ना ?"

" कांहीही म्हण, मला तो पसंत नाही."

" कोणासाठी भीति वाटते तुला ?"

" मला तुझ्यासाठी भीति वाटते."

" म्हणून का आर्टिकल पसंत नाही ?"

" त्याचा आणि पसंती नापसंतीचा संबंध नाही. पण आर्टिकल केवळ खोटया गोष्टींनी भरलें आहे म्हणून मला नापसंत आहे."

" पण तूंच सांगितल्या होत्यास त्या खोटया गोष्टी ?"

" होय, मीच सांगितल्या."

" मग खोटया कां सांगितल्यास ?"

" पण आता तुला कळल्या ना खोटया म्हणून ?" शरदने विचारलें.

" माझ्यासाठी भिण्याचें तुला कारण नाही." नानाजी तोंडांत सुपारी टाकीत म्हणाला.

" नाही, तुझ्यासाठी भीत नाही. पण तो शामराव तुझें नांव फोडल्याशिवाय राहणार नाही एवढें लक्षांत ठेव."

" हें आर्टिकल प्रसिद्ध केल्याशिवाय आता मी राहणार नाही हें तूंही लक्षांत ठेव. एवढी सुंदर कॉपी मी फुकट नाही घालवणार, समजलास ?"

कांही वेळाने नानाजी गेला. तो कधी एकदा जाईल असें शरदला झालें होतें. पण तो गेला आणि शामराव आला व म्हणाला, " नान्याने आर्टिकल खरडलें आहे. आहे चांगलें झणझणीत. नान्या लिहिणारा वस्ताद खरा. मग छापून काढायचें ना तें आर्टिकल, शरद ?"

" मला काय विचारतोस ? तुझा तूं विचार कर. "

" म्हणजे ? हें चाललें आहे सगळें तुझ्यासाठी. तूंच आंग काढीत असलास तर आमचें काय नडलें आहे नसतें घोंगडें गळयांत घ्यायला ?"

शरद कांहीही बोलला नाही. त्याची बोलण्याची इच्छा नाही हें पाहून शामरावाने तो विषय पुनः काढला नाही. पण त्या दिवशीं त्या मंडळींत मोठी चर्चा झाली. नानाजीने शरद आपल्याला काय म्हणाला तें सांगितलें. शामरावानेही सांगितलें. सोनाजी, तानाजी आणि वासूसाहेब यांनी पुष्कळ भवति न भवति केली व आजारामुळे शरदचें डोकें हलकें झालें आहे असा ठराव सर्वांनी एकमताने पसार केला. शामराव ज्यास्ती स्पष्ट वक्ता. तो म्हणाला, " डोकें हलकें झालेलें नाही. आंगभर मार बसल्यामुळे आंग हलकें झालें आहे. तुम्ही कांहीही म्हणा, माझी खात्री होऊन चुकली आहे शरद घाबरलेला आहे. "

सोनाजी डोळे वटारून म्हणाले, "शाम्या, उचलली जीभ लावली टाळ्याला असें करूं नकोस. शरदला भित्रा म्हणण्याची तुझी लायकी नाही."

" मला भित्रा म्हणण्याची तुझी लायकी नाही. "

"शाम्या, तुझी मी फार वेळ गय केली; पण यापुढे करणार नाही. आपण कोण हें तूं विसरतोस आणि त्याहीपेक्षा मीं कोण हें विसरतोस. "

" मी कांहीही विसरलों नाही. " सोनाजीला शामरावाने उत्तर दिलें. " पण शरद भ्यालेला आहे ही गोष्ट नक्की. "

" त्याला सुविचार सुचला असेल; " वासूसाहेब म्हणाले.

" बोलले हे विद्वान् ! " नानाजी म्हणाला. " सुविचार म्हणजे भित्रेपणा. "

याप्रमाणें बोलणें चाललें होतें इतक्यांत एक अगदी त्रयस्थ माणूस तेथे आला व दार उघडें होतें म्हणून तसाच आंत शिरला व म्हणाला,

" आपल्या मंडळींत नानाजी कोण आहेत ? त्यांजकडे माझें काम आहे. "

नानाजी जरा गडबडला. तो गृहस्थ त्याच्या ओळखीचा नव्हता तेव्हा ओळख द्या कशाला असेंही त्याच्या मनांत आलें. पण इतक्यांत तो गृहस्थ त्याच्याकडे वळून म्हणतो, " अरे तुम्ही आहांतच. बरें झालें. जरा बाहेर चला माझ्याबरोबर. कांही काम आहे. "

नानाजी म्हणाला, "बाहेर कशाला ? काय काम तें येथेच सांगा."

" येथे सांगण्यासारखें नाही आणि तसें सांगणारही नाही. माझें काम तुम्हांला बोलावण्याचें आहे. कारण मी तुम्हांला ओळखतों—चांगला ओळखतों. बाहेर बाळासाहेब आले आहेत. गाडींत आहेत—त्यांनी तुम्हांला बोलावलें आहे. " त्या गृहस्थाने सांगितलें.

" माझ्याकडे काय त्यांचें काम ? मला आता वेळ नाही. "

सोनाजी उठला व म्हणाला, "चला आपण जाऊं. दिवाणखान्याला मी कुलूप लावतों. वेळ फार झाला. "

नानाजी म्हणाला, " पण मग मी कुलूप लावून येईन. तुम्ही जा पाहिजे तर. मी आपला बसतों येथेच. "

" छे: छे: सर्वांनी बाहेर पडलें पाहिजे. मी कुलूप लावणार. " असें सोनाजीने म्हणतांच सर्व मंडळी उठली. नानाजीही उठला. त्याला कोण भेटतें हें पाहण्याची प्रत्येकाला उत्सुकता होती.

---

## प्रकरण अठ्ठाविसावें

# एकाचा सत्कारसमारंभ–एकाची सुटका

बाळासाहेबांचें आपणांला बोलावणें आलें आहे हें ऐकून नानाजीला आश्चर्य वाटलें आणि भयही वाटलें. सोनाजीने दाराला टाळा लावल्यामुळे सर्वांना बाहेर पडावें लागलें. नानाजीच्या बरोबर तो गृहस्थ होताच. त्याला टाळून कोठे गुप्त होतां येईल तर व्हावें

असाही विचार नानाजीच्या मनांत आला पण तो विचार आचरणांत आणणें सोपें तर नव्हतेंच पण शक्यही नव्हतें. इतर मंडळी आस्ते आस्ते मागून येत होती. रस्त्यावर मोटारींत बाळासाहेब बसला होता. जशी काय नानाजीची आणि आपली पुष्कळ दिवसांची ओळख आहे अशा प्रकारें त्याने "याहो नानाजी" म्हणून हाक मारली आणि त्या दुसऱ्या गृहस्थाने त्याला जवळ जवळ आंत ढकलला व मोटर चालू झाली. नानाजी तर स्तंभित झाला होता. एका कडेला बाळासाहेब, दुसऱ्या कडेला तो गृहस्थ व मध्ये नानाजी अशा प्रकारें ते मागच्या बैठकीवर बसले होते व शोफरजवळही दोन माणसें बसलीं होतीं. आपण येथे आलों कसे, कां, असे प्रश्न नानाजीच्या डोक्यांत आले पण त्याचें डोकें अगदी बंद पडल्यासारखें झालें होतें, तो चांगला बोलण्याइतका तयार होण्याला कांही वेळ लागला व तेवढया वेळांत मोटर बरीच अंतर चालून गेली. मग नानाजी विचारतो, "याचा अर्थ काय? मला तुम्ही कोठे घेऊन चाललांत? माझ्या खुषीविरुद्ध तुम्हीं मला काय म्हणून घेऊन चाललांत?"

"म्हणजे?" बाळासाहेबाने विचारलें. "मी तुम्हांला निरोप पाठविला. तुम्ही ^ आलांत आणि तुम्ही होऊन गाडींत बसलांत हें तर तुमच्या तीन चार मित्रांनी पाहिलेलें आहे."

"पण मला नेतां कोठे?"

"आता विचारतां तेव्हा मला कल्पना सुचली. आपण ठाण्याला जाऊं. ठाणें शहर फारच सोईचें आहे. दक्षिणेला वेडयांचें इस्पितळ आणि उत्तरेला गुन्हेगारांसाठी तुरुंग! आपली कोठे जाण्याची इच्छा आहे?" बाळासाहेबाने प्रश्न केला.

नानाजी म्हणजे तसा डरणारा नाही पण वेडयाच्या इस्पितळांत लोकांना कधी कधी कसें घालतात हें त्याने कर्णोपकर्णी ऐकलेलें होतें. तें खरें का खोटें याची त्याने शहानिशा केलेली नव्हती. तो जरी धंदा लेखक होता व त्या कामापुरता चौकस होता तरी प्रत्येक गोष्टीची बिनचूक माहिती त्याला थोडीच असणार? ऐकलेल्या गोष्टी त्याला आठवल्या व हा चांडाळ बाळासाहेब आपल्याला वेडयाच्या

इस्पितळांत तर पोचविणार नाही ना, असें त्याला क्षणभर वाटलें. पण मग त्याने विचार केला की आपल्यालाच एवढी जबर शिक्षा देऊन बाकीच्यांना बाळासाहेबाने मोकळ सोडावें असा कांही त्याचा आपण विशेष गुन्हा केलेला नाही. असे विचार त्याच्या मनांत येताहेत इतक्यांत बाळासाहेब म्हणाला, " मिस्टर नानाजी, तुमचें आर्टिकल मी वाचलें. मोठें चुणचुणीत आहे आणि सणसणीत पण आहे यांत कांही शंका नाही."

"म्हणजे बोलतां काय तुम्ही?" नानाजीने विचारलें. " कसलें आर्टिकल ?"

" शामरावाच्या पत्रांत उद्यां येणार आहे तें."

" आणि तें तुम्ही कसें वाचलें ?"

" त्याचें प्रूफ शामरावाने मजकडे पाठविलें आणि तें तुम्ही लिहिलेलें आहे असें सोबतच्या पत्रांत मला कळविलें."

" अरे शाम्या—" नानाजी कावराबावरा झाला.

" कां बुवा ? आर्टिकल तर अगदी सणसणीत आहे. तुम्ही लेखक जबरे आहांत आणि इतकी माहिती हो तुम्हाला कोठून मिळाली?"

काय असेल तें असो, नानाजीच्या डोळयांपुढे काजवे चमकले. तो म्हणाला,"माहिती सगळी शरदने दिली. लिहायला त्यानेच सांगितलें."

" पण ती माहिती खरी का खोटी याची कांही चौकशी केलीत का?"

" मी—मी" नानाजी गडबडणारा नव्हे पण तो गडबडला. बाळासाहेब आता काय करणार याचा त्याला तर्क होईना. जो तर्क होई तो मोठासा सुखदायक नव्हता. तो म्हणाला, " माझा यांत संबंध नाही." मी पोटभरू लेखक. शरदने सांगितलें तसें लिहिलें."

गाडीचा वेग कमी झाला. निवांत अशा ठिकाणीं एकीकडे गाडी थांबली. बाळासाहेब म्हणाला, " मिस्टर नानाजी, आता जें बोललांत तें या कागदावर लिहा. त्याखालीं पश्चात्ताप व्यक्त करून आणि सुंदरची क्षमा मागून आपली स्पष्ट सही करा."

" मी करीत नाही. मला उतरूं द्या खालीं––"

" तुम्हांला खाली उतरवण्याची तर ही सारी खटपट आहे;" बाळासाहेब हसून म्हणाला. " मला तुमच्या कबुलीजबाबाची मोठीशी परवा नाही. तुमच्या शामरावाचें पत्र माझ्याकडे आहे. मूळचा लेख त्याने मजकडे पाठविण्याचें कबूल केलें आहे."

" ठीक आहे. मलाही त्या हलकट लोकांची परवा नाही. पण मी लिहून दिलें तर पुढे ?" नानाजीने विचारलें.

" पुढे जें जें होईल त्यांत मी तुम्हांला गोवणार नाही. मग बोला तुमचा काय विचार आहे तो." बाळासाहेबाने उत्तर दिलें.

" आणा तो कागद इकडे." नानाजीने सांगितल्याप्रमाणें लिहून दिलें; खाली सही घातली. पुढे बसलेल्या एका गृहस्थाने व मागे बसलेल्या गृहस्थाने साक्षीदार म्हणून डाव्या बाजूला सह्या टाकल्या. मग गाडी सुरू झाली. नानाजीने विचारलें, " मला खाली केव्हा उतरवणार ?"

" अरे विसरलोंच." असें म्हणून बाळासाहेबाने शोफरला इषारा दिला. गाडी अधिक वेगाने पळूं लागली. हळू हळू एक मोठा तलाव लागला. तेथे गाडी थांबली. " जरा उतरूं येथे," असें बाळासाहेबाने म्हणतांच पडत्या फळाची आज्ञा घेऊन नानाजी खाली उतरला. मग बाळासाहेब म्हणाला, "आम्ही गाडींत बसण्याचा तुमच्यावर जुलूम करीत नाही. आता वाटेल तिकडे जा. येथून पश्चिमेला जाल तर अंधेरीचें स्टेशन आठदहा मैल आहे. या बाजूलाही सात आठ मैल गेलांत म्हणजे स्टेशन मिळेल जी. आय्. पी. चें. येतों आम्ही—" असें म्हणून गाडी सुरू झाली. नानाजी पहात होता. मग तो 'थांबा थांबा' म्हणून ओरडला पण गाडी पार निघून गेली, अगदी दिसेनाशी झाली. संध्याकाळची वेळ झाली होती. अंधार पडूं लागला होता. कोणत्याही स्टेशनला आपण या वेळीं कसे पोचणार याची त्याला काळजी वाटूं लागली. मधून एखादी मोटर इकडून तिकडे जाई. पण नानाजीकडे पाहतो कोण ? पंधरा मिनिटें खुळ्यासारखी वाट पाहून तो रस्ता चालूं लागला.

  

दुसरा दिवस उजाडला; पण त्या दिवशीं शामरावाच्या पत्रांत नानाजीचा लेख आला नाही. नानाजी परत मुंबईस कसा पोंचला हें वर्णन करून सांगण्याची आवश्यकता नाही. मात्र आपण कोठे गेलों व तिकडे काय काय प्रकार घडला हें कोणाजवळही सांगण्याची त्याची इच्छा दिसली नाही. तो दुपारीं शामरावाकडे गेला. तेथे सोनाजी, बासूसाहेब, तानाजी वगैरे मंडळी होती त्यामुळे त्याला एकदम बाचाबाची करतां येईना. ही मंडळी बसली होती तेथे जवळ एक दुसरी खोली होती पण ती यांच्या जाप्त्यांत नव्हती. या खोलींत कोण राही याची त्यांनी चौकशी करण्याला कांही कारणही उत्पन्न झालें नव्हतें. या मंडळींचे संवाद नेहमीच निर्भीडपणें व बेधडकपणें चालत. नानाजी येऊन कांही वेळ बसला मग तो संथपणें शामरावाला म्हणतो, “आजचा अंक दे पाहूं जरा.”

“आजचा अंक तूं वाचला नाहीस ?” विचारलें.

“मी नाही पाहिला. मी—” त्याने जीभ चावली.

शामरावाने अंक दिला. तो चाळून नानाजी विचारतो,

“यांत माझा लेख दिसत नाही ?”

“तुझा लेख त्यांत नाही म्हणून तो दिसत नाही. मी संपादक आहे. वाटेल त्याचा लेख छापीनच असें नाही.” उत्तर दिलें.

“माझा लेख मला परत दे.”

“तो लेख परत मिळणार नाही.”

“शाम्या, लेख मुकाट्याने परत दे. नाही तर—”

“नाही तर काय करशील ? देत नाही लेख परत. तूं आपण होऊन माझ्याकडे दिलेला आहेस. मी छापणार नाही असें नक्की ठरवलें तर मग पाहीन परत द्यायचा की नाही तें.”

“म्हणजे तूं छापणार आहेस तो लेख ?”

“त्यासंबंधीं मी विचार करतों आहें.”

“तो लेख छापूं नकोस !”

“कां ?”

" मी सांगतों म्हणून. "

" आणि आजच प्रसिद्ध झाला असता तर ? "

" पण तो आज प्रसिद्ध झालेला नाही म्हणून मला तो पुढे प्रसिद्ध करण्याची इच्छा नाही. निदान तुझ्यासारख्या हरामखोराच्या हलकट पत्रांत प्रसिद्ध करण्याचा माझा विचार नाही. "

" अस्सें ? मग कोठे प्रसिद्ध करणार ? "

" ती पंचाईत तुला करण्याचें कारण नाही. मला माझा लेख मुकाट्याने परत देतोस की नाहीस, बोल. "

" देत नाही. "

" कां म्हणून देत नाहीस ? "

" तो परत पाठविण्यासाठी तूं पुरेसें पोष्टेज लेखाबरोबर पाठविलें नाहीस. कागदाचा चौथा भाग सोडून तूं लिहिलेलें नाहीस; आणि तुझें खरें नांव लेखासोबत आलेलें नाहीं. तव्हा तुला लेख परत मिळणार नाही."

" आणि यापूर्वी माझे लेख छापलेस तेव्हा ? "

" यासंबंधीं संपादकाचा निकाल शेवटचा समजला जाईल. " शामरावाने ठासून उत्तर दिलें.

तें ऐकून मात्र नानाजीचा क्रोध अनावर झाला. तो ओरडून म्हणाला, " शाम्या, त्या बाळासाहेबाकडून किती पैसे खाल्लेस ? "

" तुझा प्रश्न योग्य आहे, नानबा. ही विद्या मी तुझ्याजवळ शिकलों. पण तूं मला आपल्याहून शहाणा समजतोस हें फार चांगलें आहे. "

" म्हणजे काय ? मला तुझ्या म्हणण्याचा अर्थ समजला नाही."

" त्याचा अर्थ असा की मी निदान पैसे घेऊन काय केलें तें केलें असें तुझें म्हणणें; केवळ घाबरून जाऊन कांहीही केलें नाही. "

" हें तुमचें काय चाललें आहे ? " सोनाजीने विचारलें.

" मी तेंच म्हणतों. " [illegible] टेकू दिला.

" या शाम्याने--या हरामखोराने--या हलकटाने—त्या बाळा-साहेबाला माझा लेख नेऊन दिला आणि तो मी लिहिला आहे असें त्याला लिहून दिलें." नानाजी म्हणाला.

" आणि या शूर नानाजीनें, महाराष्ट्राच्या या खंद्या लेखकाने, बंद्या गुलामाप्रमाणें त्या बाळासाहेबाचे पाय धरले आणि तो लेख आपण शरदच्या सांगण्यावरून लिहिला असें त्याला लिहून दिलें."

आ केलें. तपकिरीची चिमूट त्यांच्या नाकांत न शिरतां हातांतच राहिली. सोनाजीनें क्षणभर विचार केला. मग तो म्हणतो, " शाम्या, नान्या, तुम्ही दोघेही महापाजी आहांत."

वासूला अवसान चढलें. तो म्हणाला, " तुम्ही दोघेही महा-पाजी आहांत. मला तुमची संगत नको. तुमच्या संगतीने माझ्यासारखा संभावित माणूस सुद्धा गोत्यांत यायचा."

" अहो, संभावित, " शामराव म्हणाला, " चाललांत कोठे? बसा खाली. खरी गोष्ट अशी आहे की तुमच्यामुळे आम्ही गोत्यांत आलों. तुम्हांला जेव्हा बाळासाहेबाकडून समजूत मिळाली--आम्हाला कोणालाही ही गोष्ट आपण कळविलेली नाही—तेव्हा तुम्ही त्याला सविस्तर पत्र काय लिहिलेंत हें लक्षांत आहे ना "

" तूं खोटें बोलतोस." वासूसाहेब उसळले.

" मी खोटें बोलत नाही आणि तुमचा चेहरा किती जरी गोरा मोरा झाला तरी तुम्ही खोटें बोलणाऱ्यांचे शिरोमणि आहांत ही गोष्ट कांही नाहीशी होत नाही." उत्तर दिलें.

" म्हणजे आता—" सोनाजी म्हणाला.

" म्हणजे शरच्चंद्र जाणे आणि बाळासाहेब जाणे. आम्ही या भानगडींत नाही." नानाजी म्हणाला.

पलीकडच्या खोलीचें दार वाजलें; पण तिकडे या मंडळींचें लक्ष गेलें नाही. कांही वेळाने यांच्याच खोलीचें दार जोरजोराने कोणी ठोठावलें तेव्हा सोनाजीनें तें उघडलें व शरच्चंद्र आंत आला. त्याने एकदा सर्वांकडे पाहिलें; तें अशा तीव्र नजरेने पाहिलें

की शामराव, वासूसाहेब आणि नानाजी हे वरमलेच. शरच्चंद्र म्हणाला, "शामराव, आताचें तुमचें सर्व बोलणें मी ऐकलें, त्यानंतर तुमच्याजवळ फार ऐकावयाचें की थोडेसुद्धा ऐकावयाचें कांही राहिलेलें आहे असें मला वाटत नाही. तुमची संगत धरण्याची बुद्धि मला झाली त्याचें फळ भोगलेंच पाहिजे."

सोनाजी म्हणाला, "शरद, खाली बैस. मलाही नीट सर्व खुलासा झालेला नाही. हे, हे, चोर आहेत एवढें मला कळलें. पण माझ्यावर तरी तुझा भरवसा आहे ना? मी तरी तुला कांही दगा दिलेला नाही ना?"

"[illegible]," शरच्चंद्र म्हणाला, "तुम्ही आणि वासूसाहेब ही वयोवृद्ध मंडळी आहांत. तरुण माणसांना भलभलत्या गोष्टी करण्याला प्रवृत्त करणें यापेक्षा त्यांना आणखी दगा तो काय द्यायचा?"

"एकूण तूं एकटा चांगला आणि आम्ही सर्व वाईट?" सोनाजीने विचारलें.

"हे तुमचे गण—हे सगळे चोर आहेत असें आताच तुम्ही सांगितलेंत," शरद शांतपणाने म्हणाला. "तुम्ही त्यांचे गुरु आहांत तेव्हा महाचोर आहांत हें अगदी सहज सिद्ध झालें."

"पण तूं कसला आहेस?" [illegible] विचारलें.

"मी कसला आहे? मी चांगला असतों तर तुमच्या प्रभावळींत मला जागा मिळती ना! मी वाईटच आहे. पण माझ्या वाईट वृत्तींना स्थिर करून मला नीच बनविण्याचें अकार्य मात्र तुम्ही केलेलें आहे."

"बाळासाहेबाने दिलेल्या माराचा डोक्यावर परिणाम झालेला दिसतो." वासूसाहेब म्हणाला.

"मी मार समोरासमोर खाल्ला; घाबरलों नाही की पळालों नाही. पण केवळ भयाने गाळण उडून लेखी जबाब लिहून देऊन स्वतःची सोडवणूक करणारे—माझ्यासारखे मूर्ख तरुण हाताशीं धरून, संभावितपणाचा आव घालून हलकट नीच कृत्य करणारे तुम्ही—तुमच्याइतका वाईट मी खचित नाही."

"घे स्वत:भोवतीं दिवे ओवाळून !" बासूसाहेब नाक फेंदारीत म्हणाला. "तूं चांगला का वाईट हें त्या सुंदरला विचारलें म्हणजे कळेल."

"खरें आहे." शरद म्हणाला. "पण तुमच्याबद्दल विचारलें तर ती काय म्हणेल ? तुम्हां तिघांचीं पत्रें तिच्या बाळासाहेबाजवळ आहेत. तुम्ही सारे हरामखोर आहांत आणि मी पण तुमच्यांतलाच होऊन तसाच बनून गेलों—"

"शरद," नानाजी म्हणाला. " .` फारच कमीपणा घेतोस. तूं आमचा गुरु होण्याइतका पाजी आहेस हें विसरूं नकोस."

"तुझें म्हणणें खरें आहे. मी पाजी आहे, दुष्ट आहे, पण तुमच्यासारखा मी निदान विश्वासघातकी नाही."

"दुसऱ्याचीं पत्रें त्याच्याविरुद्ध कुभांड रचण्यासाठी उपयोगांत आणणें यांत विश्वासघात कांहीच नाही, होय ना सद्गुणसंभावित ?" नानाजीने तोंड वेडावीत विचारलें.

तो प्रश्न ऐकून शरद अडखळला. बाण वर्मी लागला पण त्यामुळे अंत:करणाचा दूषित तुकडाही तुटून पडला. मग तो म्हणाला, "हा माझा तुम्हांला शेवटचा रामराम !"

"अरे अरे अरे" नानाजी म्हणाला. "मला वाटलें तूं चेष्टा करीत होतास; पण अगदी गंभीरपणें बोलतो आहेस ! आता काय जाऊन आगगाडीखाली पडणार, का मोटारीखाली चिरडणार, का समुद्रांत उडी मारणार ? शरद, तूं चाललास कोठे ? बाबा, एक गोष्ट लक्षांत ठेव. स्पष्टपणें बोलतों; कारण बोलण्याचा दुसरा प्रकार मला माहित नाही. पाजी लोकांची दोस्ती ही मगरमिठीसारखी असते. त्यांतून कधीही सुटका होत नसते. आपण सर्वच पाजी आहोंत. आपण एकमेकांनी एकमेकांना शिव्या देणें म्हणजे आम्ही पाजी आहोंत हें वरचेवर सांगणें होय. अरे आपण कांहीही केलें तरी 'सापडलों एकमेकां, जन्मोजन्मीं नव्हे सुटका' अशी आपली स्थिति आहे. तूं आमच्यांतून निघालास तरी कोणता चांगला माणूस तुला जोड्याजवळ तरी उभा करणार आहे ! तुझें बद्दू झालेलें नांव कांही आता सोज्वळ होणें शक्य नाही.

तेव्हा हेंही नाही आणि तेंही नाही असें करूं नकोस. तुझ्या हिताची म्हणून तुला गोष्ट सांगतों. "

तिरस्कारयुक्त मुद्रेने शरदने त्यांच्याकडे पाहिलें आणि तो म्हणाला, "तुमची संगत मला नको--तुमचा वारासुद्धा मला नको. मला कोणी जोडयाजवळ जरी उभें केलें नाही तरी तुम्ही दिलेली रेशमी गादी मला नको—"

शरद बाहेर पडला आणि ती मंडळी हसूं लागली. नानाजी तर खदखदा हसत होता. "आता हा गद्धा त्या पोरीच्या पायावर डोकें ठेवणार आणि तेथे बाळासाहेब त्याला लाथ मारून हाकून लावणार आणि मग पुनः तो येथे येणार--पहा कशी मौज होणार ती!" नानाजीने विजयी मुद्रेने सर्वांकडे पाहिलें.

शरद बाहेर पडून झपाटयाने चालूं लागला. इतक्यांत त्याला आपलें नांव घेऊन कोणी हाक मारीत आहे असें ऐकूं आलें. त्याने वर पाहिलें; समोर कोणी दिसलें नाही म्हणून मागे पाहिलें तों मोहन त्याला थांबण्याविषयीं खुणावीत होता असें त्याला दिसलें.

---

प्रकरण

# शरदची सुंदरला देणगी

शरच्चंद्र थांबला. मोहनची आणि त्याची आज कित्येक दिवसांनी —वर्षांनी—गाठ पडली असें म्हणण्यास हरकत नाही. त्याचा आणि मोहनचा स्नेह असा नव्हताच; दोघेही परस्परांना ओळखत. शरद कांही झालें तरी एके काळीं असा ना तसा गाजलेला मुलगा होता. तेव्हा त्याची माहिती पुष्कळांना असावी यांत नवल नव्हतें.

"कोण? मोहन? तूं मला कां हाक मारलीस? माझ्याबरोबर तुझें काय काम असण्याचा संभव आहे?"

"शरद, माझें तुझ्याकडे कांही काम असण्याचा संभव नाही हें

खरें; पण तूं आता जेथून बाहेर पडलास तेथे तुझा संबंध कायमचा तुटला काय, एवढें विचारावें म्हणून तुला हाक मारली." मोहनने उत्तर दिलें.

" म्हणजे तूं काय माझ्यावर पाळत ठेविली होतीस ?"

" तुझ्यावर अशी नव्हती पण त्या जागेवर होती. तीं माणसें फार वाईट आहेत. त्यांच्या संगतींतून सुटला असशील तर फार चांगलें झालें असें मला वाटतें."

" माझी तुला फारशी माहिती नाही. मोहन, मला कोणाची संगत बाधत नसते; माझी संगत दुसऱ्यांना बाधते, मी चांगला माणूस नाही एवढें तर तुला माहीत आहे ना ? दूर जा. माझ्यापासून दूर जा. नाही तर माझ्या संगतीने तूंही बिघडशील."

" शरद, एवढें तुला पटलें आहे म्हणून तुझ्याबद्दल मला आशा वाटते. तूं वाईट आहेस यांत शंका नाही. तुला चांगला कोण म्हणेल ? निदान ज्या एका निरपराध मुलीच्या मागे तूं राहूसारखा लागलास आणि तिचे धिंडवडे काढण्याची जी तूं यातायात केलीस, त्यावरून तरी तुला चांगला म्हणण्याचें धारिष्ट कोणाला होईलसें वाटत नाही. तरी पण तूं आता आपण होऊन दुष्टपणाचा रस्ता सोडून दिलेला आहेस; तेव्हा त्याबद्दल तुला चांगला म्हणण्यास तूं सुद्धा हरकत घेणें बरें नव्हे."

" मोहन तूं कविता करतोस नाही ?"

" करीत होतों. आता सोडून दिलें सर्व."

" तें काय म्हणून ?"

" तें काय म्हणून ? ती कथा फार मोठी आहे. तुला ती ऐकून फायदा नाही, शरद. पण माझ्या कवितेचा या विषयाशीं संबंध नाही."

" ठीक आहे. मी होऊन कसलाच विषय तुझ्याजवळ काढलेला नाही. तूं होऊन मला हाक मारलीस. मी थांबलों नसतों तरी तुला कांही करतां आलें नसतें. माझ्याकडे कांही काम होतें का, मोहन ?"

मोहन म्हणाला, " शरद, खरें सांगूं ? आज तूं दिसलास आणि तुझ्याशीं बोलावेसें वाटलें; पुष्कळ बोलावेसें वाटलें म्हणून हाक मारली."

" कवि आहेस खरा ! माझ्याशीं बोलावेसें वाटलें ? मग बोल. मी ऐकण्याला तयार आहे."

" म्हणजे तूं कांहीच बोलणार नाहीस ? "

" मी बोललेंच पाहिजे असें कुठें आहे ? आणि तुझ्याशीं कांही बोललेंच पाहिजे असें मला वाटलें नव्हतें, पण तुझी फार दिवसांनी गाठ पडली आहे. मला बोलण्याची जरूरी वाटली तर मी बोलेन. तूं आपला बोलत रहा. "

मोहन हसला. "माझा कांही व्याख्यान देण्याचा विचार नाही. शिवाय या चमत्कारिक गल्लीचें तोंड म्हणजे बोलण्याचालण्याला कांही मोठी सोईस्कर जागा नव्हे. हिंडावयाला येतोस का ? चल, कोठे तरी चहा घेऊं आणि मग समुद्रकिनाऱ्यानें कांही वेळ हिंडूं. "

शरद म्हणाला, " आज माझ्याशीं तुला कांही तरी विशेष बोलायचें दिसतें. मग असें करूं. माझ्याकडे चल. माझ्या जागेंत तूं कधीच आलेला नाहीस. फारच थोडीं चांगलीं माणसें तेथे आलेलीं आहेत. माझ्या खोलीसमोर लहानशी गच्ची आहे. तेथे वारा मुबलक येतो. आपण तेथे चहा घेऊं आणि गप्पा मारूं. "

मोहन कांही वेळ स्तब्ध होता. मग तो म्हणाला, " पण ही वेळ हिंडायला बरी नव्हे का ? "

" कोणची वेळ कशाला बरी हें पंचांग पाहून मी कांही करीत नाही. माझ्या खोलींत येण्याचा तुला संकोच वाटतो का ? भय वाटत असेल तर येऊं नकोस. मला चांगला समजणारे लोक फार थोडे आहेत. तूं तेथे आलास आणि तुला कोणी येतांजातांना पाहिलें तर तुझें नांव माझ्या माळेंतला मणि म्हणून होईल. माझी माळ म्हणजे साधुसंतांनी जप करण्याची माळ नव्हे. तेव्हा विचार कर. मी आता दमलों आहें. घरीं जाऊन स्वस्थ पडणार. "

"मी येतों तुझ्याबरोबर." मोहन म्हणाला. आणि थोडया वेळाने शरदच्या खोलींत ते दोघे पोचले. चहाचा एक पेला संपल्यावर मोहन म्हणाला, "शरद, आज कांही गोष्टींचा तुझ्यापासून मला खुलासा करून घ्यावयाचा आहे. तसें करतांना स्पष्टच बोलावें लागेल. त्याबद्दल तूं रागावणार नाहीस–रागाऊं नकोस. लोणावळ्यांत तूं जो प्रकार केलास आणि नुकताच जो प्रकार त्या शामरावाकडे घडला त्यावरून तुझ्याबद्दल जी कल्पना होते––जी माझी आणि पुष्कळांची आहे—तिच्यांत कांही तरी चूक असली पाहिजे. सुंदर जर चांगली मुलगी आहे असें गृहीत धरलें—आणि तशी आहे याबद्दल मला शंकासुद्धा नाही—तर तुझ्यावर एकवेळ का होईना भाळली होती याचा अर्थ काय?"

"तूं हा प्रश्न तिला कधी विचारलेला आहेस का?"

"विचारला होता तिला मी हा प्रश्न. तिने जें उत्तर दिलें त्याने माझें बरेचसें समाधान झालें. ती तुझ्यावर तशी भाळली नव्हती. तिच्या मोकळेपणाने वागण्याचा तूं भलता अर्थ केलास. मीही तसा केला होता. तूं तिच्या अगदी जिवावर उठलास, जिवापलीकडची जी अब्रू तिच्यावर उठलास. मी वेळींच सावरलों."

"तूं माझ्यासारखा कधीही वागला नसतास, मोहन. तुझ्या आणि माझ्या स्वभावांत फार अंतर आहे. तरी पण तिच्या मोकळेपणाच्या वागण्याचा मी भलताच अर्थ केला एवढयाने मात्र ही कथा संपत नाही."

"आणखी काय असणार?" मोहनने विचारलें.

"आणखी काय असणार म्हणतोस? जरी मी दुष्टपणाने तिच्याशीं वागलों आहें––तिच्यासंबंधीं अघोर विचार माझ्या अंतःकरणांत खेळत होते हें आता तुला माहित आहे–तरी ती एके काळीं माझ्यावर भाळलेली होती यांत शंका नाही. स्त्रियांच्या बाबतींत शारीर अभिलाषेखेरीज माझी दुसरी कोणतीही भावना नव्हती—पण सुंदर जेव्हा माझ्यावर भाळली त्या वेळीं माझें अंतःकरण, माझा स्वभाव, याकडे तिचें लक्ष नव्हतें. ती माझ्या शरीराच्या ऐटीवर, थाटावर,

आकर्षकपणावर भाळली. मी तिला आवडलों हें नि:संशय; पण माझ्याच दुर्वर्तनामुळे, बेछूटपणामुळे, तिला लौकरच कळलें की शरीराच्या थाटाखेरीज माझ्याजवळ दुसरें कांही नाही. आणि जरी ती आकर्षक मुलगी आहे—परवापर्यंत मी तिच्याबद्दल दुसरी कल्पना केलीच नव्हती—तरी तिच्याजवळ बाह्य कांही तरी अधिक आहे. म्हणूनच माझ्याशीं तिचें मैत्रीचें वागणें होतें त्या काळांत तिला कसलाही अपघात झाला नाही—होऊं शकला नाही. मोहन, ती स्वच्छ राहिली आणि ती स्वच्छ आहे."

"तूंच का बोलतोस हें शरद ?"

"मीच बोलतों आहें, मोहन. त्या दिवशीं जेव्हा माझ्या सर्व पशुवृत्ति शतगुणित झालेल्या होत्या, तेव्हा तिच्या शरीरावर, माझ्या सुखासाठी नव्हे तर तिला जन्मभर दु:सह यातना व्हाव्यात म्हणून झडप घालण्याला मी तयार झालों होतों त्या वेळच्या तिच्या स्वरूपाला मी विसरलों नाही—कधीही विसरणार नाही. ती बिलकूल भ्याली नाही—ऐन वेळीं बाळासाहेब आला नसता आणि जो प्रकार झाला तो झाला नसता तरी तिच्या सामर्थ्यानें माझ्या सामर्थ्याचा त्या दिवशीं चक्काचूर केला असता असें मला वाटतें—आता वाटतें."

"आता वाटतें ? पण तेव्हा वाटलें नव्हतें ना ?"

"नाही. तेव्हा वाटलें नाही. पण पुढे बिछान्यांत लोळतांना, शरीराला सर्वभर वेदना होत होत्या तेव्हा तिची त्या वेळची मूर्ति वरचेवर माझ्यापुढे येई—डोळे झाकले तरी येई. नाही झाकले तरी येई—इतकी ती मूर्ति माझ्या डोळ्यांत भिनली आणि मोहन, मी विचार करावयास लागलों. सुंदरला आज इतके दिवस मी ओळखतों—पण त्या दिवसाच्या सुंदरने मला जिंकलें."

"म्हणजे तुझी वृत्ति आता बदलली तर ?"

"बदलली का बदलली नाही हें मी काय सांगूं शकणार ? ज्या लोकांची संगत मी धरली आणि दुष्टपणांत ज्यांनी माझें गुरुत्व मान्य केलें ते दुष्टपणांत कोणालाही हार जाणार नाहीत अशी माझी खात्री

झाली. पण त्यांना दुष्ट म्हणण्याचा मला अधिकार नाही हें मी जाणून आहें. आणि कांही झालें तरी, मोहन—"

शरद् किंचित् अडखळला; पण मोहन कांहीच बोलला नाही. तेव्हा तो पुढे म्हणाला, "मोहन, बोलणें निघालेंच आहे म्हणून एक गोष्ट मात्र आता बोलतों, मोकळेपणाने वागणें म्हणजे ज्याच्याशीं आपण वागतों त्याची कामवृत्ति जागृत करणें असें जर होत असेल तर तें तरी बरें का ? अर्थाचा अनर्थ करणें ही गोष्ट त्यामुळे कित्येकांना मुद्दाम शिकविल्यासारखी होत नाही का !"

"तुझ्या म्हणण्यांत अगदीच अर्थ नाही असें नाही. पण स्त्रियांना हजारों वर्षें कोंडून ठेविल्यामुळे त्यांचा ' मोकळे-पणा आपणांला असह्य होतो आणि त्याचा आपण भलताच अर्थ करतों असेंही होत नसेल का ?"

"असें होणें शक्य नाही असें मी म्हणत नाही. पण माझ्या आणि सुंदरच्या बाबतींत तो प्रश्न निघत नाही. मी पुरुष; मी पशुवृत्तीचा; मला ती उपभोग्य वस्तु म्हणून पाहिजे होती; तिच्या उपभोग्यते-शिवाय दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा विचार मी केलेला नव्हता. मला स्त्रियांच्या बाबतींत दुसरी दृष्टीच नव्हती. पण तिलाही कांही थोडा वेळ का होईना मी उपभोग्य वस्तु म्हणूनच पाहिजेसा झालों होतों ही गोष्ट खोटी नाही. पशुवृत्तीच्या माणसांतली पशुवृत्तीच जागृत होईल अशा प्रकारें वागणें म्हणणें विस्तवाशीं खेळणें नव्हे काय ? आणि ही पशुवृत्ति म्हणजेच खरी माणुसकी, तिला दडपणें म्हणजे मानसिक रोगांचें बीज लावणें असे कित्येक नामांकित ग्रंथकार सांगत सुटलेले नाहीत काय ? त्यांच्या प्रचाराविरुद्ध चांगल्या म्हणविणाऱ्या माणसांनी जर कांहीच केलें नाही तर या पशुवृत्तीचा प्रसार करण्याचें पाप त्यांनाही लागत नाही काय ? मोहन, मी माझें—माझ्या वागण्याचें—समर्थन करीत नाही; पण मला अगदी त्याज्य, अस्पृश्य मानणाऱ्यांनी माझीही परि-स्थिति लक्षांत घेतली पाहिजे नाही का ? मला वेळीं कोणी सावध केलें असतें—पण जाऊं द्या. मोहन, आज कित्येक वर्षांत मी कोणाजवळ इतका बोललों नव्हतों. आज तूं इतक्या ममतेने आलास–आणि अशा

वेळेस आलास की हें कोणा जवळ तरी बोलावें अशी ज्या वेळीं मला सारखी उत्कट इच्छा लागून राहिली होती. पण मोहन, पाहिजे तर हें सर्व विसरून जा. आपले रस्ते भिन्न आहेत. सुंदरचें त्या दिवशींचें वागणें---त्या दिवशीं मला न कळत समजलें की माझ्यापुढे उभी असलेली ही नुसती नटवेपणाची मूस नाही, तर मनुष्याला शक्ति देणारी, स्फूर्ति देणारी, पापाला नुसते डोळे वटारून जाळून टाकणारी, अद्‌भुत मूर्ति आहे........पण तिचा माझा आता कांही संबंध नाही; शत्रुत्वाचा सुद्धा नाही. ती मला मिळाली नाही. मी तिला मिळवूं शकलों नाही; धुळींत पण फेकूं शकलों नाही. दुष्टपणाच्या त्या परमावधीला जाण्याला मी तयार होतों; तिकडे निघालों होतों पण तेथे पोचलों नाही. पोचलों नाही तरी तयार होतों, तेव्हा मी कसलीही फुशारकी मारीत नाही. मोहन, जा आता; आलास, बसलास, बोललास; मी तुझा आभारी आहें."

मोहन उठला आणि त्याने शरदच्या खांद्यावर हात ठेवला. "हें सर्व जर तुला पटतें, शरद, तर हताश होण्याचें कांहीच कारण नाही. मी सुद्धा सुंदरबरोबर एकदा भांडलों—"

"मोहन, तुझें भांडणें निराळें. कांही जखमा अशा असतात की त्या कधी भरून येत नाहीत. सुंदरच्या अंत:करणाला मी अशाच जखमा केलेल्या आहेत. एखादे वेळीं तुझ्यासारखा काव्यमय वृत्तीचा मनुष्य त्यांचा सहानुभूतिपूर्वक विचार करील, पण त्याला देखील त्या जखमांचें निराकरण करतां येणार नाही. मोहन, आपले मार्ग निरनिराळे आहेत. मी ज्या रस्त्याने इतका पुढे गेलों तेथून माघार घेण्याचा एकच उपाय आहे—पण मागे येणें त्याही उपायाने शक्य नाही. मागे आल्यास मला परतण्याला ठिकाणच नाही. आणि—जें जें झालें तें कांही चुकीने झालेलें नाही, बुद्धिपुरस्सर झालेलें आहे."

"शरद, पण जें जें झालें तें बरें झालें नाही, हेंही बुद्धीलाच पटलें पाहिजे. आणि तें बुद्धीला पटलें की अंत:करणांत आपोआप उतरेल. बुद्धीचा आणि अंत:करणाचा तंटा असण्याचें खरोखर कांहीच कारण नाही."

" जाऊं द्या. हा वाद संपणार नाही. केव्हा तरी येत जा, मोहन. जाण्यापूर्वी एक काम सांगितलें तर करशील का ? "

" अलबत्, मोठ्या खुषीने मी करीन. "

शरदने अलमारीचें कुलूप काढून दार उघडलें. पुस्तकावर तपकिरी रंगाचा कागद गुंडाळल्यावर त्यासारखें दिसेल असें एक पुडकें त्याने मोहनच्या हातीं दिलें.

" हें कसलें पुस्तक आहे ? " मोहनने विचारलें.

" तें मी सांगत नाही. तूंही उघडून पाहूं नकोस. हें पुस्तक सुंदरला नेऊन दे; अगदी तिच्या हातांत नेऊन दे. तिचें आता बाळा-साहेबाशीं लग्न होईल त्या वेळीं तिला कांही देणगी द्यावी अशी माझी इच्छा आहे. ती मी आज तुझ्याबरोबर पाठवतों. आज तूं भेटलास हें फार बरें झालें. आणि हें पहा, अगदी सुंदरच्या हातांत दे हां ! "

तें पुस्तक घेऊन मोहन बाहेर पडला. तो गेल्यावर शरदने एक सुस्कारा टाकला.

---

## प्रकरण तिसावें

# शरदचा पुनर्जन्म

बाळासाहेबाने सुंदरच्या घरीं जाऊन तिच्या मंडळीची गाठ घेऊन तिच्या पाणिग्रहणाबद्दल रीतसर मागणी केली आणि ती रीतसर मान्य होऊन मार्गशीर्ष महिन्यांतला पहिला किंवा दुसरा मुहूर्त पाहून कार्य उरकून घ्यावें अशी सूचनाही तिच्या मंडळींनी केली. प्रत्येक विवाह नोंदणी पद्धतीने व्हावा असें बाळासाहेबांचें ठाम मत होतें व तसें त्यांनी स्पष्टपणें सांगितलें. नोंदणी विवाह हा स्त्रियांच्या दृष्टीने अधिक सुरक्षित व त्याच पद्धतीचा अवलंब आपण करणार असें ते म्हणाले. सुंदरच्या आईबापांना व आप्तेष्टांना समारंभ हवा होता. सकाळीं नोंदणी उरकून त्या दिवसभर मित्रमंडळीला व आप्तेष्टांना बोलाव-

ण्याचा व भोजनाचा समारंभ कितीही थाटाने होण्यास बाळची हरकत नव्हती; पण पुन: गोरज मुहूर्तावर बोहल्यावर उभें राहण्याला व सकाळींच लग्न झाल्यावर आठदहा तासांत 'पुनर्विवाह' करण्याला मात्र त्याची तयारी नव्हती. मुंदरने अर्थात् या बाबतींत आपल्या नियोजित पतीची बाजू घेतली. मोठेपणाला सुरवात झाल्यावर स्वत:च्या निवडीने विवाह ठरविण्यापर्यंत ज्यांनी माणसांची विवंचना केली नाही त्यांनी लग्न करण्याच्या पद्धतीबद्दल मात्र त्यांचें नसतेंच स्तोम उभें करून विवाहाला पुनर्विवाहाचें स्वरूप देणें म्हणजे ढोंगीपणा होय. विवाहसंस्थेची चेष्टा होय, अशी सुंदरची खात्री झाली होती व असला आचरटपणा न होऊं देण्याचा तिचा निश्चय होता. शेवटीं थोड्याशा तडजोडीला तिने व बाळनेही अनुमोदन दिलें. ती तडजोड म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे मार्गशीर्षांतील सकाळचा सोईस्कर मुहूर्त पाहून त्या वेळीं नोंदणीविवाह उरकून घ्यावयाचा व तो सर्व दिवस आप्तेष्टांसमवेत आनंदांत घालवावयाचा; हें सर्व ठरल्यानंतर बाळ सुंदरच्या घरीं वरचेवर जाऊं येऊं लागला, आणि तिच्या आईबापाची भावाबहिणींची व त्याची चांगली ओळख झाली. गेल्या प्रकरणांत घडलेली गोष्ट झाल्यावर दुसरेच दिवशीं मोहनने तें पुस्तक सुंदरकडे पोचविलें व विवाहप्रसंगीं ही भेट म्हणून शरदने दिली आहे असें तिला सांगितलें. तें ऐकून अर्थात् तिला आश्चर्य वाटलें व यांत कांही नवीन अरिष्ट उत्पन्न करण्याचा त्याचा हेतु तर नाही ना, अशीही तिला शंका आली. शरदच्या अंत:करणांत झालेल्या पालटाची तिला कांहीच कल्पना नव्हती म्हणून तिला तसें वाटणें स्वाभाविक होतें. कांही वेळाने आपल्या खोलींत जाऊन तिने दार लावून घेतलें व तें पार्सल उघडलें. तें उघडल्यानंतर नोटपेपर ठेवतात तसली व त्याच आकाराची कार्डबोर्डाची एक पेटी तिला मिळाली. ती बंद होती तरी पण वर सुतळीने बांधली होती. पेटीच्या वरच्या बाजूला बरोबर मध्यभागीं सुतळीच्या आंत एक लिफाफा होता त्यावर फक्त 'सौभाग्यकांक्षिणी सुंदराताई' एवढें लिहिलेलें होतें. तें अक्षर शरदचेंच होतें आणि तो सर्व प्रकार पाहून सुंदर क्षणभर चकित झाली. लिफाफा घेऊन तिने तो नीट उघडला. आंत एक पत्र होतें तें तिने घेतलें व त्याची घडी

उघडली व तें वाचण्यास सुरवात केली. शरदने तें पत्र लिहिलें होतें आणि पुढीलप्रमाणें होतें:—

" प्रिय सुंदर, हें पत्र व त्यासोबत पाठविलेली पेटी हीं मिळाल्यावर तुला आश्चर्य वाटेल व तुझी पहिली भावना तीं दोन्हीं फेकून द्यावींत किंवा मोडून फोडून जाळून पोळून टाकावींत अशी होईल. तसें तूं केलेंस तर त्यांत मला आश्चर्य वाटणार नाही, पण तसें करूं नकोस. प्रथम हें पत्र वाच आणि नंतर ती पेटी उघड. माझ्या ठिकाणीं थोडा तरी चांगलेपणा आहे असें तूं समजण्याचें कांहीही कारण नाही. गेल्या कित्येक दिवसांत जे प्रकार घडले त्यांमुळे तर तूं मला दैत्य समजूं लागली असशील व तसें तुला वाटलें नाही तरच आश्चर्य! तुझ्या आयुष्यांत एखाद्या दुष्ट ग्रहासारखा मी आलों ही गोष्ट खरी आहे, पण ही ग्रहबाधा आता कायमची नष्ट झाली असें मी तुला सांगितलें तर त्यावर, सुंदर, विश्वास ठेवण्याइतकी अंतःकरणाची उदारता तूं दाखविशील का? एक काळ असा होता—तो फार थोडा वेळ टिकला; पण तेवढा वेळ तरी तो होता यांत शंका नाही—की ज्या वेळीं मी दिसलों म्हणजे तुझ्या गालाला खळी पडत असे, तुझें मुख प्रफुल्ल होत असे; आणि ज्या वेळीं तूं दिसलीस म्हणजे माझें अंतःकरण आनंदाने भरून जात असे. सुंदर, पुढे झालेल्या गोष्टी एखादे वेळीं विसरून त्या काळच्या मैत्रीचें चित्र तुझ्यापुढे उभें राहील काय? पण जाऊं द्या. तो काळ गेला. एक दिवस अगदी योग्य कारण मिळून तूं मला त्याज्य ठरविलेंस, मला अस्पृश्य समजूं लागलीस—चांगल्या माणसांतला मी नव्हे असें तुझें मत झालें आणि तें मत बदलावें असें त्यानंतर माझ्या हातून कांहीच झालें नाही. उलट तें दृढ व्हावें अशाच प्रकारें मी वागूं लागलों. तो सर्व भाग विसरावा असें तुला वाटत असेल. पण सुंदर, काय असेल तें असो, इतके दिवस विसरून तो पुनः माझ्या डोक्यांत ठाणें देऊन बसला आहे व आजकाल त्या सर्व प्रसंगांचें स्मरण मला दुसरें कांही सुचूं देत नाही. कदाचित् त्या वेळीं मला मागे आणण्याचा प्रयत्न तूं केला असतास—प्रेमाच्या माणसाकडून एक नव्हे दहा अपराध माफ होण्याची अपेक्षा माणसें करतात ना?—तसें करण्याचा तुझा अधिकार

होता, तसें करण्याचें तुझ्या ठिकाणीं सामर्थ्यही होतें--जाऊं द्या. मी तुला कसलाही दोष देत नाही. मी वाईट झालों, तूं माझी संगत सोडलीस, त्यांत तुझा दोष नाही. आणि दुसऱ्याला कितीही दोष दिला तरी त्यामुळे आपल्या दुष्टपणाचें, आपल्या मूर्खपणाचें समर्थन होत नाही आणि तसें समर्थन करावें अशी माझी मुळी इच्छाच नाही. पण कधी कधी मनांत येतें की तुझ्या प्रेमाच्या साहाय्यानें माझ्यांतले दोष नाहीसे करण्याचा जर तूं प्रयत्न केला असतास तर--पण आता काय त्याचें ? सुंदर, ज्या उत्तम तरुणाची तूं पत्नी होणार आहेस त्याने माझ्याशीं आततायीपणा केला म्हणून मी भ्यालों असें मात्र समजूं नकोस. मी भ्यालों नाही. भय ही वस्तु माझ्याजवळ नाही. पण त्या दिवशीं एखाद्या लांडग्यासारखा मी तुझ्यावर घाला घालणार होतों त्या वेळीं तूं भ्याली नाहीस. सुंदर, तुझ्या त्या सुंदर मुद्रेवर भीति किंवा संकोच या भावना तिळभरही दिसल्या नाहीत--त्यांत धिक्काराची भावना होती तिनेही माझें निर्ढावलेलें मन बदललें नसतें. पण सुंदर, त्यांत दयेची भावना होती आणि ती तुझ्या मुखावर प्रतिबिंबित झालेली मला जेव्हा दिसली तेव्हा त्या दैत्य शरदला ओहोटी लागली. पण ती ओहोटी पूर्ण होऊन त्या शरदवर थोडा वेळ कां होईना तुझी प्रणयभावना—ती केवळ शहाणपणाची नसेल--स्थिर झाली होती तो शरद तुला पूर्वींच तुझ्या प्रियकराचे तडाखे खातां खातां मी बेशुद्ध पडलों. सुंदर तूं मान्य कर किंवा करूं नकोस, पण तुझ्या त्या दयामय मुखाकडे पाहतां पाहतां माझ्या अंतःकरणांतलें विष उतरूं लागलें. कधी कधी दैत्य होण्यापूर्वी ज्या शरदला तूं ओळखीत होतीस त्याची आठवण तुला कधी होईल का ? मला वाटतें तो दैत्य आता नाहीसा झालेला आहे; पण दैत्य निघून गेल्यावर जो शरद राहिला आहे त्यावर तुझा विश्वास बसणार नाही. पण सुंदर, काळजी करूं नकोस. तोही शरद यापुढे दिसणार नाही तुला. नाही, सुंदर, मी तुला पुनः दिसणार नाही. आत्मघाताचा कसलाही विचार मी केलेला नाही, पण तुझ्या जीवनांत यापुढे मी नाही. कदाचित एक दुर्वृत्त पण नाहीसा झालेला मित्र म्हणून माझी तुला आठवण झाली तर गोष्ट निराळी. पण तीही होऊं देऊं नकोस.

" सुंदर, आता तुझें लग्न होऊन वैभव आणि आनंद यांचा तुला लाभ होईल. तुझा एकेकाळचा मित्र म्हणून तुझ्याविषयीं यापुढे सदिच्छेशिवाय मला दुसरी कसलीही भावना नाही. नव्या आयुष्यांत आनंदाने जा आणि सुखाने संसार कर. तुला उपदेश करण्याचा मला अधिकार नाही म्हणून मी तो करीत नाही. पण माणूस बिघडला की अगदी तोडूं नये, त्याला सुधारण्याचा यत्न करावा, आणि तो अगदीच दुराराध्य आहे अशी खात्री झाली तरच त्याचें नांव टाकावें असें मी म्हटलें तर तूं रागावणार नाहीस ना ?

" तुझें लग्न होण्यापूर्वी तुझ्या आकाशांत कसलाही ढग नसावा आणि त्या दिवशींची तुझी ती निर्भय आणि दयामय मुद्रा माझ्या ठिकाणीं भिनली आहे याबद्दल तुला शंका राहूं नये म्हणून एक देणगी त्या पेटींत घालून तुझ्याकडे सोबत पाठविली आहे. तूं मला लिहिलेलें प्रत्येक पत्र त्या पेटींत आहे. जीं पत्रें एका प्रेमळ कुमारिकेच्या भाबडया अंत:करणाचे बोल म्हणून हिरेमारणकांच्या मोलाने एखाद्या चांगल्या माणसाने जपून ठेविलीं असतीं तीं मी तुला भीति उत्पन्न करण्यासाठी आयुधें म्हणून उपयोगांत आणलीं, तीं खरोखर माझ्या मालकीचीं आहेत—पण जेथे मीच तुझ्या अंत:करणांतून बाहेर निघालों तेथे त्या अंतःकरणाच्या वेळोवेळीं उद्भवलेल्या क्षणिक भावनेच्या खुणा अशीं हीं पत्रें तरी जवळ ठेवण्याचा मला काय अधिकार ? तीं परत घे आणि त्यांची पुनः आठवण होणार नाही असा पक्का बंदोबस्त कर.

" सुंदर सुखी हो. झालें गेलें सर्व विसर, आणि भविष्यकाळाकडे आनंदाने, अपेक्षेने पहा. माझें स्मरण तुला बिलकुल होऊं नये हीच माझी इच्छा आहे. तुझें विस्मरण मला होणें शक्य नाही. बाळासाहेबांना सांग की माझ्या मनांत त्यांच्याबद्दल कसलाही वैरभाव नाही, कसलाही किंतु नाही. तुला पति फार उत्तम मिळाला आहे. सुंदर, जिला आपली पत्नी केली तिचें रक्षण करण्याला समर्थ आणि उत्सुक असाच पति आपल्या बहिणीला मिळावा असें प्रत्येक भावाला वाटत असतें.

तुझा बंधु, **शरच्चंद्र.**

सुंदरने पेटी उघडली. त्यांत तिचीं सर्व पत्रें होतीं. मग शरदचें पत्र तिने पुन: एकदा वाचलें आणि त्यांतील सर्व अर्थ जेव्हा तिला पुरतेपणीं कळला, प्रत्येक वाक्यामागची भावना जेव्हा तिला समजून आली त्या वेळीं तिचें अंत:करण विरघळलें. शरदने तिला एवढा त्रास दिला होता तो ती त्या वेळीं पार विसरली आणि एकवेळ तिच्या अंत:करणावर मोहिनी टाकणारा शरद तिच्या मनश्चक्षूंपुढे उभा राहिला आणि काय असेल तें असो तिच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुधारा वाहूं लागल्या. शरदच्या पत्रांतील एकदोन वाक्यें तिला बोचलीं--आणि त्यांत त्याने म्हटलें होतें तें खरें असें तिला वाटलें. तिचें नि:शब्द रुदन कितीतरी वेळ चाललें होतें. मग ती उठली आणि डोळे पुसून व नीटनेटकी होऊन आपल्या खोलींतून बाहेर पडली.

---

## प्रकरण एकतिसावें

# निरोप

सुंदरच्या आग्रहामुळे बाळासाहेबाने शरदचें पत्र वाचलें आणि नंतर त्या पेटींतील सर्व पत्रें वाचलीं. मग त्याने उत्सुक नेत्रांनी तिच्याकडे पाहिलें.

"आता काय वाटतं आपल्याला?" तिने विचारलें. "अद्यापि वेळ गेली नाही. हा विवाह होणार नाही हें आपण अजून सांगूं शकतां."

"तसें आम्ही सांगूं शकत नाही, बाईसाहेब." सुंदरचे दोन्ही हात आपल्या हातांत घेऊन स्निग्ध दृष्टीने बाळ म्हणाला. या पत्रांनी मला नवें काय कळलें? नवीन कांहीच कळलें नाही. तीं परत आलीं त्यावरून शरदमध्ये चांगलेपणा आहे एवढें सिद्ध झालें. एक वेळ तो चांगला होता, निदान वाईट नव्हता, ही गोष्ट तर उघडच आहे. क म्हणून विचारलें नाहीस?"

" नाही मी विचारणार." किंचित आरक्त होऊन सुंदरने उत्तर दिलें व त्याच्याकडे पाहूं लागली.

" मग मीही नाही सांगणार. जें सांगितल्यावाचून कळतें तें सांगण्याची काय जरूरी ?"

" खरें आहे. मग विचारलेंत तरी कशाला ? मग आता माझी सर्व माहिती आपणांला झाली, तरीसुद्धा मी हवीशी वाटते का ?"

" तरीसुद्धा ! सुंदर, तुला प्रथम पाहिली तेव्हाच तूं हवीशी झालीस. आता फक्त जास्त हवीशी झालीस. हें शरदचें पत्र—"

" पण गडे आता तीं सर्व पत्रें आपण जाळून टाकूं."

" काय म्हणून ? हीं तुझीं पत्रें तर तुला विवाहप्रसंगीं देणगी म्हणून शरदने पाठविलीं आहेत. देणग्या कोणी जाळून का टाकतात ? तुझा आग्रहच असेल तर त्या पत्रांचें तूं वाटेल तें कर. पण हें शरदचें पत्र मी जपून ठेवणार. तुझ्या उत्तमपणाचें तें प्रतीकच आहे. लोखंडाला सोनें करण्याचा परीसपणा तुझ्याजवळ आहे हें या शरदच्या पत्रावरून सिद्ध होतें."

" पण आता मी मुळी सुवर्णाकडेच आलेलें आहे. आता माझ्या परीसपणाची जरूरी कोठे आहे."

" सुंदर, आपण सर्व माणसें आहोंत. त्यामुळे आपला लोखंडपणा अगदी नाहीसा होणें हें केवळ दुरापास्त आहे. म्हणून परीसपण हें नेहमीं लागतें आणि या दुनियेंत प्रेम हाच खरा परीस आहे. त्याच्याच सामर्थ्यानें लोखंडाचें सोनें होतें, पशूचा माणूस होतो, माणसाचा देव होतो."

" आपण काय बोलत आहांत याचा अर्थ कुणाला समजेल काय ?" सुंदरने विचारलें.

" तुला समजला ना—हां चुकलों, माफ करा, आपणांला मी बोलतों याचा अर्थ समजला ना ?"

" हें काय रे बाळ माझी चेष्टा करतोस ?"

मग ते दोघे मनमुराद हसले. परस्परांच्या निरतिशय प्रेमाने त्यांचीं अंत:करणें भरून गेलीं होतीं आणि तें प्रेमच जणू त्या हास्याच्या रूपाने ओसंडून बाहेर पडलें.

  

तीन वर्षें झालीं. माटुंग्याच्या बंगल्यांत दीडएक वर्षाचा गोजिरवाणा मुलगा हातांत एक चिंध्यांचें कुत्रें घेऊन कुत्र्याच्या एका खऱ्या पिल्लाच्या मागे धावत होता. पलीकडे [illegible] जवळ बाळासाहेब गुलाबाच्या ताटव्याकडे पाहत होते. एका वेताच्या खुर्चीवर बसून सुंदर [illegible] गुंतली होती. इतक्यांत बागेचें दार उघडून मोहन आंत आला. त्याच्याबरोबर आणखी कोणी तरी होतें.

“ये मोहन,” बाळ म्हणाला.

“मी एकटा नाही.” मोहनने सांगितलें. “बरोबर पाहुणे आहेत. कदाचित ओळख पटली तर या म्हणा.”

सुंदर उठली. तिने मोहनबरोबर आलेल्या पाहुण्याला पाहिलें. मग ती पुढे गेली आणि तिने आपल्या त्या छोट्या मुलाला उचलून जवळ घेतलें आणि मग ती मोहनजवळ येऊन म्हणाली,

“बाबू, तुझे दोन मामा आले आहेत. त्यांना नमस्कार कर पाहूं.”

छोट्या बाबूने आपले दोन्ही हात जुळवून नमस्कार केला आणि तो आईला जास्ती बिलगला. बाळासाहेबही तेथे आले. ते म्हणाले, “अरे वा! शरद! इकडे कुठे वाट चुकलां? या. या.”

“वाट चुकलों नाही. मुद्दाम आलों. मोहनने मला सांगितलें की येण्याला कसलीही हरकत नाही. येण्याची इच्छा होती, तेव्हा आलों.”

“म्हणजे येण्याला हरकत आहे असें तुम्हांला वाटलें म्हणायचें!” बाळ म्हणाला.

“नाही. मलाही वाटत नव्हतें. पण—”

“पण खात्री वाटत नव्हती!”

" होय तसें म्हणण्यास हरकत नाही. खात्री वाटत नव्हती. माझें काम असें कांही नाही. तुम्हांला पाहिलें--सुंदरला पाहिलें--या सुंदर छोटया बाबूला पाहिलें--आणि तेवढें पाहण्यासाठीच आलों होतों."

" शरद आता इलेक्ट्रिकल एंजीनीयर झालेला आहे आणि त्याला आता आफ्रिकेंत नोकरी लागली आहे. तिकडे तो चार दिवसांनी जाणार." मोहनने सांगितलें.

शरद आणि मोहन हे लागलीच तेथून जाऊं शकले नाहीत, हें सांगावयास नकोच. त्या दिवशीं बाळने त्यांना ठेवून घेतलें. चार दिवसांनी शरद आफ्रिकेला जाण्यासाठी बोटीवर चढला त्या वेळीं त्याला पोचविण्यासाठी बाळासाहेब, सुंदर आणि बाबू अशी सर्व मंडळी गेली होती. मोहन तर शरद बरोबरच आला होता. समुद्र अगदी शांत होता. आकाशांत एकही ढग नव्हता. बोट धक्क्यावरून हलली त्या वेळीं सुंदरच्या नेत्रांत पाणी आलें तें तिनें हळूच रुमालानें पुसलें. बोट दिसेनाशी झाली. सर्वत्र संथपणा आला. फक्त गाडींत बसेपर्यंत बाबूला कोणी घ्यावयाचें याबद्दल बाळ आणि सुंदर यांच्यांत तंटा झाला. तें पाहून मोहन हसूं लागला.

आपण हसत हसत त्यांचा निरोप घ्यावा नाही ?"

